






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. २९४ ■ जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर २०००

**अभीष्टचिंतन**

प्राचार्य बाळ गाडगीळ
अमृत महोत्सवी वर्षात पदार्पण
२९ मार्च १९२६

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

महाराष्ट्र
साहित्य
परिषद




'रुपी' चं ब्रीद होतं
सर्वसामान्यांचं विश्व
समृद्धीने उजळून टाकायचं
संचयाचं महत्त्व पटवून द्यायचं
अडीनडीला त्यांच्या पाठीशी
भक्कमपणे उभं राहायचं !
अल्पमुदत, दीर्घमुदत
आवर्त, उच्चशिक्षण, शुभमंगल
अशा कितीतरी फायदेशीर
बचतयोजना रुपीने आखल्या,
भरघोस व्याजाने यशस्वी केल्या.
सामान्यांची स्वप्ने फुलवताना
जिव्हाळाही बहरला.
लक्षावधी संसारातला 'रुपी' प्रवेश
संपन्नतेचा आनंद देणारा ठरला.
त्यांचा आनंदोत्सव बघून
काळही क्षणभर थबकला.

सर्व सामान्यांच्या जिव्हाळ्याची

**रुपी बँक लि.**

(शेड्यूल्ड को.ऑप.बँक)

मुख्य कचेरी : २०६२, सदाशिव पेठ,
आयुर्वेद शिक्षण मंडळ इमारत, पुणे ३०.
फोन : ४३३६५९८, ४३३३७९५.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९४

जुलै २००० ते सप्टेंबर २०००



**संपादक**

ह. ल. निपुणगे



**संपादन समिति**

डॉ. वि. भा. देशपांडे

प्रा. श्रीराम पुजारी

डॉ. ल. रा. नसिरावादकर

डॉ. अंजली सोमण

प्रकाश होळकर



**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड,

पुणे ४११ ०३०.

दूरध्वनी : ४४७५९६३.







अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका






**मुद्रक-प्रकाशक** : डॉ. वि. भा. देशपांडे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

**मुद्रणस्थळ** : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.

**मुखपृष्ठ रचना** : स. म. जंगम, पुणे.

**संगणकीय अक्षरजुळणी** : लीनता प्रकाशन आणि मुद्रणसेवा, पुणे.

**मूल्य** : रुपये तीस ◇ **वार्षिक वर्गणी संस्थांसाठी :** शंभर रुपये.

**आजीव सदस्य शुल्क** : रु.५००/- ◇ **वार्षिक सदस्य शुल्क :** रु. ५०/-

**अंक क्र.२९४** : जुलै २००० ते सप्टेंवर २०००.

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.



या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन समिती नेहमीच सहमत असेल असे नाही.





अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# संपादकीय



ह. ल. निपुणगे

'कोण काय वाचतो आणि कोणी काय वाचावे' याबद्दल नेहमी उलट-सुलट चर्चा होत असते. मुलांनी संस्कारक्षम पुस्तके वाचावीत म्हणजे त्यांच्यावर चांगले संस्कार होतील असे म्हणणारेही आहेत. आमच्या लहानपणी असे उपदेश नेहमी ऐकायला मिळत असत. परंतु वाचनाची गोडी लागायला जड विषय उपयोगाचे नाहीत हे मात्र खरेच.

माझ्या कुमारवयात अगदी आठवी-नववीत असताना मी बाबूराव अर्नाळकरांच्या रहस्यमय कादंबऱ्या वाचत असे. त्यातील पात्रांच्या करामती बघून खूष होत असे. कालांतराने मी वि.वा.हडप, नाथमाधव यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या वाचू लागलो. त्या वाचताना मी इतिहासकाळात रमून जावू लागलो आणि रहस्यकथा वाचनाचे माझे वेड हळूहळू कमी झाले. त्यानंतरच्या काळात मात्र दर्जेदार साहित्य वाचनाकडे वळलो.

वाचनाची गोडी ही क्रमाक्रमाने लागत असते आणि सामान्य आणि रंजक वाचनातूनच पुढे चांगला वाचक तयार होतो, घडतो. अलीकडच्या दूरदर्शनच्या काळात, विशेषत: अनेक दूरदर्शन वाहिन्यांच्या काळात, सतत काहीना काही कार्यक्रम चालू असताना वाचनाचे महत्त्व कमी झाले आहे असे सतत वाटत आले आहे.

वाचकप्रिय लेखक आणि दर्जेदार लेखक अशी फळी निर्माण झाली आहे.

अशा वाचकप्रिय लेखकांत श्री. वि. आ. बुवा यांचा समावेश होतो. त्यांनी जवळ-जवळ दीडशे पुस्तके लिहिली. मी त्यांची बरीचशी पुस्तके वाचली. त्यावेळी, त्या वयात मला ती आवडत असत. त्यांचे विनोदही मला हसवीत असत. कालांतराने मला त्यांच्या लेखनात तोचतोचपणा जाणवू लागला, मग मी त्यांची पुस्तके मुद्दाम वाचणे टाळू लागलो. तरी पण दिवाळी अंकात येणाऱ्या त्यांच्या कथा-विनोदी लेख मी वाचत असे. या अंकातील त्यांच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त लिहिलेला श्री. भा. ल. महाबळ यांचा लेख वाचताना मला वि. आ. बुवांच्या अनेक विनोद कथांची आठवण झाली.

त्यानंतर विनोदी लेखक प्राचार्य बाळ गाडगीळ यांचीही अनेक पुस्तके मी वाचली आहेत. त्यांचे 'लोटांगण' हे पुस्तक मला विशेष आवडले. त्यांचे 'सिगारेट आणि वसंतऋतु' हे प्रवासवर्णनपर पुस्तक, 'दुपारच्या सावल्या' हा व्यक्तिचित्रसंग्रह मी अलीकडेच वाचला. त्यांच्याही दिवाळी अंकांतून येणाऱ्या विनोदी कथा मी नेहमीच वाचतो. त्यातल्या काही लक्षात राहतात, काही विसरल्या जातात. विपुल लेखन करणाऱ्या लेखकांच्या बाबतीत असेच होते. त्यांचा लेखनाचा



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वेग वाचकांच्या वाचनाच्या वेगापेक्षा कितीतरी अधिक असतो. त्यामुळे त्यांची सगळी पुस्तकं लक्षात राहात नाहीत. प्राचार्य बाळ गाडगीळ आणि वि. आ. बुवा यांनी अमृतमहोत्सवी वर्षात पदार्पण केले आहे. त्यांना आरोग्यपूर्ण दीर्घायुष्यासाठी शुभेच्छा !

वि.वा.हडप यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांच्या लेखन कर्तृत्वाचे स्मरण करणारा विशेष लेख डॉ. स्वाती कर्वे यांनी लिहिला आहे. त्यांच्यानंतर लिहिल्या गेलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यात अगदी अलिकडच्या तीस-चाळीस वर्षातील रणजित देसाई यांची 'स्वामी', ना. सं. इनामदार यांच्या 'झेप', 'झुंज', 'मंत्रावेगळा' आदि ऐतिहासिक कादंबऱ्या आणि अगदी या दशकातील श्री.विश्वास पाटील यांची 'पानिपत' ही कादंबरी हे सर्व वाचकप्रिय साहित्य म्हणता येईल. या कादंबरीकारांनी ऐतिहासिक कादंबऱ्या अत्यंत रंजक आणि मनोवेधक ललितरम्य भाषाशैलीत लिहिल्या म्हणूनच त्या कादंबऱ्यांच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या निघून त्या सतत वाचल्या जात आहेत आणि त्या यापुढील काळातही वाचल्या जातील असे वाटते.

मृत्युंजयकार शिवाजी सावंत यांनी दिनांक ३१ ऑगस्ट २००० रोजी ६१ व्या वर्षात पदार्पण केले आहे. मोजकेच लिहून अमाप लोकप्रियता मिळविलेले शिवाजीराव सावंत यांची 'छावा' वाचकप्रिय झालीच आहे आणि अगदी अलीकडची श्रीकृष्णावरील कादंबरी 'युगंधर' ही तितकीच वाचकप्रिय होईल यात काहीच शंका नाही. समीक्षक या नव्या कादंबरीबद्दल काय म्हणतील हे सांगणे कठीण आहे. श्री. शिवाजी सावंत यांच्या षष्ठ्यब्दीपूर्तीनिमित्त त्यांना आरोग्यपूर्ण दीर्घायुष्यासाठी शुभेच्छा !

कै. पु. ल. देशपांडे मात्र या सर्वाला अपवाद होते. त्यांच्या लेखनाला सर्वप्रकारचे वाचक लाभले. त्यांची 'अपूर्वाई - पूर्वरंग' ही प्रवासवर्णने तर मी किर्लोस्कर मासिकात येत होती तेव्हाच वाचली. त्यानंतर पुस्तकरूपाने आल्यावर वाचली. त्यांनी निर्माण केलेली 'व्यक्ति आणि वल्ली', 'गणगोत', 'गुण गाईन आवडी' ह्या पुस्तकांतील व्यक्तिचित्रे तर आजही सर्व प्रकारच्या वाचकांना आवडतात. ती पुन्हा पुन्हा वाचली जातात.

सर्वसामान्य वाचकाला जे आवडते ते समीक्षकांना कधीच आवडत नाही हे आत्तापर्यंतच्या अनुभवावरून सांगता येईल. तरीही मला असे नेहमी वाटत आले आहे की, या समीक्षकांनीसुद्धा आपल्या वाचनाची सुरुवात रंजक साहित्यापासूनच केली असली पाहिजे असे म्हणता येईल. वाचक हा हळूहळू घडत जातो. एकदमच कोणी ज्ञानेश्वरी वाचायला घेत नाही.

सुरुवातीला रंजक साहित्य वाचण्याकडे कल असलेला वाचक पुढे दर्जेदार साहित्यही वाचू लागतो. वाचनाची गोडी लागण्यासाठी रंजक साहित्य निर्माण व्हायलाच हवे. असे साहित्य निर्माण करणाऱ्या लेखकांचीही वाचक घडविण्यासाठी गरज आहे.





अनुक्रमणिका






# प्राचार्य बाळ गाडगीळ यांच्या विनोदातील ऊन आणि सावल्या

◇

प्राचार्य म. द. हातकणंगलेकर

प्राचार्य बाळ गाडगीळ हे गेली पन्नास वर्षे लेखन करीत आहेत. त्यातले बहुतेक लेखन विनोदी आहे. उणीपुरी साटएक पुस्तके त्यांच्या नावावर जमा आहेत. तरीदेखील आजचे प्रमुख विनोदी लेखक असे विरुद त्यांना दिले जात नाही. साहित्यिक जगतातील हे एक कोडेच आहे. साहित्यकार (विनोदी लेखक) एकच असावा, एकाच कालखंडातला असावा, एकाच नागरी जीवनातला असावा. कमीजास्त एकाच धमनीतला (vein) असावा, शैली जवळपास एकच (शाब्दिक कलाकसरतींचा, कुसरीचा नव्हे, असावां) आणि तरी टळक प्रतिटितेत्त्व आणि स्वीकारात अंतर पडावे हे सकृतदर्शनी आकलनास सोपे वाटत नाही, तरी काही कारणे असावीतच. एक कारण असे असावे की अन्य विनोदी लेखकांच्या छायेत त्यांचे लेखन घडले. पु. ल. देशपांडे ऐन भगत आणि गंगाधर गाडगीळ खोचक आणि खुमासदार. बाळ गाडगीळ हे विनोदात देखील आपला सुसंस्कृतपणा सोडू न शकणारे आणि त्यामुळे विनोदाला जिचे वावडे आहे ती शालिनता, नैसर्गिकपणे वाळगणारे. अत्र्यांची आक्रमकता ते आणू शकत नाहीत. तरीही त्यांच्या विनोदाला त्यांची अशी एक चव (flavour) आहे. आणखी एक मुद्दा. तुमच्या लेखनाचा वाचकवर्गावर होणारा पहिला आघातही योग्य क्षणी येणे हे महत्त्वाचे ठरते. तसे कदाचित घडले नसावे. नाहीतर त्यांची वाङ्मयीन विडंबने फार सरस आहेत. ज्या मूळ लेखावर अगर साहित्यकृतींची ती विडंबने असतात त्यांचा गाडगीळांनी वारकाईने अभ्यास केलेला दिसतो. त्यातल्या त्रुटी, विसंगती अचूक हेरलेल्या असतात आणि त्यावर मार्मिक भाष्य केलेले असते. त्यावरून काव्य, नाटक, कथा यामधली त्यांची मर्मदृष्टी दिसून येते. पु.शि. रेगे यांच्या काव्य शैलीत त्यांनी केलेले झाडात पक्षी. पक्ष्यात झाड, झाडात गाणे या मथळ्याचे विडंबन उत्तम होते. तसेच 'गगनभेदी' नाटकाची त्यांनी केलेली चिरफाड त्यांच्या शेक्सपिअरच्या अभ्यासाची साक्ष देते. नाटकांवरची त्यांची विडंबने फारच सरस आहेत. विशेषतः कौटुंविक नाटकावरची विडंबनेही 'एकच प्याला' पण कोण ? असे लेख 'अखेर पडदा पडला !' या पुस्तकात समाविष्ट झाले आहेत. हे पुस्तक वाङ्मयीन विडंबनाचा उत्तम नमुना आहे. त्याची तुलना पु. लं. च्या वाङ्मयीन विडंबनाशीच होऊ शकते. त्यांनी गंभीर वृत्तीचे व्यक्तिचित्रात्मक लेखही लिहिले आहेत. आपल्या आईवर लिहिलेला त्यांचा लेख मला हृदयस्पर्शी वाटतो. ते विनोदी लेखन प्राधान्याने करीत असले तरी त्यांचे अंतःकरण गाढ सहानुभूतीने व्यथित होऊ शकते. याचे पुरावे काही संपूर्ण लेखात आणि अन्य लेखांच्या काही भागात दिसतात. त्यांची वरीच उपेक्षित राहिलेली 'रानोमाळ' ही आत्मपर कादंबरी याचे उत्तम उदाहरण आहे. त्यांच्या गुणवत्तेच्या मानाने त्यांच्या लेखनाची वूज का झाली नाही याचा नीटसा उलगडा होत नाही. यावद्दल ते वरवर विनोदाने वोलत असले तरी ही गोष्ट त्यांना लागून राहिली आहे यात शंका नाही. सर्वच लेखकांना आपला समानधर्मा कधी काळी मिळेल असा विश्वास वाळगण्याचा आत्मविश्वास अगर आशावाद असतोच असे नाही. विनोदी लेखकाला तरी भविष्याचा हवाला देण्याचा धोका पत्करता येत नाही. त्याचे बहुतांशी लेखन हे वर्तमानकालीन वाचकांच्या अपेक्षेनेच केलेले असते. पी. जी. वुडहौस, जेरोम के जेरोम, अगदी मार्क ट्वेन देखील - यांनी भविष्यावर



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

## प्राचार्य म. द. हातकणंगलेकर

*प्रा. हातकणंगलेकर हे मूळचे सांगली जिल्ह्यातलेच आणि विश्रामबाग, सांगली येथे स्थायिक झालेले ज्येष्ठ मराठी समीक्षक. जन्म १ फेब्रुवारी १९२७.*

*इंग्रजी या विषयाचे विद्यार्थी व नाणावलेले प्राध्यापक. मुंबई विद्यापीठाच्या इंटर आर्टसला त्यांना सेल्वी पारितोषिक मिळाले. बी. ए. च्या परीक्षेत ते इंग्रजी विषय घेऊन पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले. त्यांना एलिज प्राईझ मिळाले. ग्रामीण महाविद्यालयात अभ्यास करूनही हे दुर्मिळ पारितोषिक त्यांनी स्वतःच्या परिश्रमाने मिळविले.*

*मराठीतले हौशे आणि मौजे समीक्षक सोडले तर जे थोडे सच्चे समीक्षक आहेत त्यात हातकणंगलेकरांचे स्थान अग्रगण्य आहे. उत्तम समीक्षालेखनाबद्दल पारितोषिक देऊन त्यांचा गौरवही झाला आहे. त्यांच्या नावावर एक महत्त्वाचा समीक्षाग्रंथही आहे. याखेरीज मराठी कथा, कादंबरी, नाटक, कविता इ.विषयी विद्वद्मान्य लेखन केलेले आहे. ते क्वचितच ललितलेखन करीत असले तरी जे काही त्यांनी लिहिले आहे ते सगळेच हृद्य आणि दीर्घकाळ स्मरणात राहील असेच आहे. हातकणंगलेकर हे जसे उत्तम समीक्षक आहेत त्याप्रमाणे आदर्श शिक्षक आणि उत्तम वक्तेही आहेत.*

*ते सुप्रसिद्ध डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सेवक होते. तसेच त्यांनी सांगली येथील सुप्रसिद्ध विलिंग्डन महाविद्यालयाचे प्राचार्यपद अनेक वर्षे भूषविले आहे.*

*या रसिक समीक्षकाचे मराठी साहित्यावर प्रेम आहे. नव्या, कसदार लेखनाचे स्वागत करण्यास ते उत्सुक असतात.*

*प्रा. हातकणंगलेकरांनी वयाची सत्तरी केव्हाच ओलांडली असली तरी त्यांचा साहित्याविषयीचा उत्साह तरुणाला लाजवील असा आहे.*

किती विश्वास ठेवला होता ? तो आताचा विषय नाही. बाळ गाडगीळांच्या व्यक्तिचित्रात्मक लेखांचा व प्रवास वर्णनाचा विचार करणे हा प्रस्तुत विषय आहे.

विनोदी लेखकांना माणसांत, त्यांच्या अविर्भावात, बोलण्याचालण्याच्या लकबीत, त्यांच्या सवयीत, त्यांच्या वेगळ्या दर्शनात आणि वर्तनात फार रस असतो. एका इंग्रज लेखकाने लेखनाच्या सामग्रीचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे, ' Pen, ink, paper and a few tools around me ' आता tools म्हणजे मूर्ख माणसेच नव्हे, तर मुलखावेगळी तऱ्हेवाईक माणसे ! प्रत्येक विनोदी लेखकाने अशा माणसांचे चित्रण करण्यात आनंद घेतला आहे. कोल्हटकरांचे पांडूतात्या, बंडूनाना, चिं.वि. चे चिमणराव. अत्रे, दळवी, शामराव ओक, दत्तू बांदेकर या सर्वांनी नमुनेदार व्यक्तिचित्रे सादर केली आहेत. पु.ल.नी तर नारायणापासून अनेक नमुने सादर केले आहेत. बाळ गाडगीळांनी कल्पित पात्रे न रंगविता परिचित पात्रांचेच मिस्किल चित्रण केले आहे. ते अतिशयोक्त नाही पण मजेशीर आहे.

विनोदी लेखकांच्या आवडीचा आणखी एक विषय म्हणजे लहान मुले. त्यांच्या वागण्याबोलण्याचे, खेळाचे, खोड्या करण्याचे, लबाडीचे आणि लडिवाळपणाचे चित्रण करणे हा विनोदी लेखकांच्या विरंगुळ्याचा भाग असतो. त्यांच्या धुळीने मलिन होण्यात त्यांना कालिदासाप्रमाणे धन्यता वाटते. याचे एक महत्त्वाचे कारण सुचते, ते असे की विनोद हा विसंगतीवर आधारलेला असतो. लहान मुले आपल्या निरागसपणाने आणि अभावितपणे केलेल्या सत्यकथनाने मोठ्या माणसांच्या वर्तनातील विसंगती उघडी पाडतात, त्यांचा दंभस्फोट करतात, त्यांच्या लांड्यालबाड्या, कारस्थाने उजेडात आणतात. अप्रत्यक्षपणे जे विवेकी आहे, सत्य सचोटीचे आहे, निर्भय निरोगी आहे याचा मानदंड ते प्रौढांना दाखवितात. विनोदाचे हेच अंतिम कार्य आहे. तो निरामय जीवनाचा आदर्श आपल्यापुढे



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

टेवतो म्हणूनच विनोदाला मानवी जीवनाला चव देणारे लवण म्हणतात. शिवाय लहान मुले मोठ्यांना जीव लावतात. हे देखील एक मोठे तत्त्वच आहे. जीव लावणे म्हणजेच जगणे. पु. ल. देशपांडे यांनी एका लहान मूलावर, त्यांच्या नात्यातील, एक अप्रतिम लेख भरभरून लिहिला आहे. चिं. वि. जोश्यांची मुले तर नमुनेदार आहेत. तशीच गडकऱ्यांची. वाळ गाडगीळांनाही लहान मुलावर हृद्य लेखन केले आहे. त्यात जिव्हाळा आहे, तसा विनोदाचा हलका शिडकावाही आहे. विनोदी लेखकांचा आणखी एक अत्यंत आवडीचा विपय असतो, तो म्हणजे स्त्रिया आणि त्यांच्या अडाणीपणाचे किस्से. वाळ गाडगीळांना या विपयाचे वावडे नसले तरी वेड नाही. ही एक जमेची वाजूच समजली पाहिजे. त्या ऐवजी आपल्या साहित्यिक मित्रावर लिहिणे ते पसंत करतात आणि मोठ्या सहृदयतेने आणि नर्म विनोदी शैलीत लिहितात. स्त्रियांसंवंधीने त्यांचे लेख खरोखरीच निर्विप असतात. त्यांना विपाचा पुसटसा टिपूसही असत नाही.

'सकाळचे ऊन' 'दुपारच्या सावल्या' ही संग्रहाची नावे अत्यंत अन्वर्थक आहेत. दोन्ही नावात सौम्यता, शांतता आणि सुखद आनंद सूचित होतो. या ओघात मुलांच्या व्यक्तिचित्राकडे वळणे योग्य ठरेल. पहिले त्यांच्या मुलाचे दिलीपचे आहे. त्याचे नाव त्यांनी चिरंजीव पणजोवा असे टेवले आहे. वयाच्या मानाने तो वराच जाणता आणि प्रौढ आहे. तो त्यांचा वस्तुतः चिरंजीव असला तरी त्यांच्याशी वागण्यात पणजोवा शोभतो. इंग्रजी शाळेतल्या पहिल्या इयत्तेत असतानाच त्यांनी पप्पांना प्रश्न विचारला, 'पपा, आव लव्ह यू म्हंजे काय ?' तुला सिनेमा नट व्हायला आवडेल का?' असे पप्पांनी विचारल्यावर त्याचे उत्तर 'त्यांना पैसे मिळतात हे खरे पण नुसत्या पैशाचा उपयोग काय? या लोकांना मान मिळत नाही.' एकदा घरी पाहुणे आले असताना, त्याने आईला हुकूम केला, 'आई, या आजोवांना लाडू दे की आणि त्यांच्यावरोवर एक मलाही' त्यावद्दल त्याला रागवण्यात आले तेव्हा पुढच्या असल्या प्रसंगात तो आईला म्हणाला, 'आई, हे काका गेले म्हणजे मग मला लाडू दे वरं का?' एकदा काही चूक झाली म्हणून त्याने स्वतःला पनिशमेंट घेतली. अंगठे धरून उभा राहिला. वावांनी प्रेमाने छातीशी धरल्याने घुसमटून गेला. आई-वडील परदेशी जायला निघाले तेव्हा तो म्हणाला, 'तुम्हाला वोटीवर पोहोचवायला वरेच लोक येतील. तेथे आपण रडलो तर ते वाईट दिसेल. तेव्हा उद्या आपण दोघेही रडायचे नाही असे टरवू' हे हृद्य चित्रण आहे. त्याच्या पोटात अनुरूप विनोद आहे इतकेच. गाडगीळांच्या विनोदाचे हे सौम्य स्वरूप आहे. त्यानंतर आपल्या पुतण्यावर एरंडवनातील राक्षस असा एक लेख त्यांनी लिहिला आहे. त्याला काका गोष्ट सांगतात, एरंडवनात एक राक्षस होता. तो सर्वांना फार त्रास देत असे. राक्षसाच्या वडिलांचे नाव वावा होते आणि आईचे नाव आई होते. वावांचे एक पुस्तकाचे दुकान होते. त्या राक्षसाचे नाव अशोक होते. हे ऐकल्यावर त्याच्या ध्यानात सारे येते आणि तो काकांना गुद्दे मारू लागतो. गाडगीळ या प्रकारच्या गोष्टी प्रसन्न शैलीत फार खेळकरपणे खुलवीत जातात, याला वृत्तीचा निर्मळपणा लागतो ही गोष्ट अनेक वाचकांच्या ध्यानात येत नाही याचा खेद वाटतो. नंतर अशोकने वावांना विंचू चावतो याची गोष्ट इतक्या स्फोटक शैलीत सांगितली की काका चारी मुंड्या चित झाले. 'वावांनी वुटात पाय घातला आणि फडॅड्कन् विंचू चावला. वावा ठणॅण् करीत वोंवलत सुटले.' मग पुढचा लेख लाह्या फुलाव्यात तसा फुलत जातो. वैदेही या मुलीचे चित्रही असेच हृद्य आहे. त्याची सुरुवातच लोभस आहे. 'वरं का रे, एक हेमाराणी असते.' ' ही हेमाराणी कोण वुवा ?' 'कोण म्हणजे ? हीच हेमाराणी - तर एक हेमाराणी असते. ती फुलपाखराशी खेळते मग तिची आई मरते. मग हेमाराणी एका दुष्ट वाईच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## प्राचार्य बाळ गाडगीळ यांच्याविषयी

**मूळ नाव :** पांडुरंग लक्ष्मण (पी.एल्.) गाडगीळ

**जन्म :** २९ मार्च १९२६, अणसुरे (जि.रत्नागिरी)

**१) शैक्षणिक :**

शाळा : नू. म. वि., पुणे
मॅट्रिक : सर्व विषयात प्रावीण्यासह उत्तीर्ण (१९४२)
कॉलेज / विद्यापीठ : इंटर आर्टस् - सिद्धार्थ कॉलेज, मुंबई विद्यापीठ - पहिला वर्ग (१९४८)
बी.ए. (ऑनर्स) - अर्थशास्त्र - पहिला वर्ग - मुंबई विद्यापीठ - (१९४८)
एम.ए. - अर्थशास्त्र - मुंबई विद्यापीठ - पहिला वर्ग - (१९५०)
एम.एस. - अर्थशास्त्र - विस्कॉन्सिन विद्यापीठ - अमेरिका (१९६३)
प्रावीण्यासह आय.ए.एस. आणि मध्यवर्ती सेवा ही परीक्षा उत्तीर्ण (१९५१)

**२) शैक्षणिक अनुभव :**
सिद्धार्थ कॉलेज, मुंबई - दोन वर्षे फेलो म्हणून १९४८-५०.
व्याख्याता - १९५० - १९५१.
फर्ग्युसन कॉलेज, पुणे - असिस्टंट प्रोफेसर - १९५७-६०, प्रोफेसर १९६१-१९७१,
चिंतामणराव कॉलेज, सांगली १९७१-७५.
१९७५-१९८६ पुणे विद्यापीठात पदव्युत्तर विभागात अध्यापन. विषय अर्थशास्त्र.

**३) शासकीय अनुभव :**
इंडियन रेव्हेन्यु सर्व्हिस - सहा वर्षे
प्राचार्य, चिंतामणराव कॉलेज, सांगली - एक वर्ष
उपप्राचार्य, फर्ग्युसन कॉलेज - सात वर्षे
प्राचार्य, फर्ग्युसन कॉलेज - अकरा वर्षे
प्र-कुलगुरू, पुणे विद्यापीठ - १९८६-८७.
शैक्षणिक सल्लागार - सिंबायोसिस, पुणे - १९८८-१९९३.
उपाध्यक्ष - सिंबायोसिस, पुणे - १९९४ ते २०००.

**३) अर्थशास्त्रीय लेखन :**
शासनासाठी क्रमिक पुस्तके -
महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी पुस्तके -
Industrial Economy of India -
डॉ.पी.जी.गाडगीळ यांच्या समवेत अर्थशास्त्र लेखन.
नवभारत, Economic Times, Indian Express, सकाळ, केसरी, दीपावली, विशाखा.

**४) साहित्याबद्दल पारितोषिके :**
लोटांगण - या पहिल्याच विनोदी लेखसंग्रहाला महाराष्ट्र शासनाचे पहिले पारितोषिक १९६१.
(पु. लं. च्या 'अपुर्वाई' बरोबर विभागून.)
सिगरेट आणि वसंतऋतू - या प्रवास वर्णनाला महाराष्ट्र शासनाचे पहिले पारितोपिक. १९६३.
अध्यक्ष - मराठी वाङ्मय परिषद, बडोदे - १९७३.
विनोद साहित्य संमेलन, मुंबई - १९९२.
कोथरूड साहित्य संमेलन, पुणे.

**५) इतर सन्मान :**
अ) स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स, मुंबई विद्यापीठ - सर्वोत्कृष्ट विद्यार्थी - रोटरी पारितोपिक.
ब) पुणे महानगरपालिका - उत्कृष्ट शिक्षक - १९८०.
क) महाराष्ट्र राज्यशासन - आदर्श शिक्षक - १९८६.
ड) स्मिथ मुण्ट अँड फुलब्राइट स्कॉलरशिप, अमेरिका - १९५१.
इ) डेन्फोर्थ स्कॉलरशिप, अमेरिका - १९६२.
फ) 'प्राइड ऑफ पुणे' पुरस्कार - रेसिडन्सी क्लब, पुणे - १९९९.
ग) अनेक 'रोटरी क्लब्ज्' 'लायन्स क्लब्ज्' इ.
ई) षष्ट्यब्दीनिमित्त सत्कार : भारताचे प्रधानमंत्री व्ही. पी. सिंग यांचे हस्ते - १९८६.
ज) फर्ग्युसन (फर्गसन नव्हे) महाविद्यालयाची शताब्दी प्राचार्यपदाच्या कारकीर्दीत साजरी - १९८५.

**६) परदेश प्रवास :**
इजिप्त, इंग्लंड, पश्चिम जर्मनी, फ्रान्स, इटली, स्वित्झर्लंड, अमेरिका, रशिया, उत्तर कोरिया या प्रवासाविषयी दोन पुस्तके.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# प्राचार्य बाळ गाडगीळ यांचे साहित्य

**कथा**

१. रेखा
२. आकार आणि रेषा

**विनोदी कथासंग्रह**

१. होशियार, निगा रख्खो
२. मधात तळलेले वदक
३. थ्रिल
४. लाखातील एक
५. शिरसलामत
६. वोका, शिंके आणि काकवी
७. खिल्ली
८. चिमणरावांचा नवा अवतार
९. फिरकी
१०. वाशिंग
११. वंडल
१२. गप्पाटप्पा - पाच भाग
१३. हट म्हणताच गरीवी हटली
१४. वशिल्याचे तट्टू
१५. व्याह्याने धाडलेले घोडे
१६. कुणालाही थोडक्यात पाडून देऊ
१७. हसो हसो
१८. वेडे करावे शहाणे
१९. सुखी माणसाचा सदरा
२०. दुसरा चिमणराव
२१. चोर आणि मोर
२२. गप्पागोष्टी
२३. तळ्यात मळ्यात
२४. पाटलाची पी. ए.
२५. वशिल्याचे तट्टू
(निवडक विनोदी कथा)
२६. वाजे पाऊल आपुले
२७. म्या आन् माझा वाप
२८. खैरनारांना देव भेटतो
२९. परमेश्वराची डायरी
३०. वॉवी डार्लिंगचे पलायन
३१. तू तिथं मी - आजिवात नाही
(छापत आहे)

**विनोदी लेखसंग्रह**

१. लोटांगण
२. हसायचं नाही
३. हसत खेळत
४. जावई, मेव्हणे आणि मंडळी
५. गवाळ ग्रंथ
६. एकच प्याला - पण कोण?
७. एक चमचा पु.ल.,
एक चमचा अत्रे
८. उडती सतरंजी
९. अखेर पडदा पडला
१०. सकाळचे ऊन
११. शामभटाचे घोडे

**विनोदी कादंवरी**

१. रानोमाळ
२. घण एक पुरे प्रेमाचा

**प्रवास**

१. सिगरेट आणि वसंतऋतू
२. धडपडणाऱ्या माणसांचा देश
३. टॉवर आणि पिरॅमिड
(अप्रकाशित)

**व्यक्तिचित्रे**

१. दुपारच्या सावल्या

**संपादित**

१. डॉ.वावासाहेव आंवेडकरांच्या
शव्दात आंवेडकर

**वालवाङ्मय**

१. राजूच्या गोष्टी

**टीका ग्रंथ**

१. विनोद तत्वज्ञान -
मराठी तत्वज्ञान महाकोश, पुणे

**भाषांतरित**

१. मिसिसीपीवरील मुशाफिरी-
मार्क ट्वेनच्या Life on the Mississipi या आत्मवृत्ताचा अनुवाद.
२. अर्थशास्त्राचे शिल्पकार - The Worldy Philosophers या Heilbraner यांच्या पुस्तकाचा अनुवाद
३. व्यवसायाची नवी क्षितीजे - New Horizons in Business या पुस्तकाचा अनुवाद

**संकल्पित**

१. वळचणीचे पाणी (आत्मचरित्र)
२. सिंवायोसिसच्या गोष्टी

**इंग्रजी**

1. Sixteen Modern Marathi Short Stories - Popular Prakashan with Prof.Gangadhar Gadgil
2. Ten Marathi Short Stories Illustrated weekly of India
3. The Last Autobiography- राजेंद्र वनहट्टी यांच्या 'अखेरचे आत्मचरित्र' या लघुकादंवरीचा अनुवाद- Publishers Harper
4. The Story of a Golden Movement - Pub. Symbiosis (Story of Symbiosis)

◇ ◇



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


हाती सापडते. तिच्याकडे एक जादूचा आरसा असतो. ती आरशात पाहून विचारते, 'सर्वात सुंदर कोण आहे?' आरसा सांगतो, 'हेमाराणी' आणि परिचित पद्धतीने कहाणी सरकत जाते. शेवटी राजपुत्र येतो. दुष्ट बाईला मारतो व हेमाराणीशी लग्न करतो. आता विनोदाचा नमुना. पहिल्या दिवशी शाळेत जाऊन आल्यावर आईने वैदेहीला विचारले, 'काय ग, काय झालं आज शाळेत ?' ती म्हणाली, 'आज काही विशेष झालं नाही. उद्या बहुतेक पुन्हा जावं लागेल असे वाटते.' वैदेहीच्या काही समस्या आहेत. 'मोठेपणी आई व्हावे की बाबा ही तिची मोठी समस्या आहे.' निरागसतेला विनोद वेड लावण्याइतका रम्य असतो. ते पकडणाऱ्या मनाचा हेवा वाटायला नको का ?

मोठ्या बाईचे पण बालपण आपसूक जगणाऱ्या व्यक्तीचे व्यक्तिचित्रही असेच उतरले आहे. ते आहे शकुंतला परांजपे यांचे. त्यांचे शीर्षक आहे 'शकुंतला परांजपे-या नावाचे वादळ शमले.' यातही एक सच्च्या आणि सनातन निरागसतेची भूमी चित्रित केलेली आहे. वेणीचे शेपटे मागेपुढे सोडून पुण्यातून हिंडणारी पहिली मुलगी, वडील प्रिन्सिपल असूनही रस्टिकेट केली गेलेली मुलगी, रशियन माणसाशी लग्न करण्याचा अगोचरपणा करून वर्षाच्या आत काडीमोड घेणारी, ट्रायपॉस मिळवणारी, रघुनाथ कर्वे यांच्या नादाने कुटुंब नियोजनाच्या कामात भाग घेणारी, सहज धुम्रपान करणारी, ब्रीज खेळणारी, मद्यपान करणारी ही तरुणी म्हणजे वादळी व्यक्तिमत्व नव्हे तर दुसरे काय ? त्यावर बाळ गाडगीळांनी समंजस कौतुकाने लिहिले आहे. त्यातली आत्मीयता आणि जगावेगळ्या व्यक्तिमत्त्वाचे आकलन मनाला भिडणारे आहे. त्याशिवाय त्यांनी आपल्या अनेक साहित्यिक मित्रांबद्दल, गंगाधर गाडगीळ, श्री.ज.जोशी, पु. भा. भावे, अनंत अंतरकर, रमेश मंत्री यांच्याबद्दल मिस्कील सलगीने सहजपणे लिहिले आहे. त्याचप्रमाणे आपले गुरुवर्य नारळकर, टी. के. वैद्य, पु. ग. सहस्रबुद्धे यांच्याबद्दल आदरपूर्ण आपुलकीने लिहिले आहे. तसेच नानासाहेब गोरे, नानी पालखीवाला यांच्याशी सलगी बगळून जवळीक साधली आहे. वि. म. दांडेकर, पी.जी.वुडहाऊस, कार्ल मार्क्स, अमरेंद्र गाडगीळ, टी. के. वैद्य, व्हिक्टर कॅसिडी या व्यक्तींबद्दलही जाणकारीने आणि आवश्यक तेथे आदरभावाने आणि स्नेहशीलतेने लिहिले आहे. कोणत्याही लेखकाच्या ललित्याची एक मानवी बाजू म्हणजे त्याचे भिन्न प्रवृत्तीच्या आणि व्यवसायाच्या जुन्या नव्या माणसाबद्दलचे प्रामाणिक प्रेम. त्याचा पुरेपूर प्रत्यय बाळ गाडगीळांच्या व्यक्तिचित्रणातून येतो.

सकाळच्या ऊनातही व्यक्तिचित्रणे आहेत, पण ती घाईगर्दीने आटोपलीत की काय असा संशय येतो. शिवाय विनोदाचे विषयही तयार करण्यात आलेत की काय असाही संशय येतो. अर्थात काही विनोदाचे विषय असे प्रत्येक विनोदी लेखक तयार करीतच असतो. आणखी एक मुद्दा. विनोद समकालीन असावा लागतो अशी प्रथा आहे. त्याचे विषय वर्तमान वातावरणातून घ्यावे लागतात आणि हे लेख जर वर्तमानपत्रासाठी असतील तर हे भान लक्षपूर्वक जागे ठेवावे लागते. सकाळच्या ऊनात हे विशेषकरून जाणवते.

या संग्रहात गरीब लंबू (अमिताभ बच्चन) यांच्यावर दोन लेख आहेत. तसेच विदेशी जानवे, घरी अध्यक्षीय पद्धत, आम्हाला फास्ट बॉलर्स पाहिजेत, मंडईचा गणपती, साहित्य संमेलनाचा अध्यक्ष, तरुणांनो बंड करा, कधीही भरून न येणाऱ्या पोकळ्या, चिंगी झाली नाही तोच, पावसाळा आला, सकाळचे ऊन संपले इ. यात एक फक्त पुरुषांचे हळदीकुंकू आहे आणि त्यात संध्या सरवत्ती या बाई येतात आणि आपले नाव सार्थ करण्याचा उद्योग करतात. ती पुअर नाही पण अगदीच पोर आहे असा विनोद करतात. मुले



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अमिताभ वच्चनला लंवू म्हणतात. त्याला ओल्ड म्हणायचं नाही. कारण तो वोल्ड नाही. ही कॉन्व्हेंट मधली मुलगी आहे. तिचे इंग्रजीमिश्रीत मराठी किंवा उलटे गाडगीळांनी छान वापरले आहे. लंवूने इन्कमटॅक्स भरला नाही म्हणून ही चर्चा. त्याला एका पिक्चरचे पस्तीस किंवा पन्नासच मिळतात आणि इन्कमटॅक्सचे पाचदहा लाखाची वाकी तो टेवतो. चर्चा चांगलीच वाढते. हा पत्करलेल्या शैलीचा गुण आहे. मित्राने जानव्यावर आक्षेप घेतल्यावर ते म्हणतात, 'खामोश! कोत्रा कुळघातका, या माझ्या जानव्याला व्रह्मगाठ असती तर तुझे भस्म करून टाकलं असतं. यावेळी नाही भस्म करीत तुझं. शिवाय हे जानवं नायलॉनचं आहे. त्यामुळे याची कँडल पॉवर जरा कमी आहे म्हणून. नाहीतर चांगलाच इंगा दाखविला असता.' मित्र नंतर परदेशी धारणेच्या रहाणीमानावर तोंडसुख घेत राहिला. सत्तरीनंतर रिटायर व्हावे असे आजकाल माणसांना वाटत नाही. लोक आपल्याला मोडीत काढायला निघालेत असे त्यांना वाटते. आजोवा म्हटलेले त्यांना चालत नाही आणि राजकारणात असले तर राजकारणाचा संन्यास घ्यायला ते तयार नसतात. जन्मभर गर्दीची त्यांना सवय झालेली असते. काय मिळवायचे हे पक्के माहीत नसताना 'आम्हाला मिळालेच पाहिजे' असा कंठशोष करणारे जथ्थे तयार होतात. त्यांनी विनोवांचा सल्ला घ्यावा असे गाडगीळांना वाटते पण त्यांची मौनाची वेळ वगळून त्यांना भेटावे. तसे तरी कशाला. त्यांचे मौनही वोलके असते असे म्हणतात. संसदीय नव्हे तर अध्यक्षीय पद्धत आणली पाहिजे असे काहीजणांना वाटते. घरात हा वाद सुरू झाला की स्वयंपाक घर वोलते, 'खरं सांगायचं म्हणजे तुम्हाला संसदीय काय आणि अध्यक्षीय काय कुठलीच पद्धत उपयोगाची नाही. पद्धतीचा आणि तुमचा संवंध काय? अशा लोकांना

## निर्विष विनोदवुद्धी

*गाडगीळांनी आपले विडंवनात्मक लेख लिहितांना एक विशेष गोष्ट साधली आहे ती ही की, उपहासाचे शस्त्र तर वापरायचे, परंतु ते अशा प्रकारे वापरायचे की ज्यांच्याविरूद्ध ते वापरायचे त्यांनाही ते सुसह्य व्हावे. हे वाचताना आपणच हसत आहोत असे नसून गाडगीळांचे प्रतिपक्षीही अधूनमधून स्वतःला हसत आहेत असे दृश्य अनेकदा डोळ्यांपुढे येते... गाडगीळांनी हे जे साधले आहे ते सोपे नव्हे.*

*या हेतुपूर्ण उपहासावरोवरच शुद्ध मिस्कीलपणाही त्यात भरपूर आहे. त्यांच्या लेखनातून पदोपदी डोकावणारा मिस्कीलपणा त्या लेखनातील अर्थपूर्ण व लक्षणीय उपहासाची धार सहजगत्या सुसह्य होण्यास मदत करीत आहे.*

*श्रेष्ठ दर्जाचा विडंवनकार हा श्रेष्ठ दर्जाचा समीक्षकच असतो.*

*या सर्वच लेखांमधून गाडगीळांची निकोप नाट्यभिरुची आणि निर्विष विनोदवुद्धी यांचा एकदमच प्रत्यय येतो आणि यातच त्यांचे अपूर्व यश आहे.*

**प्रा. वा. ल. कुलकर्णी**

*('अखेर पडदा पडला' या वाळ गाडगीळांच्या पुस्तकाला लिहिलेल्या दीर्घ प्रस्तावनेतून)*

वठणीवर आणण्यासाठी हुकूमशाहीच पाहिजे.' गाडगीळांची या प्रकारची भाष्ये विनोद म्हणून आली असली तरी मार्मिक असतात. 'पोती आणि मार्क्स' या लेखात ते परीक्षेतल्या मार्कासंवंधी वोलतात. पूर्वी जास्तीत जास्त दिल्या जाणाऱ्या मार्कांची सरासरी ६० ते ७० असायची. आता ९० ते ९५ मार्क लागतात. काहींना १०५ टक्केदेखील मार्क्स मिळतात. अलिकडे पोत्यानी मार्क्स देतात. मग आजच्या शिक्षणातील विसंगतीवर टीकाटिप्पणी केली आहे. क्रिकेट कॉमेंटरीची गंमत केली आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'वॅटसमन' ने चेंडू स्क्वेअरकट करण्याच्या नादात चेंडू वॅटच्या आऊटसाईड एजला लागला आणि त्याचा झेल स्लिप आणि गलीमधून जाऊन थर्ड मॅनच्या दिशेने सीमापार झाला.' इंग्रजांचा असा सूड कुणीतरी घ्यायलाच पाहिजे होता. 'मंडईचा गणपती' म्हणजे 'सत्यकथे' चा दिवाळी अंक. मिरवणुकीत शेवटी यायचा त्याचा मान. तो विकणारा विक्रेता एकतरी अंक खपला म्हणून समाधानी होतो. कारण हे अंक वाकीचे सर्व अंक संपले की विक्रीसाठी स्टॉल्वर येतात. असे असले तरी सत्यकथेच्या अंकाचा दवदवा मात्र मंडईच्या गणपतीसारखा आहे. नंतर श्री. पुं. च्या वागण्यासंबंधी गंमतशीर मजकूर आहे. त्यांना विनोदाचे वावडे असावे असा संशय. सत्यकथा गेली तरी मौजच्या स्वरूपात ती दिसणारच आहे असे मत दिले आहे.

आपल्या आवडीच्या रहस्यकथांसंबंधी त्यांनी आत्मियतेने लिहिले आहे. काही वाचक रहस्यकथा मिटक्या मारीत वाचतात. पण तसे कबूल करीत नाहीत. त्यांना रहस्यकथा वाचनाची गंमतच कळत नाही. गाडगीळांनी आपण लहान वयापासून मराठी रहस्यकथा कशा वाचत होतो याची हकीकत सांगितली आहे आणि मग ते इंग्रजी रहस्यकथा लेखक आणि त्यांच्या आवडता पेरी मेसन याच्याकडे वळले आहेत. त्यांच्या कथांबद्दल त्यांची जाणकारी कौतुकास्पद आहे. त्याने आपल्या चतुर देखण्या डेल्ला स्ट्रीट या नावाच्या सेक्रेटरीवरोवर लग्न करणे अपरिहार्य नव्हते का ? 'नास्तिकपणाची चैन' यात विनोद नाही, प्रांजळ आत्मनिवेदन आहे. गाडगीळांचे कुत्र्या, मांजरांवरचे प्रेमही लोभसवाणे आहे. घरमालकीण मांजरीला कुठंतरी सोडून या असं म्हणते तेव्हा मांजरी त्यांच्याकडे पाहात मनातल्या मनात म्हणत असेल, 'घेतलाय खरा वाईचा जन्म. आता नकोत का सोसायला ही वोलणी ?' देशाकरता पाच वर्षे सक्तमजुरी पत्करावची, भारताचा राष्ट्राध्यक्ष होण्याची तयारी जेव्हा गाडगीळ दाखवतात तेव्हा आजी त्यांना जवळ वोलावते व म्हणते, 'बघू तुझे कान किती लांव झाले आहेत ते ? अरे टिळक कुठे? सावरकर कुठे ? आपण वीतभर माणसे. आपल्याला झेपणाऱ्या गोष्टी नव्हेत त्या. ये, ही पेपरमिटची वडी घे !' नंतर आजीशी सुखसंवाद सुरू होतो. स्वप्नांवद्दल ते म्हणतात, स्वप्ने साकार करण्याचा खटाटोप करू नये. सतत नवी स्वप्ने पाहात रहावे. ८० वर्षांच्या दादासंबंधी ते जिव्हाळ्याने आठवणी काढतात. त्या वयात ते तरुणांना वंड करण्याचा सल्ला देत. ते म्हणत, "It is better to be eighty years young than forty years old' आणि चॉकलेटची मागणी करीत. गंगाधर गाडगीळ संमेलनाध्यक्ष झाले आणि फोनवरून अभिनंदन यांचे. माझे अभिनंदन करू नका असे सांगितले तरी कुणी ऐकायला तयार नाही. मग एक पत्र आले. त्यात लिहिले होते, 'साहित्यिकांनी एकमेकांशी भांडावे हे खरे नाही.' कै.गुरूजी म्हणाले असते, 'संमेलन म्हणजे का भांडण ? म्हणजे का चढाओढ ? एका ऐवजी दोन अध्यक्ष असते तर काय विघडले असते ? उलट दुधात साखर नसती का पडली ?' पुणे विद्यापीठात शेक्सपिअरचा अभ्यास वंद केला तेव्हा गाडगीळांनी 'गुड वाय विल' हा विनोदी वाटणारा पण गंभीर आशयाचा अप्रतिम लेख लिहिला. आमच्याकडे 'गरिवी हटाव' आणि 'अमीरी हटाव' अशा आतापर्यंत दोन घोषणा होत्या. आता 'शेक्सपिअर हटाव' ही घोषणा आली. 'आमच्या विद्यापीठात तुझी आमची ही अखेरची भेट. आमेन.' एकदा मी वेचैन झालो. दर आठवड्याला कधीही भरून न येणारी पोकळी ! आमचे होणार कसे आणि काय ? म्हणून आम्ही गुरुजींच्या घरी गेलो. त्यांना डोके चेपत वसलेले पाहून विचारले, 'सर, समजा तुमचे दुखणे विकोपाला गेले आणि पुढच्या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आठवड्यात एक पोकळी निर्माण झाली तर ती कोण भरून काढणार ? सरांच्या आकाराकडे पाहता ती फारच मोठी असणार. पोकळी भरून काढण्यासारखी नाणी मोठे लोक कायम खुळखुळावीत असतात. गोड्से भटजीच्या प्रवासाचा परिचय गाडगीळांनी खुसखुशीत शैलीत करून दिलेला आहे आणि या अफलातून आत्मवृत्ताचे बेमालूम मूल्यमापन केले आहे. बरीच ऐतिहासिक माहिती रोचकपद्धतीने सादर केली आहे. संमेलनाध्यक्ष म्हणून नंबर लागण्यावरचा लेख आहे. विचार सुमनावरच्या लेखात एका उथळ पुढाऱ्याची खिल्ली उडविली आहे. आपल्या कथा लेखनावर दिलखुलासपणे लिहिलं आहे. चिर्गीबद्दल खेळकरपणे लिहिले आहे आणि छोट्यांच्या मोठ्या गोष्टीही सांगितल्या आहेत. साडेतीन टक्क्यांचा विषयही हाताळला आहे. संग्रहातला अखेरचा विषय सकाळचे ऊन संपल्याचा आहे. लेखकांना वाचक खुपीपत्रे पाठवित नाहीत अशी तक्रार, वाचकांची बाजू समजावून घेण्याचा प्रयत्नही दिसतो. ते तरी रविवारच्या भोजनानंतर वृत्तपत्र किती ध्यान देऊन वाचू शकणार ? शिवाय खुपीपत्र लिहिणे ही सोपी गोष्ट नाही. मग गाडगीळांनी या मालिकेतील लेखांच्या लेखनप्रक्रियेचा आढावा सादर केला आहे. काही वाचकांनी कळविले की इतका वेळ असल्या लेखनात दवडू नका. पण फिरोज दस्तुरवरच्या लेखासारखा लेख आपण स्वांतसुखाय लिहितो असे ते मान्य करतात.

सारांश गाडगीळांचे हे लेखन हल्के फुल्के असले तरी ते प्रांजळ, संयमी आहे आणि त्यांची शैली आल्हाद देणारी आहे. विनोद म्हणजे अतिशयोक्ती या सांकेतिक समजुतीला ते बळी पडत नाहीत ही त्यांच्या लेखनाची फार मोठी जमेची बाजू आहे.

'सिगरेट आणि वसंत ऋतू' हे त्यांच्या अमेरिकन जीवनावरच्या निरीक्षणाचे प्रगल्भ विनोदी शैलीत लिहिलेले उद्बोधक, वजनदार, प्रवास आणि वास्तव्यवर्णन आहे. त्यांच्या लेखनात या प्रवास वर्णनाला अग्रक्रम देणे जरूरीचे आहे. तसे झाले नाही ही खेदाची बाब आहे. हा खेद काही गुणी लेखकांच्या अनाहूतपणे वाट्याला येतो असे वाटते. प्रस्तावनेतील वाक्ये हल्क्या विनोदाची निदर्शक नाहीत. 'हे पुस्तक वेगळे आहे. (आगळे आहे की नाही कुणास ठाऊक !) समस्त अमेरिकन जीवनावरचा हा प्रकाशझोत वगैरे नाही. पण या जीवनाच्या काही बाजूचे मला घडलेले निकटचे दर्शन इतरांना घडविणे हा मुख्य हेतू.' सर्वांचे

### विनोद आणि फक्त विनोद

*प्रा.बाळ गाडगीळ गेली अनेक दशके सातत्याने तीन प्रकारचे लेखन करीत आहेत. ते तीन प्रकार म्हणजे विनोद, विनोद आणि फक्त विनोद ! या लेखनातले त्यांचे सातत्यही खरोखरच विस्मय वाटावा असे आहे. गेली चार दशके ते टोले हाणत आहेत आणि लोक कमी-अधिक प्रमाणात हसत आहेत. विनोदी लेखक म्हणून त्यांनी नुस्ती लोकप्रियताच नाही तर प्रतिष्ठाही कमावली आहे. गाडगीळांच्या विनोदात एक प्रकारचा निरागसपणा आहे आणि त्यांच्या या निरागस वृत्तीचे दर्शन या संग्रहातल्या बहुतेक सर्व लेखनकृतींतून घडेल. मोठा आव, आविर्भाव आणून एखादी गमतीदार गोष्ट समजावून देतादेता विलक्षण हास्यकारक विनोद साधतात. या संग्रहातला बाळ गाडगीळांचा विविध शैलीतला विनोद वाचकांना निश्चितपणे आवडेल असा मला विश्वास आहे.*

**जयवंत दळवी**

*('एकच प्याला - पण कोण?' या गाडगीळांच्या निवडक विनोदी लेखांच्या संग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेतून)*



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रामाणिक आभार मानले आहेत. पत्नीचे देखील. पहिले प्रकरण अपेक्षेप्रमाणे विलायतेच्या प्याशिजरास उपदेश असे जुन्या वळणाचे वाटणारे आहे. त्यातला उपहासाचा स्वर पुढे चांगला सांभाळला आहे. त्यात मित्रांचे परस्पर विरुद्ध अनाहूत सल्ले, खाण्याचे रुखवतासारखे आणलेले पदार्थ, देवनाथने आणलेल्या 'मुरूक्कू' नी केलेला पाठपुरावा. एका पुस्तकातले 'अमेरिकेत कसे जेवावे' हे प्रकरण मी वाचले, तेव्हा माझी तहानभूक नाहीशी झाली. आजीचा शेवटचा उपदेश, 'सांभाळून जा. बोटीच्या कठड्यावरून फार वाकू नकोस.' फार नमुनेदार आहे. ही खेळकर शैली शेवटपर्यंत वागवली आहे. त्यामुळे पुस्तकात एक प्रकारचा हवेशीर प्रसन्नपणा आहे. इतर लेखकांसारखा विनोदाच्या नावाखाली केलेला अशोभनीय अवखळपणा (आचरटपणा) नाही. शिवाय सर्व पुस्तकात अमेरिकन जीवनाबद्दल उद्बोधक माहिती, आकडेवारीसकट दिली आहे. या शैलीमुळे ती रोचक वाटते. कुठेही रटाळ होत नाही.

'सिगरेट आणि वसंतऋतु' हा शीर्षक लेख उत्साहात सुरू होतो. प्रारंभापासून झकास ओघ सुरू होतो. अमेरिकेत आल्यावर आपण मायदेशी प्राध्यापक असलो तरी आपले ज्ञान किती अगाध अज्ञान आहे हे समजणे सोपे गेले. आमचे संस्कृतचे प्राध्यापक म्हणत, 'The depth of Shakuntala is too high' तसे माझ्या अज्ञानाची खोली किती उंच आहे याची मला अमेरिकेत आल्यावर कल्पना आली.

नंतर त्यांनी अमेरिकन सिगरेटींच्या जाहिरातीबद्दल वाचकांचे सविस्तर, रंजक उद्बोधन केले आहे. 'मी सिगरेट ओढीत होतो पण एरवी सिगरेटबद्दल कोरडा ठणठणीत होतो. आपण सिगरेट ओढली तर वसंतऋतु येतो इतकी साधी गोष्ट समजण्याची अक्कल मला नव्हती.' 'पॅलमॅल', 'चेस्टरफिल्ड', 'लकी स्ट्राईक', 'कॅमल', 'सेलम' इत्यादी ब्रँड्स्ची जाहिरात कशी केली जाते याची नमुनेदार उदाहरणे त्यांनी दिली आहेत. 'चेस्टरफिल्डच्या दोन टोकातील लांब अंतराचा प्रवास करताना धूर, धूर राहात नाही. तो तुमच्या ओठाशी येतो तेव्हा जंटलमन झालेला असतो.' फिल्टर असलेल्या सिगरेटचा प्रकार आणखीनच वेगळा. 'केंट' वाले म्हणतात, 'आमचा फिल्टर काय चार चौघांसारखा आहे म्हणता ! अं हं ! आमचा मायक्रोनाइट फिल्टर आहे साहेब. जर्मन माल आहे. बोलू देणार नाही.' सिगरेटप्रमाणेच इतर वस्तूंच्या बिअर, साबण, अन्य सौंदर्यप्रसाधने, कुत्र्या-मांजरांचे अन्न यांच्या जाहिराती, लोकांना खरेदी करण्यास प्रवृत्त करणारी वचने 'आज उधार, रोज उधार' याची मनोरंजक उदारहणे दिली आहेत. इथे येऊन समाधान विश्रांतीगृह असे रेस्टॉरां काढले तर कितीतरी पैसे सहज मिळवू शकू असा विश्वास त्यांना वाटू लागला. जाहिरात अशी करायची, 'तरुणींना सुंदर होण्याचा एकच उपाय, आमचे बटाटेवडे खा !' हा लेख फर्मास उतरला आहे.

अमेरिकेतील थंडी, हिमवर्षाव, घरातच अडकून पडावे लागणे यावर उपाय म्हणून त्यांनी टी. व्ही. सेट आणला कारण तो कोणत्याही अमेरिकन घराचा अविभाज्य घटक असतो. टी. व्ही. वर जाहिरातींचा सुळसुळाट असतो. त्याची हिचकॉक टी. व्ही. वरच टिंगल करीत असतो. मात्र कलात्मक जाहिराती करणाऱ्यांचे ताफे तिथे असतात. जाहिरातीचे अवाढव्य उत्पन्न मिळविल्याशिवाय टी.व्ही. वरील नटांचे बेसुमार मानधन कसे देता येणार ? काही कार्यक्रम सुमार असतात. त्याचे वर्णन गाडगीळ करतात. ते इतके खुमासदार आहे की त्यावरून तेथील टी. व्ही. कार्यक्रमांची आणि त्यांच्या बरे वाईटपणाची आपल्याला उत्तम कल्पना येते. इथे नोकऱ्या भरपूर असतात पण त्या करण्यासाठी नोकरदाराजवळ स्वतःची मोटार



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

लागते. इथले गवळी, पोस्टमन यांच्याजवळ स्वतःची मोटार असते. साडी नेसणाऱ्या सौ.गाडगीळांना मात्र एक व्यापारी आपल्या दुकानात काम करण्याचा अत्याग्रह करीत होता. वेबी सिटिंगला गाडगीळांनी 'शिशुपाल' हा सुरेख शब्द शोधला आहे. अशा मुलांचे पालक काय सामान शिशुपालाच्या हवाली करतात, खाण्यापिण्याचे कोणते वेळापत्रक सांभाळण्याच्या सूचना देतात त्याची मनोरंजक माहिती दिली आहे. लहान मुलांना आपली स्वतंत्र मते असतात. ती म्हणू शकतात, 'आम्ही अभ्यास करावा असे तुमचे मत आहे काय ? नो वॉय, ते आम्ही आमच्या मॉम, डॅडवर सोपवले आहे.' वेबी सिटिंग हा इथला मोठाच धंदा आहे. त्यातल्या गंमतीजमती गाडगीळांनी चविष्टपणे सांगितल्या आहेत. अमेरिकन इंग्रजीच्या तर अनेक गंमती. Yes साठी या किंवा यॅप, गाडगीळ नव्हे तर बॅडघिल, पार्टी साठी फाडी, कुणाचा फोन आला तर उदवत्तीचा चटका वसल्यासारखा 'हाय' 'सी या' म्हणजे I will see you again, पोलिस म्हणजे खाप, लहान मुले प्रेमाने 'खापर' म्हणतात. अमेरिकन भाषेची रीत अनौपचारिक. आइनस्टाइनला ते 'द ग्रेट मॅथॅमॅटिकल गाय' म्हणतील. अमेरिकन इंग्रजीला इंग्रजी का म्हणायचे हा अवघड प्रश्न आहे. आपण शिकत असलेल्या संस्थेची गाडगीळ माहिती देतात. तेथे सर्व प्रकारचे स्वातंत्र्य असते. शिस्त लावण्याचे प्रकार सौजन्यपूर्ण असतात. प्रत्यक्ष शिकवण्याच्या ऐवजी केवळ मार्गदर्शन असते. आपला अभ्यास, वाचन आपल्यालाच करावे लागते. पीएच.डी. मिळविणे फार श्रमाचे काम असते. अमेरिकेत पैसे दिले की डिग्र्या मिळतात ही चुकीची समजूत आहे. बऱ्याच विद्यार्थ्यांना नोकऱ्या कराव्या लागतात. आपल्या अमेरिकन दोस्तावद्दल व्हिक्टर कॅसिडीवद्दल. त्याचे लग्न झाल्यावर तो आई-वडिलांवरोवर न राहता

**दमछास !**

*वाळ गाडगीळांची कलात्मक जिद्द. इतके दीर्घकाळ लेखन करूनही त्यांच्या विनोदी प्रतिभेत असलेला दमछास. अन् आपल्या विनोदासाठी नवीनवी क्षेत्रे शोधण्याची त्यांची चपळाई या तिन्ही गुणांच्या खुणा या संग्रहात नक्कीच आहेत. 'सिगरेट आणि वसंतऋतू', 'लोटांगण' आणि 'अखेर पडदा पडला' यानंतरचे हे आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण देणे म्हणून त्यांच्या या दुसऱ्या चिमणरावाशी मराठी रसिक प्रेमाने हस्तांदोलन करतील.*

**डॉ. विद्याधर पुंडलीक**

*('चिमणरावाचा नवा अवतार' या गाडगीळांच्या विनोदी कथासंग्रहात लिहिलेल्या प्रस्तावनेतून)*

स्वतंत्र राहू लागला. कारण काय, तर आई-वडील भराभर जेवतात तर या दोघांना शांतपणे सावकाश जेवण घेणे आवडते. व्हिक्टर मूर्ख लोकांना व्हॅक्यूम क्लिनर्स विकून स्वतःचा चरितार्थ चालवतो. तो फार आनंदी, हसरा माणूस आहे. अमेरिकन वायका अवला नसतात. पुरुषांची सर्व कामे त्या करू शकतात. दिसतातही तशाच. त्यावद्दलची एक गोष्ट गाडगीळांनी दिलेली आहे. एक धर्मोपदेशक, गृहस्थाशी वोलत होते.

'हल्लीच्या मुली कपडे असे काही घालतात की मुलगी आहे की मुलगा हे कळू नये. आता हीच मुलगी पहा. दिसतो की नाही पठाण !

'माफ करा हं ती माझी मुलगी आहे.'

'छे ! आपणच मला माफ करा. मला कल्पना नव्हती आपण त्या मुलीचे वडील आहात.'

'ती माझी मुलगी आहे हे खरं ! पण मी तिचा वाप नाही. मी तिची आई आहे !'

मग अमेरिकन घटस्फोटाच्या हकीकती येतात. त्यानंतर विचाऱ्या अमेरिकन नवऱ्यावर लेख असावा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

हे ओघानेच आले. या नवऱ्याला घरकामाचे कष्ट उपसावे लागतात. मित्राकडे भोजनाला गेले तरी भोजनोत्तर भांडीकुंडी आवरायला, स्वच्छ करायला तुम्ही यजमानीण बाईला मदत करण्याचा रिवाजच आहे. प्रत्येक गोष्टीवर यजमानीण बाईचेच नाव असते अगदी मृत नवऱ्याच्या थडग्यावर सुद्धा ! अमेरिकेत ज्याप्रमाणे कोर्टाच्या तारखा असतात तशा प्रेम करण्याच्याही तारखा असतात. अमेरिकन नवऱ्याच्या स्वातंत्र्याचा प्रश्न यावर परिसंवाद होऊ शकतो. अमेरिकेत चोरी हे एक थोर शास्त्र आणि श्रेष्ठ कला आहे. चोरीवर अनेक ग्रंथही लिहिले गेले आहेत. त्यांच्या आवृत्याही प्रसिद्ध झालेल्या आहेत. अखेरीस गाडगीळ लिहितात, 'चोरांचे खाजगी जीवन अगदी एकाकी असते. मुख्य कामासाठी जरी त्यांना जनता संपर्क साधावा लागत असला तरी 'कार्यभाग' झाल्यावर त्यांना 'गर्दीपासून दूर दूर' जावे लागते.' अमेरिकन उपा वहिनीवरचा लेखही मजेदार आहे. अमेरिकेत कुत्री आणि मांजरे यांचा परामर्षही त्यांना घ्यावाच लागला. 'कुत्र्यापासून सावध रहा' ही पाटी नसल्याची खात्री झाल्याशिवाय मी कोणाच्या दरवाज्यात पाऊल ठेवत नाही. भुंकणारी कुत्री चावत नाहीत असे म्हणतात पण चावणारी कुत्री भुंकत नाहीत असे कुठेच म्हटले नाही. अमेरिकेत कुत्र्या मांजराचे प्रमाण प्रत्येक तीन माणसागणिक एक असे पडते. 'हाड् हाड्' करून कुत्र्या मांजराचा प्रश्न अमेरिकेत सोडवता येत नाही. या प्राण्यासाठी विविध प्रकारचे अन्न तयार करावे लागते. शिळे तुकडे त्यांच्यापुढे टाकता येत नाहीत. 'अमेरिकेत कसे मरावे' असा एक लेख आहे. त्यात मरणोत्तर अंत्यविधी आणि पुरण्याच्या जागा याचे ही मंडळी कसे कोडकौतुक करतात याच्या कथा नोंदविल्या आहेत. एका बाईने तर गाडगीळांना लाडाने सांगितले, 'नुकतेच माझ्या नवऱ्याला आणि मला पुरण्यासाठी दोन सुंदर प्लॉटस् मिळून गेले आणि ते सुद्धा अगदी शेजारी शेजारी.' आहे का नाही ? मरणे ही तर गोष्ट सोडाच, पर अमेरिकेत नुसते रूचिपालट म्हणून चार दिवस आजारी पडणे ही सुद्धा भयंकर गोष्ट आहे. इथले लोक काही डॉक्टरांच्या औषधामुळे आणि उरलेले बिलांमुळे दगावतात. जगण्यासाठी जेवढा खर्च ते करू शकत नाहीत, त्यापेक्षा जास्त मरण्यासाठी करणे त्यांना भाग पडते. पुरण्याची जागा मिळविण्यासाठी ॲडव्हान्स बुकिंग करावे लागते. अखेरचा लेख मंतरलेल्या हवाई बेटासंबंधीचा आहे. हवाईला जाणे म्हणजे सदेह स्वर्गाला जाणे. या स्वर्गातील नानाविध सुखांची बहारदार वर्णने गाडगीळांनी केली आहेत. 'सागराला नटवून टाकणारी इतकी लावण्यसंपन्न भूमी जगात कुठंही नाही.' असे मार्क ट्वेनने म्हटले आहे ते विनोदाने नव्हे !

'सिगरेट आणि वसंत ऋतु' हे बाळ गाडगीळांचे अनुपम प्रवासवर्णन आहे. त्यांची ऊन-सावलीतली व्यक्तिचित्रे किती खुमासदार वठली आहेत ते आपण पाहिलेच आहे. इतका रंजक, रोचक नर्म (आणि नम्रही) विनोद ओघवत्या शैलीत निर्माण करणारा लेखक काहीसा बाजूला पडावा याचा उलगडा सहजासहजी होत नाही. त्यांना कोणत्यातरी साहित्य संस्थेने या वयातही काही दिवस मंतरलेल्या बेटावर पाठवावेच !

◇ ◇

प्राचार्य म. द. हातकणंगलेकर
'निर्वेद', कुपवाड रस्ता, विश्रामबाग, सांगली ४१६ ४१५.

---

## ❊ अभीष्टचिंतन ❊

संत साहित्याचे गाढे अभ्यासक आणि संशोधक **डॉ. रा. चिं. ढेरे** यांनी २२ जुलै २००० रोजी वयाची ७० वर्षे पूर्ण केली, त्यांना हार्दिक शुभेच्छा !



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# प्राचार्य गाडगीळ ह्यांचा विनोद



मंगला गोडवोले

वाळ गाडगीळ ह्यांचा माझ्या लक्षात राहिलेला विनोद म्हणजे 'चटणी उत्तम वाटावी' हा. जी. पी. नावाचा एक अत्यंत मितभाषी, अल्पाक्षरी संपादक, समीक्षक नेहमी विध्यर्थी वाक्यरचना करत असतो. 'कविता आवडली' असं सरळसरळ न म्हणता 'कविता आवडावी' असं म्हणण्याची प्रथा असते. ह्या सवयीमुळे त्याच्या कौटुंविक जीवनात समरप्रसंग ओढवतो. वायकोनं कष्ट करून गंधासारखी वारीक वाटलेली चटणी पानात पडल्यावर जी.पी. महाशय 'चटणी उत्तम वाटावी' असा अभिप्राय देतात. त्यामुळे पत्नी भडकते. 'वाटावी' मधला विध्यर्थ तिच्या नजरेतून सुटतो, कष्टाची कदर करण्याऐवजी नवरा 'चटणी उत्तम वाटावी' असा आदेश किंवा आज्ञा देतोआहे असं समजून ती डोक्यात राख घालून घेते. हा १९७२-७३ च्या सुमाराचा विनोद असावा. वरेच दिवस त्यानं माझी सोवत केली एवढं नक्की आठवतंय.

नंतर कधीतरी 'अखेर पडदा पडला' हे गाडगीळ ह्यांचं पुस्तक वाचनात आलं. गाजलेल्या मराठी नाटकांची छान विडंवनं त्यात होती. 'एकच प्याला - पण कोण ?', 'रायगडाला जेव्हा जाग येते-अर्थात कानेटकरांच्या माजघरात आवासाहेव', 'वाहतो ही दुर्वांची जुडी - अर्थात प्रेक्षक रडले पाहिजेत' ही त्यातली काही नाटकांची शीर्षकं खूप आवडली होती. ह्यातल्या प्रत्येक विडंवनाच्या खाली प्रश्नोत्तरं दिलेली होती. (वाळ) कोल्हटकरी नाटक त्याच्या ऐन भराच्या काळातही फारच भडक शाळकरी वाटत असल्यामुळे त्याच्या संवंधातले विनोद पटकन भिडले होते. वाळ कोल्हटकर ह्यांना सर्ववेळ 'वाको' 'वाको' किंवा महात्मा वाको वगैरे संवोधले असल्याची गंमतही अनुभवली होती.

हे सगळं मी फक्त वाचक असेपर्यंत. दरम्यान एका टप्प्यावर लेखनाची ऊर्मी मला अनावर झाली. मग स्वत:चं लिहिणं - इतरांचं वाचणं ह्यातल्या रस्सीखेचामध्ये कळत नकळत वाळ गाडगीळ ह्यांचं साहित्य वाचण्याकडे हळूहळू दुर्लक्ष होत गेलं. ज्या 'भागवत संप्रदायाला' झोडण्याची एकही संधी त्यांनी सोडली नव्हती, त्या संप्रदायालाही काहीशी उतरती कळा लागली. आवर्जून वाङ्मयीन विडंवनं करावीत असे वाङ्मयीन मठ-पंथ-संप्रदाय- चलनी नाणी ह्यांच्यातही घट झाली. अलीकडेच असं कानावर आलं की, प्राचार्य वाळ गाडगीळ ह्यांनी आपल्या प्रकाशित पुस्तकांची पन्नाशी आणि वयाची पंचाहत्तरी हे दोन्ही टप्पे गाठलेले आहेत. ह्या निमित्तानं त्यांच्या एकूण लेखनकारकीर्दीचा आणि विशेषत: विनोदाचा थोडा आढावा घ्यावा अशी कल्पना आहे. गाडगीळ ह्यांचं लेखन 'अफाट' म्हणण्याइतकं आहे. चारशेहून जास्त विनोदी कथा लिहिणाऱ्या गाडगीळ ह्यांचे एकूण तीसच्या आसपास विनोदी कथासंग्रह व लेखसंग्रह प्रकाशित झाले आहेत. 'गप्पाटप्पा' ह्या त्यांच्या विनोदी कथासंग्रहमालिकेत एकूण पाच भाग आहेत. त्यांच्या 'लोटांगण' ह्या विनोदी लेखसंग्रहाला महाराष्ट्र शासनाचा प्रथम पुरस्कार मिळालेला आहे. शिक्षणानिमित्त केलेल्या परदेश प्रवासानंतर 'सिगरेट आणि वसंतऋतू' हे प्रवासवर्णनपर पुस्तक लिहिलं, त्यालाही असाच शासकीय गौरव प्राप्त झालाआहे. ह्याखेरीज त्यांनी वालवाङ्मय, व्यक्तिचित्रे, विनोदी कादंवऱ्या, अनुवाद, नीतिकथा असं नाना प्रकारचं लेखन केलेलं आहे. मराठी तत्त्वज्ञान महाकोशातर्फे त्यांनी 'विनोदाचं तत्त्वज्ञान' हा



अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

गंभीर ग्रंथ लिहिलेला आहे. उत्तम मराठी साहित्याचा इंग्रजी अनुवाद करणं ह्यातही त्यांनी लक्ष घातलेलं आहे आणि इलस्ट्रेटेड विकली ऑफ इंडियामध्ये त्यांनी सादर केलेला पुंडलीक ह्यांच्या कथेचा इंग्रजी अनुवाद फार मार्मिक होता असं जाणकाराचं म्हणणं आहे. श्री. राजेंद्र बनहट्टी ह्यांच्या 'अखेरचे आत्मचरित्र' ह्या कादंबरीचा 'द लास्ट ऑटोबायोग्राफी' ह्या नावाने अनुवाद प्रसिद्ध केलेला आहे. त्यांच्या निवडक विनोदी कथांचा संग्रहही उपलब्ध आहे.

व्यवसायाने अर्थशास्त्राचे प्राध्यापक असणारे गाडगीळ मराठी साहित्याचे रसज्ञ वाचक आहेत, मराठी साहित्य परंपरेशी परिचित आहेत. ह्याची खूण त्यांच्या लेखनात सापडते. त्यांच्या विनोदी लेख/कथा/संग्रहांची नावंही ह्या दृष्टीनं बघण्यासारखी आहेत. आपल्याकडे विनोदी पुस्तकांची शीर्षकं बहुतेकवेळा असं सुचवणारी असतात की ही पुस्तकं फार गांभीर्यानं घेण्याच्या योग्यतेची नाहीत. घटकाभर गंमत म्हणून वाचावीत आणि सोडून द्यावीत इतपतच त्यांचा जीव आहे. अगदी 'सुदाम्याचे पोहे' असोत, 'नस्ती उठाठेव', 'खोगीर भरती', 'चिमणरावाचे चऱ्हाट' असो किंवा आजच्या काही लेखकांची विनोदी पुस्तकांची 'टवाळकी', 'फिरकी', 'अळवावरचे थेंब', 'नळी फुंकली सोनारे', 'उडत पगडं' अशी नावं असोत. मराठी विनोद परंपरेतला लेखक निदान ग्रंथशीर्षक निवडताना तरी अति नम्र - लीन - संकोची असाच असतो. गाडगीळ हयांच्या काही विनोदी पुस्तकांची नावं 'गप्पागोटी', 'गप्पाटप्पा', 'खिल्ली', 'तळ्यातमळ्यात', 'हसतखेळत', 'गवाळग्रंथ' अशी आहेत. तो योगायोग असेल असं मला वाटत नाही. त्यामागे पूर्वसुरींचा संस्कार असणार. ह्या संस्कारांचा आणखी एक धागा म्हणजे कथानायकाकडे असलेले आर्थिक - शैक्षणिक - सामाजिक न्यूनत्व, भावडा - अडाणी - गरीब - नव्या जगापुढे बिचकलेला - बावरलेला - त्यामुळे आणखीनच चुका करणारा आणि आणखीनच हास्यास्पद होणारा नायक, बायकोपुढे किंवा बॉसपुढे कायमच केविलवाणा ठरणारा नायक विनोदकारांना सोयीचा पडतो. त्याचं अज्ञान - त्याची कुचंबणा ही विनोदाची हक्काची जागा बनते. गाडगीळ ह्यांच्या बऱ्याच कथानायकांनी हा भोळाभावडा अवतार धारण केलेला आहे. 'अखेर सापडली' ह्या कथेमध्ये विश्वनाथ हा एक गावंढळ माणूस 'लोकशाही' विकत घेण्यासाठी एका दुकानात जातो. 'अहो, मैं पूछता हूँ की इधर लोकशाही मिलेगी क्या किधर ?' असा प्रश्न विचारतो. कारण त्याला राष्ट्रभाषा फारशी अवगत नसते. 'पिण्याचे फायदे' ह्या 'छोट्यांच्या मोठ्या गोष्टीमध्ये' चिरंजीव पंपू आपल्या अडाणी बापाला आपल्यातल्या जेनरेशन गॅपबद्दल चार मोलाच्या गोष्टी सुनवतो. सदू हा बावळट नवरा स्त्री मुक्ती आंदोलनामुळे प्रभावित होतो पण लवकरच आपण बाप होऊ घातलेले आहोत एवढी प्राथमिक गोष्ट त्याला समजत नाही. अर्थशास्त्र हा विषय घेऊन कसाबसा बी.ए. झालेला भालू सार्वजनिक गणेशोत्सवात भ्रष्टाचार ह्या विषयावर भाषण करायला जातो तेव्हा ते सगळं प्रकरण त्याच्याच अंगलट येतं. ह्या आणि अशा इतर अनेक कथांमध्ये आपलं सामान्यपण लक्षात न घेता सामान्य माणसं नसते उद्योग करायला जातात आणि त्यांचा पराभव हा विनोदाचा विषय बनतो. प्रसंगी 'आणीबाणीतील डायरी : काही पाने' ह्यासारख्या लेखात आणीबाणीसारखा गंभीर विषय संपल्यामुळे डायरीत लिहिण्यायोग्य काही उरणार नाही ही चिंताही विनोदाचा विषय बनते.

एकुणात गाडगीळ ह्यांचे विनोदाचे विषय समकालीन आणि सामाजिक असेच आहेत. एखाद्या भोंदू बाबाचं स्तोम, स्त्री मुक्ती आंदोलन, नवं शैक्षणिक धोरण, टेस्ट मॅचेस व एकूण क्रिकेटची दुनिया, सामाजातला



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

व राजकारणातला भ्रष्टाचार, (त्यांच्या एका पुस्तकाचं नावही 'वशिल्याचं तट्टू' असं आहे. ) नोकरशाहीचा मट्ठपणा, नवसाहित्य आणि त्याची परिभाषा, खटाववाडी संस्कृती इत्यादी इत्यादी. पारंपारिक मराठी विनोदानं समाजसुधारणेसाठी विनोदाचं शस्त्र पुष्कळदा वापरलेलं आहे. गाडगीळ इतक्या उघडपणे सुधारणेसाठी विनोद राबवत नसले तरी समाजातल्या उणिवा - त्रुटी - विसंगती - गैरव्यवहार ह्याकडे वाचकांचं लक्ष जरूर वेधतात. म्हणून मग त्यांचा चिमणरावसुद्धा आचार्य हशीश ह्यांच्याकडे जातो. लालू प्रसादांवर बेतलेला चालू प्रसाद परमेश्वराला भेटतो. कोणाच्या तरी डोक्यात नारळ पडला ह्यावरूनही गोष्ट तयार होते.

गाडगीळ खरे गोष्टी वेल्हाळ. रंगवून गोष्टी सांगतात. 'अमेरिकेत कसे मरावे ?' ह्या लेखात ते अमेरिकेतल्या मरणाची चैन चवीचवीनं सांगतात. 'गाडगीळ सिद्धान्त' सांगताना आपली नोकरी कशी गेली हेही मनःपूर्वक, खुलून सांगतात. 'आयुष्यात यशस्वी व्हायचं असेल तर प्रामाणिक लोकांनी लुच्चे, कामसू लोकांनी कामचुकार, खऱ्यांनी खोटे, शिस्तशीर लोकांनी बेशिस्त, शहाण्यांनी मूर्ख बनावं' हा तो सिद्धान्त आहे. कुठेही किंचितही कटुतेचा, वैफल्याचा सूर न लागता गाडगीळ तो मांडू शकतात ह्यांचं कारण त्यांचा गोष्टी वेल्हाळपणा. कुणा एका अक्कलव्वादेतली 'गव्रू आणि टोपीवाला ह्यांची ग्रँड सर्कस' किंवा 'ज्ञानेश्वर माऊली आणि मी' मधली ज्ञानेश्वरांची थेट भेट असे अनंत विषय ह्या गोष्टींच्या मोकळ्या ढाकळ्या बाजामध्ये आपोआप सामावतात. गोष्ट सांगण्याची, मार्मिक निरीक्षणानं तिच्यात रंजकता आणण्याची, कथनाचा ताजेपणा टिकवण्याची ढब त्यांच्याजवळ आहे. त्यांच्या जमलेल्या विनोदी कथांमध्ये तिचं प्रत्यंतर येतं.

मराठी विनोद परंपरेमधलं आणखी एक

सौ. मंगला श्रीनिवास गोडबोले
**जन्मतारीख :** २ फेब्रुवारी, १९४९.
**शालेय शिक्षण :** पार्ले टिळक विद्यालय, विलेपार्ले
**महाविद्यालयीन शिक्षण :**
एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई.
महाविद्यालयीन शिक्षणात नॅशनल स्कॉलर, दक्षिणा फेलो, अनेक वक्तृत्वस्पर्धांमध्ये पारितोषिके.
१९७० साली मुंबई विद्यापीठाची एम्.ए. (मराठी, भाषाशास्त्र) ही पदवी पहिल्या वर्गात पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण. त्याबद्दल
न.चिं.केळकर सुवर्णपदक प्राप्त.
**व्यवसाय :** १९७०-७१ : महिला महाविद्यालय, विलेपार्ले येथे अध्यापन.
१९८०-८४ : 'स्त्री' मासिकात संपादनसहाय्य.
१९९० पासून 'माहेर' मासिकात संपादनसहाय्य.
**प्रकाशित साहित्य :**
**कथासंग्रह :** आरंभ, सोबत, कोपरा, पोटाचा प्रश्न, खुणेची जागा. ('आरंभ' ला महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान.)
**कादंबरी :** गोंदण
**विनोदी लेखसंग्रह :** झुळूक, पुन्हा झुळूक, नवी झुळूक, अळवावरचे थेंब.
'पुन्हा झुळूक' ला चिं.वि.जोशी पुरस्कारप्राप्त.
**ललित :** कुंपण आणि आकाश, माझी पालकनीती, ...आणि मी, सह-वास हा सुखाचा, पुरुषोत्तमाय नमः
**बालसाहित्य :** अल्वम, नीरू आणि नेहा.
**माहितीपर :** वयात येताना, स्त्रीत्वाचे रहस्य, दत्तक घेण्यापूर्वी, वार्धक्य विचार.
'वयात येताना' महाराष्ट्र राज्य पुरस्कार. गुजराथी अनुवाद.
'दत्तक घेण्यापूर्वी' इंग्रजी अनुवाद.
'अमृतसिद्धी : पु.ल.समग्रदर्शन' या ग्रंथाचे स.ह.देशपांडे यांच्याबरोबर लेखन.
'निरोप' या लेखाला अनंत काणेकर पुरस्कार.
पुणे मराठी ग्रंथालय वर्धापनदिन पुरस्कार.
१९९९ सु.ल.गद्रे मातोश्री पुरस्कार.
आकाशवाणीसाठी विपुल लेखन. दोन नभोनाट्यांची 'नभोनाट्याच्या अखिल भारतीय स्पर्धेत निवड' व त्याचे १४ भारतीय भाषांमध्ये अनुवाद.
'श्रीकृपेकरून' व्यावसायिक रंगभूमीवरचे नाटक.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**विसंगती टिपण्याचे कसब**

*उत्कृष्ट विनोदाच्या निर्मितीस ज्या लेखकांनी हातभार लावला त्यात बाळ गाडगीळ हे आहेत... त्यांना निसर्गदत्त विनोदबुद्धी आहे, विसंगती टिपण्याचे कसब त्यांच्याजवळ आहे. बुद्धीचा आणि कल्पकतेचा तल्लखपणा त्यांनी घासूनपुसून आणि धार काढून आपल्या भात्यात ठेवला आहे. या गुणांमुळे त्यांच्या उनोक्तींची व वक्रोक्तीची जी गंमत आहे त्यांची खुलावट झाली. त्यांचं सारं सामर्थ्य वाचकांपर्यंत जाऊन पोहोचलं. त्यामुळे 'अखेर पडदा पडला' या पुस्तकाचं स्थान मराठी विनोदी साहित्यात एक चांगले आणि वैशिष्ट्यपूर्ण पुस्तक म्हणून निश्चित झालं आहे.*

**प्रा. गंगाधर गाडगीळ**

*('अखेर पडदा पडला' या बाळ गाडगीळांच्या 'ललित' मासिकातील 'ललित-शिफारस' या सदरातील लेखातून)*

वलस्थान गाडगीळ वापरतात. मराठी विनोदकारांनी शिक्षक, शिक्षकी पेशा, शिक्षकांचं अज्ञान आणि त्याविषयीचं निर्ढावलेपण ह्यांना अनेकदा वेठीला धरलेलं आहे. ह्याबाबतीत पु.ल. देशपांडे हे सर्वात अग्रेसर असावेत, कारण त्यांनी तर आपल्या लेखनात, भाषणांमध्ये ह्या जमातीची चेष्टा करण्याची एकही संधी सोडलेली नाही. बाळ गाडगीळ ह्यांनी व्यक्तिगत जीवनात शासकीय सेवेचा त्याग करून स्वेच्छेनं अर्थ प्राध्यापकत्व पत्करलेलं आहे. पुढे अनेक वर्ष शिक्षण क्षेत्रात प्राचार्यपद, प्रो.व्हाइस चॅन्सलरसारख्या मानाच्या जागा भूषवलेल्या असल्यामुळे ह्या क्षेत्राची अंतर्बाह्य माहिती त्यांना असणार. त्यांच्या लेखनात ह्या क्षेत्राचा खरपूस समाचार घेतल्याचं अनेकदा दिसतं.

'पिण्याचे फायदे' ह्या गोष्टीत माननीय नाना भुस्कुटे मास्तर आपल्या एका त्रस्त पालकाला काळाबरोबर राहाण्याचा सल्ला देतात. एकविसाव्या शतकाला सामोरे जाताना मद्यप्राशनाविषयी बुरसटलेली मतं न बाळगण्याचा इशारा देतात. पुढे ते ह्या विचारापासून पलटी खातात, तर सगळे विद्यार्थी आणि पाल्यच ह्या दोघांना अल्प प्रमाणात मद्य घेण्याचे फायदे सुनवतात आणि मुलांच्या अभ्यासात लक्ष न घालणंचं वरं ह्या निष्कर्षाप्रत पालक पोचतात. 'एस.एस.सी. त पहिली गाय' ह्या लेखात एस. एस. सी. त पहिल्याआलेल्या गायतोंडे ह्या मुलीची मुलाखत घेणारा 'चवाठा' चा संपादक 'शिखर परिषद', 'द्वैभाषिक प्रश्न', 'जागतिक शांतता' अशा प्रश्नांबाबत तिची मुलाखत घेतो आणि ती पठ्ठीही 'मुलांच्या बेशिस्तीला पुस्तकंच जबाबदार आहेत' असं बिनधास्तपणे सांगते. 'एका उत्तरपत्रिकेची कहाणी' ह्या कथेत ईश्वरलाल वटाटेवाला ह्या विद्यार्थ्याने संपूर्ण उत्तरपत्रिकेत सिनेमातली गाणी उतरवलेली असूनही त्याला उत्तम मार्क मिळतात, कारण त्याच्या उत्तरपत्रिकेला खूप पुरवण्या जोडलेल्या असतात आणि वजनानुसार मार्क देण्याची पद्धती विद्यापीठ अवलंबत असतं. 'गुरुदेव बी. एड. विद्यामंदिराची चित्तरकथा' मध्ये सर्व विद्यार्थ्यांना सर्व विषयात ए. टी. के. टी. हवी म्हणून आंदोलन होतं तर नवीन बी. एड. कॉलेजं निघू नयेत म्हणून त्यांना मान्यता देण्याचे अधिकारच विद्यापीठाकडून काढून घेतले जातात.

पूर्वसूरींच्या प्रभावाचं उत्तम उदाहरण म्हणजे दुसरा चिमणराव, चिमणरावाचा नवा अवतार ही त्यांची पुस्तकं. ह्याखेरीज इतरही दोनतीन चिमणराव कथा त्यांच्या अन्य पुस्तकांमध्ये आहेत. ह्याची पार्श्वभूमी अशी की, चिमणरावांच्या जनकाच्या म्हणजेच कै. चिं. वि. जोशी ह्यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने चिमणरावांच्या लोकप्रियतेला पुन्हा उधाण आलं. चिमणराव नव्या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

काळात हयात असते तर त्यांना कोणत्या प्रसंगांना सामोरं जावं लागलं असतं अशी कल्पना करून लेखकांनी 'दीपावली' दिवाळी अंकात कथा लिहाव्यात असा प्रस्ताव कै. केशवराव कोठावळे ह्यांनी मांडला. सुरुवातीला ह्या कल्पनेबद्दल फार स्वागतशील नसलेले गाडगीळ पुढे हीच कल्पना जवळजवळ सत्तावीस-अठ्ठावीस कथांमध्ये राबवू शकले. चिमणरावाला बेबी सिटिंग करावं लागतं, रंगरूप सुधारण्यासाठी विग लावावा लागतो, विमानप्रवास - कोलेस्टेरॉलशी लढाई, भूदान यज्ञ, मॉंटेसरी तत्त्वांचा स्वीकार ह्या नव्या गोष्टी त्याला रंजीस आणतात असे एकेक टप्पे घेताघेता 'चिमणराव आणि गुंड्याभाऊ ह्यांची कर्वेरोडवरील वाटचाल' इथवर त्यांनी ही कल्पना वापरली आहे आणि बहुतेकवेळा यशस्वीपणे वापरलीआहे.

चिं. वि. जोशी ह्यांची भाषा - जीवनशैली - वैचारिक धाटणी - चिमणरावांचा कुटुंबकबिला - त्याचा कालखंड - त्याचं शारीरिक दौर्बल्य - बौद्धिक चापल्य - मुलांकडून होणारा त्याचा पराभव - नवयुगाशी जमवून घेताना त्याची होणारी फरपट हे सगळं गाडगीळ ह्यांनी पुरतं आत्मसात केलेलं आहे. ह्याच्या खुणा ह्या नव - चिमण - कथांमध्ये जागोजागी दिसतात. चिमणरावांच्या मुलांची नावं पक्ष्यांची - राघू, मोरू, मैना, साळू वगैरे होती हे सर्वांना माहीत आहेच. आता पुढच्या पिढीत चिमणरावांच्या नातवंडांची नावं - चंडोल, हंसा अशी ठेवलेली आहेत. चिमणरावाची आई म्हणजे गुंड्याभाऊची मावशी आता निधन पावली आहे. त्यामुळे गुंड्याभाऊंचा एक नैतिक आधार लोपला आहे. तरीही त्यांची शाब्दिक गुंडगिरी आणि हातातला सोटा, खादाडपणा तसाच राहिलेला आहे. प्रोफेसर दिघे, अब्दुल्या त्याची बिबी, गुलाब ही इतर पात्रं, मिलिटरी अकाऊण्टसमधले इतर कर्मचारी

> **विनोदामागील जीवनदृष्टी**
>
> *प्रा. बाळ गाडगीळ यांनी 'विनोद तत्वज्ञान' या पुस्तकात विनोदाविषयी मूलग्राही विवेचन केले आहे. विनोद ही केवळ हसण्यावारी नेण्यासारखी गोष्ट नाही. विनोदामागे एक जीवनदृष्टी आहे अशी भूमिका घेऊन गाडगीळ यांनी त्या भूमिकेचे सांगोपांग विवेचन या पुस्तकात केले आहे. हे पुस्तक लिहून प्रा. बाळ गाडगीळ यांनी मराठीतील समीक्षा साहित्यात मोलाची भर टाकली आहे.*
>
> **प्रा. ग. प्र. प्रधान**
>
> *('विनोद तत्वज्ञान' या बाळ गाडगीळांच्या पुस्तकावर लिहिलेल्या अभिप्रायातून. रविवार सकाळ ३/४/९४)*

(ह्यात एक आय. एल. लेजिबल साहेबही आहे) हेही मौजूद आहेत. अजूनही ह्यातल्या बऱ्याच मंडळींना इंग्रजी भाषेचा बाऊ वाटतो. चिमणरावांचं 'माय आईज हॅव कम' (माझे डोळे आले आहेत) हे सांगणं प्रसिद्ध आहे. गाडगीळही नव्या चिमणरावाच्या शिप्याच्या तोंडी 'माझे सुंदर कपडे करून टाकतील तुमच्या फादरला बंग' असं वाक्य लीलया टाकतात. नातवाच्या शाळा प्रवेशासाठी हिंडत असताना नव्या चिमणरावाला ठिकठिकाणी 'नाहीत प्रवेश कोणत्याही सबबीवर, नाहीत वैयक्तिक मुलाखती' अशा पाट्या दिसतात. इंग्रजीप्रमाणेच गुजराथीचाही प्रभाव विनोदात येतो. जुन्या (म्हणजे खऱ्या) चिमणरावाने 'मने दही आप' 'चालो मारा जोडे' ही गुजराथी वाक्य मराठी अर्थानं वापरून मजा आणली होती. नव्या अवतारामधला चिमणराव 'तमे नवरो हशो तो एक बात पूछवानी छे' इथे मराठी नवरा - पती आणि गुजराथी नवरा - रिकामटेकडा माणूस ह्या शब्दांची सांगड घातली आहे. चिमणरावाची काटकसरी वृत्ती दाखवताना



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

**हसता हसता आरोग्य !**

*आपले 'विनोद तत्वज्ञान' मला अतिशय आवडले. एक फार महत्त्वाचा जीवनविषयक दृष्टिकोन आपल्या पुस्तकात निरनिराळ्या क्षेत्रातील उदाहरणे देऊन अतिशय प्रभावीपणे मांडलेला आहे. तो दृष्टिकोन बरोबर व अत्यंत आवश्यक आहे असे मलाही वाटते. विशेषतः 'हसता हसता आरोग्य' आणि 'विनोदाने उत्पादन वाढते' ही प्रकरणे पुष्कळच नवीन माहिती देऊन वाचकाला आपल्या नेहमीच्या वृत्तीबद्दल पुनर्विचार करायला लावतील. एकंदर पुस्तकातील विवेचन फार विचारप्रवर्तक व उपयुक्त असल्यामुळे या सामान्यतः दुर्लक्षित विषयावर एक महत्त्वाचे पुस्तक लिहिल्याबद्दल मनःपूर्वक अभिनंदन.*

**डॉ. वि. ना. ढवळे**

*(२९-१२-१९९३ रोजी लिहिलेल्या पत्रातून)*

('टीका' या विषयावर प्रबंध लिहून ऑक्सफर्ड या जगप्रसिद्ध विद्यापीठाची डॉक्टरेट संपादन केलेले, इंग्लिश वाङ्मयाचे नाणावलेले प्राध्यापक, फर्ग्युसन कॉलेजचे माजी प्राचार्य आणि 'साहित्याचे तत्वज्ञान' या विद्वद्मान्य ग्रंथाचे लेखक.)

दोन बुटांच्या जोडीसाठी शंभर रुपये मोजण्यापेक्षा एकच बूट घेऊन दुसऱ्या पायानं लंगडी घालण्याचा प्रस्तावही त्याच्या मनात आणला आहे.

माझ्या अंदाजाप्रमाणे शब्दांची उच्चारी रूपं लेखनात दर्शवणारे चिं. वि. जोशी हे पहिले मराठी लेखक असावेत. आईला गुंड्याचं फार 'कवतिक', पेणशन वसली, हूं पिच्चरवाले छूं, ब्याग, ब्याट, ब्यांड, यसफस, असे उच्चार मुद्दाम नोंदवणारी वाक्यं जोशी सहज लिहीत. गाडगीळ ह्यांनीही 'आर्सकरता आम्ही 'मर्मर्मर्मर्मर्मर मेलो' अशी वाक्यं चिमणीच्या तोंडी देऊन धमाल उडवलीआहे. चिं. वि. जोशी इंग्रजी शब्दांना गंमतशीर मराठी प्रतिशद्ब तयार करत. 'मी विमानातून आलो', 'प्लेन लॅंडेड - विमान जमीनले' हे पटकन आठवणारं उदाहरण. गाडगीळही गुंड्याभाऊला 'फिटनेस फॅनॅटिक' म्हणताना सहजच 'तंदुरुस्ती तर्कट्या' असं म्हणतात. 'मॅनिला' ह्या नववस्त्रविशेषाला 'काय तो तुमचा मनीला का वोक्याला ?' असं म्हणून उल्लेखतात. काऊला स्वतःला लो - ब्लडप्रेशर झाल्याबद्दल फार हळहळ वाटते. 'मेलं ब्लडप्रेशर तरी हाय असायला काही हरकत होती का?' सुब्रह्मण्यम कसले? हे तर अब्रह्मण्यम्‌साहेब होते, 'जोडोनिया धन ऐवजी 'सोडोनिया धन' अशी कोणाची तरी अवस्था झाली, 'मे. लॉंग अँड शॉर्ट' म्हणजे लठ्ठे आणि लुकडे मंडळी, वृत्तपत्रात हौसेहौसेनं पत्रव्यवहार करणाऱ्या एका माणसाचं नाव सदाशिव नारायण पेठे असं होतं, मोतीवाले देवधर वेगळे आणि धोतीवाले (क्रिकेटपटू) देवधर वेगळे, भूतपूर्व कॉलेजचे अभूतपूर्व प्राचार्य अमुकतमुक होते अशासारख्या शाब्दिक कसरती करामतीही जोडीजोडीनं आहेतच. चिमणरावांचा हा नवा अवतार जागोजागी जुन्या चिमणरावांचं स्मरण देतो ही त्याच्या यशाची मोठीच पावती आहे. निर्भेळ, प्रसंगनिष्ठ विनोद आणि कौटुंबिक नात्यांचे सूक्ष्म धागेदोरे ही चिमणरावांची वैशिष्ट्यं नव्या अवतारात पुष्कळदा दिसतात. हा प्रयोग सोपा नसणार असं वाटतं. एकतर दुसऱ्याचा मानसपुत्र, तो ज्या काळात जन्मला, वाढला तो काळ पूर्ण परका झालेला, नव्या काळात त्याच्या व्यक्तिमत्वाची मूळ बैठक टिकवून विनोद निर्माण करायचा, एका अर्थानं चिमणरावाच्या गोष्टीतल्या रिकाम्या जागा नव्यानं भरायच्या असं हे आव्हान होतं. मराठीमध्ये तरी अशा प्रकारे एकाचा मानसपुत्र दुसऱ्याच्या अंगणात विहरल्याची उदाहरणं मला आढळत नाहीत. ऑर्थर कॉनन डॉईलच्या 'शेरलॉक होम्सचं' पुष्कळदा पुनरुज्जीवन झालेलं आहे. पण तो अपवाद. एरवी हा प्रयोग यशस्वी करायला बऱ्याच



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गोष्टी गरजेच्या असणार. जसे, मूळ मानसपुत्राचा वारकाईने अभ्यास, त्याच्या अंतरंगाशी तादात्म्य, त्याच्यावर नव्या काळाचं रोपण करण्यामागची कारागिरी आणि ह्या सगळ्यातून नव्या वाचकांना मूळ चिमणराव अज्ञात असणाऱ्या वाचकांनाही तो वाचावासा वाटेल इतपत रसवत्ता आणणं..... वाळ गाडगीळ ह्यांना बऱ्याच प्रमाणात हे जमलेलं आहे आणि हे यशही मोठं आहे.

(आता पुलंच्या निधनानंतर पुलंचा 'वेंवट्या' - धोंडो भिकाजी कडमेडकर हा एकविसाव्या शतकाला कसा सामोरा जातो असा विचार करून कोणी लेखक लिहायला धजेल तरी की नाही अशी शंका इथे मनात येते!)

मराठी विनोद परंपरेत वाङ्मयीन विडंवनांचं नेहमीच मोठं स्थान राहिलेलं आहे. विशिष्ट काळातील वाङ्मयकार - विशिष्ट लेखनशैली - विशिष्ट संप्रदाय - त्यातली ढोंगं - कृत्रिमता - व्याज काव्यात्मता ह्यांना टाचणी लावण्याचं 'पवित्र कार्य' वहुतेकवेळा पुढच्या पिढीनं इमाने इतवारे पार पाडलंआहे. 'झेंडूची फुले' न सुरू केलेला हा प्रवाह गाडगीळ ह्यांनीही आपल्यापरीनं रीतसर पुढे नेलेला आहे. ग्रामीण कथांचा भरभराटीचा जमाना येऊन गेल्यावर त्यांनी 'ग्रामीण टुरी - योक अभ्यास' हे धमाल विनोदी विडंवनपर लेखन केलेलं आहे. ग्रामीण कथेचं 'टुरीत्व' कशात आहे हे गांभीर्यानं शोधण्याचा हा विनोदी प्रयत्न मार्मिक आहे. ग्रामीण कथेतल्या श्या (शिव्या), शायडी - कम्प्लेण - पाइंट - आरगुमेंट - टैट - मिष्टिक असे इंग्रजी शद्व वापरल्याचा सोस, डोक्याला डोस्कं किंवा नुकसानला लुस्कानी असा ग्रामीण टच देण्याची हौस, कशालाही 'भानगड' चिकटवण्याचा रंगेलपणा ह्या सगळ्या गोष्टी गाडगीळ ह्यांनी व्यवस्थित एकत्र आणल्या आहेत. 'गुर्वाव: एक लोटांगण' ह्यामध्ये

**पक्षी आणि दगड**

*'दुसरा पक्षी' ही पु. शि. रेगे यांची एक सुंदर, छोटीशी कविता आहे.*

*'पक्षी जें झाडावर गाणे गातो*
*आहे झाडच दुसरे पुन्हा त्या गाण्यात*
*पक्षी जे झाडावर गातो*
*झाडावर पक्षी जे गाणे गातो*
*आहे पक्षी त्या गाण्यातच पुन्हा*
*झाडावर पक्षी जे गातो.*

*या कवितेची समीक्षा निरनिराळे समीक्षक, नव समीक्षक, सुडो समीक्षक, अति-नव समीक्षक कशी करतील हे ऐकून वैतागलेल्या एका ग्रामीण 'समीक्षका' ची प्रतिक्रिया.*

*'दुसरा पक्षी' ही कविता व तिची समीक्षा परवा वाचनात आली. इकडे पंढरपूरच्या वाजूला यावर जी प्रतिक्रिया होणे शक्य आहे ती सोवतच्या कवितेत देत आहे.*

*वावली काय दूरभवची कटकट लावलीया,*
*दूरभळची काय कटकट लावलीया वावली,*
*कटकट लावलिया वावली काय दूरभळची,*
*लावलिया कटकट दूरभळची काय वावली.*
*आरं पांडा, ती गोफण घे वघू हिकडं जरा! टांगडंच मोडतो या पाखराचं!!*

('उडती सतरंजी' या पुस्तकातून)

(हा लेख प्रथम 'सत्यकथे' त प्रसिद्ध झाला होता.)

एका प्रसिद्ध भावुक - भ्रमंतीज - गप्पिष्ट - लेखकाचं स्मरण सहज व्हावं अशी योजना आहे. 'पक्षी आणि दगड' ह्या विनोदी लेखात पु. शि. रेगे ह्यांच्या शैलीचं आणि नवसमीक्षकी थाटाचं आकृतीसह विडंवन केलेलं आहे. मराठी टीकाकारांना अभ्यासाला सोपं पडावं म्हणून शेवटी त्यांच्या 'पक्षी जे झाडावर गाणे गातो' ह्या कवितेची 'वर्ड विच ऑन द ट्री साँग सिंग्ज' अशा पद्धतीने पुढे सरकणारी इंग्रजी आवृत्तीही तयार केलेली आहे. 'वाहतो ही दुर्वांची जुडी' ह्या नाटकातल्या मांगल्याच्या ओव्हरडोसाची मस्त खिल्ली उडवली आहे. आयुष्याची घडी -



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

**विनोद विश्वाची सफर**

*विनोदाचा एवढा गंभीर विचार करणारे व अभ्यासपूर्ण असे पुस्तक मी तरी अन्य वाचलेले नाही. इतके सुंदर पुस्तक लिहिल्यावद्दल आपले मन:पूर्वक अभिनंदन.*

*विनोदाविपयी पाश्चात्यांचे विचार, मराठीतील विनोद विचार, त्या निमित्ताने काही साहित्यकृतींची समीक्षा, कारुण्य आणि विनोद, हास्यकथा, विडंवन असे रमतगमत आपण वाचकाला विनोदविश्वाची सफर करून आणता. पु.ल., वनहट्टी, राम नगरकर, द. मा. मिरासदार, रमेश मंत्री वगैरे सर्व लेखकांच्या वाचलेल्याच साहित्याचा नवा अन्वयार्थ हे पुस्तक वाचल्यावर लागतो.*

*विनोदी वाङ्मयाच्या अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त ठरणाऱ्या साहित्यकृतीची निर्मिती केल्यावद्दल पुन्हा एकदा आम्हा दोघांतर्फे मन:पूर्वक अभिनंदन !*

**अनुराधा वैद्य**

*('विनोद तत्वज्ञान' या पुस्तकावद्दल लिहिलेल्या पत्रातून)*

कर्तव्याची उडी - हास्याची कडी - आधाराची शिडी - चुकलेला कापडी अशा सगळ्या शिड्या जुळवणाऱ्या सुभापची अखेर रेवडी उडते पण त्याला निदान खडी फोडायला जावं लागत नाही ह्यावद्दल आनंद व्यक्त केलेला आहे. ह्या 'जुडी' च्या शेवटी दिलेल्या अभ्यासामध्ये टी-पार्टी देणारे वामन पंडित मोठे का डी - पार्टी देणारे वाको मोठे असा सवालही केलेला आहे. 'संपादक - शैलीकार एक. (च.)' ह्यामध्ये मराठी कथेला स्वतंत्र व्याकरण, खास करून विध्यर्थ देणाऱ्या एका जी. पी. नावाच्या संपादकाचं चित्रण केलेलं आहे. त्यात जाणकारांना मुवलक ओळखीच्या खुणा सापडतील. हे जी. पी. शब्दांवावत अतीच मितव्ययी. सदैव संक्षेपात वोलतात.

'ओ. आय. सी. यू. आर. आय. एम. आय. यू. टी.' ह्या त्यांच्या वाक्याचा अर्थ 'अरेच्चाऽ तू आहेसच वाटतं ? मीही आहे. चला, मग आपण चहा घेऊ' असा असतो.

'पुण्यप्रभाव' ह्या नाटकाच्या शीर्पकाला 'अर्थात डोअर कीपरचा सूड' अशी पुस्ती गाडगीळ जोडतात. हे नाटक का लिहिलं असावं, वृंदावन भूपाल - ईश्वर - वसुंधरा ह्या पात्रांची मर्मस्थाने कोणती, ह्या नाटकापासून कोणाचा काय फायदा होईल वगैरे प्रश्न उभे करतांना पुष्कळ गंमत आणली आहे. कालिंदी ह्या पात्रावर 'वरेच दु:ख करून खूप गाणी म्हणण्याची जोडजवावदारी' आली आहे. वृंदावनची सर्वात मोठी कॉण्ट्रिव्यूशन कोणती ? तर तो एकही गाणं म्हणत नाही ही. पण तो सोळा असंवद्ध स्वगते म्हणून प्रेक्षकांचा तितकाच अंत पाहातो. 'मानापमान' अर्थात छोकऱ्याला छोकरी भेटते ह्या नाटकाचाही असाच 'पंचनामा' केला आहे. भामिनीला स्वत:चा आणि वनमालेचा डवल रोल करावा लागतो तेव्हा एक चहाटळ प्रेक्षक 'भामिनी डवल रोलर दिसते' असं मत नोंदवतो. अधून मधून वेष वदलणे, स्वत:ची वदललेली नावं लक्षात टेवणे, धैर्यधराचा एखादा जोडा पुसणे आणि वरचेवर गाणी म्हणणे ही तिची कामं असतात. ह्या नाटकाच्या समाचाराच्या अखेरीस दिलेल्या अभ्यासात म्हटलं आहे,

'ह्या नाटकातील कोणत्याही दोन पदांचा अर्थ लावण्याचा अगर ती स्वत: म्हणण्याचा प्रयत्न करा. यातील अधिक सोपे काय वाटते ? का ? यातील पहिल्या कृतीचा तुमच्या स्वत:च्या डोक्यावर व दुसऱ्या कृतीचा इतरांच्या डोक्यावर काय परिणाम होतो हे पहा.'



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अशा प्रकारे विडंबन - उपहास - उपरोध अशी सर्व शस्त्र वापरून गाडगीळ ह्यांनी काही गाजलेल्या मराठी नाटकांचा जो समाचार घेतलेला आहे तो नुसताच गंमतशीर नाही. त्यात नाट्यभिरुचीचं भान ठेवण्याच्या सूचनाही वरचेवर मिळतात. ह्यात जुनी नाटकं आहेत, तसचं सखाराम बाईंडरही आहे. एकूण मराठी नाट्यविश्वातल्या कित्येक दशकांचा आवाका ह्यात घेतलेला दिसतो. तेवढाच व्यासंग आणि विचार त्याच्या मागे असणार हे लक्षात घ्यायला हवं.

एकुणात वाङ्मयीन विडंबन हे गाडगीळ ह्यांचं बलस्थान आहे. अशा प्रकारे शीर्षक - विषयांची निवड - शाब्दिक खेळ - विशिष्ट विषयांचा अधिक उपयोग - वाङ्मयीन विडंबनाकडे ओढा ह्या मुद्यांबाबत गाडगीळ मराठी विनोद परंपरेशी घनिष्ट नातं सांगतात. निरागस - प्रसन्न - सहज विनोद त्यांना पुष्कळदा साधतो. व्यक्तिगत - चारित्र्यहननपर - बोचरा - जाचक विनोद त्यांनी लिहिलेला दिसत नाही. जेव्हा काही व्यक्तींचा सरळसरळ निर्देश करणारं लेखन केलं तेव्हाही त्यांच्या लेखणीनं कुठलीही मर्यादा ओलांडली नाही. प्रस्तावना - मनोगतं ह्यामधून स्वत:ची खिल्ली उडवायला मागेपुढे पाहिलं नाही. सुमारे १९५० सालापासून आजवरच्या ह्या लेखनप्रवासात गाडगीळांनी अंमळ जास्तच लिहिलं, काही कथा, लेख लिहिले नसते तरी फारसं बिघडलं नसतं. काही कथाकल्पना अर्ध्या कच्च्या मांडण्याची घाई करायला नको होती. एवढीच तक्रार करता येईल. पण विनोदी लेखकाला लेखनसंयम न जमल्याचं हे काही एकमेव उदाहरण म्हणता येणार नाही. हौस म्हणून - सवय म्हणून - नाइलाज म्हणून थोडं सरमिसळ दर्जाचं लेखन बऱ्याच मराठी विनोदकारांनी केलेलं आहे. तेव्हा ह्याही बाबतीत ते परंपरेशी इमान टिकवून आहेत असं म्हणता येईल.

'आता नव्यान लिहून काय करायचंय ?' अशा लेखन वैराग्याला आजही गाडगीळ बळी पडत नाहीत. ह्याला सालोसालचे दिवाळी अंक साक्ष असतात. ह्या उमेद टिकवण्याचंही एका टप्प्यापर्यंत महत्त्व आहे असं मला वाटतं.

व्यक्तिश: मला गाडगीळ ह्यांचं आणखी एक योगदान वाटतं. मराठी साहित्याचा आणि त्यातही विनोदाच्या प्रांगणात १९५० ते १९७५ ह्या काळात पु.ल. देशपांडे नावाचा एक विराट प्रतिभेचा लेखक - परफॉर्मर झगमगतं यश मिळवून गेला. त्यानं अनेकांचे डोळे दिपले. ह्याबद्दल शंकाच नाही. पण त्याचा दुसराही एक अनिष्ट परिणाम झाला. पुलं.च्या दर्जाचं, चौफेर बहुआयामी यश प्रत्येक लेखकानं मिळवलंच पाहिजे, तरच त्याची दखल घेतली जाईल, अन्यथा पुलंनंतर मराठी विनोद उरलाच नाही, तो पुलंबरोबर संपला अशी हैराण आरोळी मारायला आपण मोकळे राहू असा अनेकांचा समज झाला. गाडगीळ हे पुलंचे मोठे चाहते आहेत. त्यांनी आपले 'अखेर पडदा पडला' हे पुस्तक पुलंना अर्पण केलेले आहे. त्यांना विनोदातले आपले दादा म्हणजे आजोबा असं संबोधलेलं आहे. पुलंच्या शैलीचा त्यांच्या वाङ्मयीन विडंबनांवर सरळसरळ छाप दिसतो. इतकंच नव्हे तर पुलंच्या काही कल्पनाही त्यांनी हाताशी धरून नवलेखन केलेलं आहे. इसापाची 'सिंह आणि उंदीर' ही कथा फडके - खांडेकर - माडखोलकर आपापल्या शैलीत कशी लिहितील हे पुलंनी दाखवलं होतं. हीच बोधकथा पुढे साने गुरुजी - गंगाधर गाडगीळ - पु. भा. भावे आणि द. मा. मिरासदार कशी लिहितील हा कल्पनाविस्तार गाडगीळ ह्यांनी 'सिंह आणि उंदीर' ह्या कथेत केलेला आहे. तो मोटा झकास आहे. हीच गोष्ट नवशैलीत 'व्यथा' ह्या नावाने सांगून तिच्या शेवटी सिंहाला उंदराला उद्देशून म्हणायला लावले आहे.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## सिंह नि उंदीर : एक गोड गोष्ट-साने गुरुजी

एक सिंह एकदा दुपारचा झोपला होता. फुलाफळांनी वाकलेल्या झाडाने त्याच्यावर आपल्या दाट छायेची छत्री धरली होती. झाडाने काय विचार केला, हिंस्र प्राण्यास जागा कशी द्यावी? त्याचा स्वभावच होता छाया देण्याचा. ती माणसांनी नि सर्पांनी घ्यावी. गाईंनी पांघरावी नि सिंहांनी ल्यावी. निसर्गाच्या राज्यात ना भेद ना भाव ! ना आपला, ना परका ! ही आपली भारतीय संस्कृती व्यासांची, रामकृष्णांची, गांधीजींची.

सिंह झोपला असताना तिकडून एक उंदराचे बाळ आले आणि त्याच्या अंगावर बागडू लागले. जसे मातेच्या अंगावर मुलानं खेळावं तसे. पण त्यामुळं सिंहाचा निद्राभंग झाला नि त्याने उंदीरबाळाला आपल्या पंज्यात धरले.

उंदीरबाळ बिचारं कळवळून ओरडलं, 'आई, मायमाऊली. तुझी शिकवण. तू सांगितल्याप्रमाणे वागलो. भारतीय संस्कृतीचं बाळकडू तू पाजलंस. त्याप्रमाणे चित्त निर्मळ टेवलं. आता सिहकाकाच्या तावडीत सापडलो आहे. त्यातून माझी सुटका नाही. बघ आई, चित्तचक्षूंनी पाहा. गेला तुझा बाळ ! जसा रोहिदास, जसा चिलखा, तसा मी आई !'

हे हृदयद्रावक बोलणं ऐकून सिंहाला कळवळा आला. तो म्हणाला, 'अरे बाळ, तू इतका का बरं घाबरलास ? सिंह म्हणजे का क्रूरता ? सिंह म्हणजे का भीती ? सिह म्हणजे धडाडी नि धिटाई ! सिंह म्हणजे प्रेम नि सेवा !' बोलता बोलता सिहकाका सद्‌गदित झाला. त्याच्या दोन्ही डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. शेवटी अश्रू टिपत तो म्हणाला, 'जा प्रेमळ बालकमित्रा, जा. आपल्या मुलामाणसात जा. सुखी हो बाळ. 'सर्वे सुखीनः संतु' भारतीय संस्कृतीचा दिव्य नि भव्य संदेश. कुठं राहतोस बरं तू ? कशावर बरं होते तुझी गुजराण, बाळा ?'

'सिंहकाका, मी ना? मी राहतो किराणा मालाच्या दुकानात. तिथला माल आम्ही चोरून खातो नि पोट जाळतो.' बिचारा उंदीर आपल्या पापकृत्यानं शरमिंदा झाला.

सिंह त्याचं सांत्वन करण्यासाठी म्हणाला, 'भूक म्हणजे का चोरी ? भूक देवानं दिली. तू खातोस ती गुळाची ढेप नि ते शेंगदाणे निर्माण केले देवानं. वाण्यानं का ते केले ? वाण्याचा का त्याच्यावर अधिकार ? ते सारे देवाचे.' सिंहाने उंदराचे डोळे पुसले.

उंदीरही गहिवरला. तो म्हणाला, 'महाराज, आपले उपकार मी कसे विसरू ? दिलेले प्रेम का विसरतात ? विसरायला ते का कुणाकडून घेतलेले पैसे ? प्रेमाची फेड मी प्रेमाने कधीतरी करीनच करीन !'

सिंह म्हणाला, 'हे का उपकार ? धाकट्या भावावर, लाडक्या पुतण्यावर का कुणी उपकार करतं ? हा तर उपनिपद्धर्भ.'

सिंहानं दिलेले प्रेमाचं ओझं घेऊन उंदीर गेला.

कालांतराने तो सिंह पारध्यांनी बांधलेल्या जाळ्यात सापडला. ओरडून त्यानं आकाशपाताळ एक केलं. त्याची गर्जना ऐकून उंदीर तिथं धावून आला. सिंहदादाला जाळ्यात पाहून त्याचं काळीज तिळतीळ तुटलं. 'भाऊ, तुझं असं कसं रे झाल ?' तो म्हणाला, नि त्यानं जाळं कुरतडून सिंहाला मोकळं केलं.

मोकळा झाल्यावर सिह गद्‌गदून म्हणाला, 'तुला दिलेलं प्रेम इतक्या लवकर परत घ्यावं लागलं. असं सव्याज परत करायला ती का टेव होती ? प्रेम निर्व्याज करायचं असतं. जसं आई बाळावर करते.'

'आई, आई. आईची आठवण. भावड्या, माझ्या मोठ्या भावा. मी जातो आता. आई डोळ्यांत प्राण आणून माझी वाट पहात असेल. न मातुः पर दैवतम्!'

आईची आठवण निघताच सिंहाला गहिवरून आलं. तो म्हणाला, 'आई. तुमची आई, आमची आई. आपण दोघांच्या आया. आई म्हणजे प्रेमाचा पाझर. आई म्हणजे क्षमेची मूर्ती. आई म्हणजे....'

पण पुढे त्याच्या तोंडून शब्दही बाहेर पडले नाहीत आणि डोळे पाण्यानं भरलेले असल्यामुळं पळून जाणारा कृष्णमूर्ती उंदीरही त्याला दिसला नाही.

- बाळांनो, संपली माझी गोष्ट. नाशिकच्या तुरूंगात ही मी सांगितली. सर्वांना आवडली.

- आहे ना गोड ?

(प्राचार्य बाळ गाडगीळ यांच्या 'लोटांगण' या पहिला पुरस्कारप्राप्त व 'एकच प्याला पण कोण ?' या निवडक लेखांच्या संग्रहातून.)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'सुंदर आभार. आभाराचे शब्द अशा संदर्भात दगड बनतात पण या दगडांनाही वाचा फुटावी... कधी तरी ...'

पुलंचं साहित्यिक योगदान न मानणाऱ्यांनी इतर विनोदकारांचं स्मरण करावं ह्यात काही आश्चर्य नाही. बाळ गाडगीळ पुलंना पुरेपूर मानतात, तरीही पुलंबरोबर मराठी विनोद संपला नाही, पुलंचा विनोद सर्व लेखनात सर्वथैव आदर्श म्हणावा असा नव्हता हे ते सातत्यानं सभा संमेलनात सांगतात ह्याचं मला विशेष अगत्य वाटतं. पुलंपेक्षा आता विनोदाचे विषय व्यापक होत चालले आहेत. स्त्रियाही आता विनोदक्षेत्रात थोडीफार लुडबूड करायला लागल्या आहेत. ह्या गोष्टीबद्दल पुरेसा उत्साहवर्धक, स्वागतशील दृष्टिकोन श्री.गाडगीळ सातत्याने घेत राहिले आहेत. प्रसंगी टीकेचं लक्ष्य होण्याचा धोका पत्करूनही ते पुढल्या विनोदकारांकडे वाचकांचं - समीक्षकांचं लक्ष वेधण्याचा प्रयत्न करत आहेत.

आमच्यासारख्यांना ही गोष्टही दिलासादायक वाटावी !!

◇ ◇

मंगला गोडबोले
७, गीताली, पी.वाय.सी., पुणे ४.

---

## ❊ अभीष्टचिंतन ❊

सुप्रसिद्ध साहित्यिक **श्री. शंकरराव खरात** यांनी ११ जुलै, २००० रोजी ८० व्या वर्षात पदार्पण केले, त्यांना हार्दिक शुभेच्छा !

---

सुप्रसिद्ध लेखक बाळ गाडगीळ यांची
आम्ही प्रकाशित केलेली हास्यस्फोटक पुस्तके

- बंडल
- तळयात मळयात
- बॉबी डार्लिंगचे पलायन
- परमेश्वराची डायरी
- म्या, माझा बाप आन् त्येचा बाप !

**दिलीपराज प्रकाशन प्रा. लि.**
२५१ क शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.



अनुक्रमणिका




महाराष्ट्र साहित्य परिषद



## स्वागत

**छैलूचा पोपट :** आवासाहेव वाघमारे, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे २४.
**चाणाक्ष चंदू :** के. एस्. देशमुख, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे २४.
**शहाणी अर्चना :** सदानंद वामणे, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे २४.
**स्वातंत्र्यवीर सावरकर :** सुधाकर देशपांडे, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ३२.
**ऐतिहासिक कथा :** चित्रा हरी वझे, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ३२.
**पिंड :** नारायण शिरसाळे, वीणा प्रकाशन, जळगाव. पृष्ठे १००.
**जात :** नारायण शिरसाळे, वीणा प्रकाशन, जळगाव. पृष्ठे ७६.
**माझ्या गावाला जाऊ :** अशोक कौतिक कोळी, वीणा प्रकाशन, जळगाव. पृष्ठे २६.
**निराकार :** इंदिरा संत, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ६८.
**दयदाह :** स्वप्निल पोरे, लोकसाहित्य प्रकाशन, औरंगावाद.
**गौरी, गौरी कुठे आलीस ? :** शोभा चित्ते, मौज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १५८.
**वि. स. खांडेकरांची कविता :**अविनाश अवलगांवकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २१६.
**किनारे मनाचे :** शांता शेळके, संकलन-प्रभा गणोरकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १७६.
**शेष अवशेष :** अरविंद रे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २००.
**मुळे आणि पाळे :** वसंत नरहर फेणे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १२०.
**ऋतु वेगळा :** आशा वगे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १०६.
**निसटलेले :** आशा वगे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १६८.
**उत्तरार्ध :** विजया राजाध्यक्ष, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २२४.
**प्रवाह :** पांडुरंग कुंभार, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १२४.
**सावित्रीचा निर्णय :** नागनाथ कोत्तापल्ले, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १८६.
**कावळे आणि माणसं :** उत्तम कांबळे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १७०.
**लाईफ स्टाईल :** सुधीर गाडगीळ, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १५६.
**प्रवाहातील तारू :** स. वि. सुंठणकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १८८.
**तुम्ही आणि तुमचं वैवाहिक जीवन :** प्रमोद संभुस, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ११४.
**द वर्ड ऑफ कतवा :** अरुण शौरी, अनुवाद - भारती पांडे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ४१०.
**नष्ट मेयरे नष्ट गद्य :** अनुवाद - मृणालिनी गडकरी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १९०.
**मी धार्मिकता शिकवतो धर्म नाही :** ओशो. अनुवाद - मृणालिनी गडकरी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १५२.
**ध्यान सूत्र :** ओशो, अनुवाद - माधव कर्वे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १८६.
**झुंज कॅन्सरशी :** अनुवाद - द. कृ. गोसावी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १०६.
**मायकेल क्रिश्टन (कॉंगो) :** अनुवाद - अरुण मांडे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २५२.
**मंदिरा :** अनुवाद - तारा पंडित, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २०८.
**ऑपरेशन गुलमोहर :** अनुवाद - शरयु पेंडणेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २५०.
**अणसार :**अनुवाद - अंजनी नरवणे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २८४.
**द फोर्थ के :** अनुवाद - वनिता सावंत, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ३०४.
**नॉट अ पेनी मोअर नॉट अ पेनी लेस :** अनुवाद - अंजनी नरवणे, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २०४.
**द प्रॉडिगल सन :** अनुवाद - मंगला निगुडकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ३०४.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# विक्रमी विनोदवीर बुवा



भा. ल. महावळ

४ जुलै १९२६ रोजी जन्माला आलेल्या विनायक आदिनाथ बुवा या बालकानं, ४ जुलै २००० या दिवशी पंच्याहत्तराव्या वर्षात पदार्पण करावं हे गणिताला धरून आहे.

पण या बालकाचं, सुरवंटाचं फुलपाखरात होतं तसं, वि. आ. बुवा या विक्रमी विनोदी लेखकात रुपांतर होईल हा अंदाज कोणत्याही हिशेबात बसणारा नव्हता.

'विनोदावर भाषण करणं म्हणजे बागेतील फुलपाखरू टाचणीनं टोचून टेबलावर लावणं होय' असं पु.ल.देशपांडे यांचं विधान आहे. पुलंनी विनोदात फुलपाखरू पाहिलं. फुलपाखराची उपमा तशीच पुढं, म्हणजे मागं, नेली तर बुवांचं बालपण सुरवंटाचंच होतं!

**बुवांचं बालपण**

बुवा श्रीक्षेत्र पंढरपूरचे. सत्पुरुष सिद्धेश्वर महाराज यांच्या वंशात, कर्मठ देशस्थ ब्राह्मण घराण्यात बुवांचा जन्म झाला. बुवांचं बालपण, धार्मिक वाङ्मय, संस्कृत भाषा, ब्रह्मकर्म, संतसाहित्य, कीर्तन-निरूपण-प्रवचन-श्रवण या साऱ्यांनी व्यापलेलं होतं.

अध्यात्म, शास्त्र व गणित या विषयांना विनोद नुसता वर्ज्यच नाही तर हानीकारक आहे. या बालपणाच्या पार्श्वभूमीवर बुवांचं विनोदी लेखक होणं हे हवामानखात्याच्या बेभरवशाच्या अंदाजातही बसणारं नव्हतं.

सुप्रसिद्ध नाटककार, चित्रपटकथाकार व विनोदी लेखक वसंत सबनीस यांनी बुवांविषयी लिहिलं आहे, 'संतांच्या भूमीतील हा माणूस संतांच्या संगतीत राहण्याचं सोडून समर्थ रामदासांच्या भाषेत, टवाळात जाऊन बसला. विनोदाची पताका खांद्यावर घेऊन: हास्यनामाचा गजर करीत बुवांची दिंडी चालली आहे.'

विनोदाची फुलपाखरं उडवणाऱ्या लेखकाचं हे गंभीर व रुक्ष बालपण तसं सुरवंटाचंच नाही काय?

**बुवांतील लेखकाचा जन्म**

१९४४ साली, म्हणजे वयाच्या अठराव्या वर्षी, घरच्या आर्थिक अडचणीमुळे, बुवा मुंबईच्या व्हीजेटीआय् या इंजिनिअरिंग कॉलेजात नोकरीला लागले. बुवा सांगतात त्याप्रमाणे त्यांना साहित्याची, लेखनाची आवड वगैरे काहीही नव्हती. पण सुंदर अक्षर, सजावटीचं बऱ्यापैकी ज्ञान या जोरावर बुवांनी हौसेपोटी, 'इंदुकला' या नावाच्या हस्तलिखित दिवाळी अंकाला जन्माला घातलं.

संपादक बुवांनी आपल्या हस्तलिखित दिवाळी अंकासाठी, त्या काळी म्हणजे १९५० सालापूर्वी,

**अभीष्टचिंतन**



जन्म : ४ जुलै, १९२६

**अमृत महोत्सवी वर्षात पदार्पण**



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनंत काणेकर, महादेवशास्त्री जोशी, चिं.वि.जोशी, दुर्गा भागवत, माधव मनोहर, गो.नी.दाण्डेकर, शांता शेळके हे ज्येष्ठ व श्रेष्ठ व शं. ना. नवरे, जयवंत दळवी, विजय तेंडूलकर, द.मा. मिरासदार या समवयस्क व श्रेष्ठ साहित्यिकांचं लेखनसाह्य मिळवलं.

वुवांच्या व्यवस्थितपणामुळे हे सर्व हस्तलिखित दिवाळी अंक आजही वुवांच्या संग्रही सुखरूप आहेत. या मासिकांवरचे काही मान्यवरांचे अभिप्राय असे होते :

'इंदुकलेत, संपादक वुवांनी विविध प्रकारचे साहित्य दिले आहे. विचार संपत्तीच्या अंतरंगाला कलापूर्ण वहिरंगाची जोड मिळाली आहे. म्हणून इंदूकलेचा सहवास अधिक विलोभनीय वाटतो.' हा अभिप्राय आहे सेनापती तात्या वापटांचा. अभिप्रायाखाली पां. म. वापट ३१-१०-१९४९ अशी सही व तारीख आहे.

आणखी एक अभिप्राय आहे स्वातंत्र्यवीर तात्याराव सावरकर यांचा.

'नुसते सुंदर हस्ताक्षर आणि सजावट पाहूनच अंक आपोआप वाचावासा वाटतो. वाचू लागताच लेखांची निवड आणि चटकदारपणा ह्यांमुळे समग्र वाचल्यावाचून राहवत नाही. आपण लिपीशुद्धीच्या सुधारणेपैकी 'अ' ची वाराखडी वापरता हे पाहून आनंदलो.'

अभिप्रायाखाली 'वि.दा.सावरकर' ही स्वाक्षरी व ५-११-१९४९ हा दिनांक आहे.

दिग्गजांचे हे सर्व अभिप्राय त्यांच्या त्यांच्या अक्षरातील आहेत.

आणखी दोन अभिप्राय उतरवतो.

'हस्ताक्षर फारच चांगले आहे. चित्रे छानदार असून सजावट उत्तम आहे. छापून प्रसिद्ध झालेल्या दिवाळी अंकापेक्षा यातील मजकूर अधिक सरस आहे.'

**पां. वा. गाडगीळ, २६-११-१९४९**

'इंदुकला वाचल्यावर वुवांची उच्च अभिरुची, कलादृष्टी आणि वाङ्मय प्रेम यांची प्रचीती येण्यास फार वेळ लागत नाही. या अंकात त्यांनी जो व्यावहारिक शब्दकोश स्वतः रचला आहे तो वाचला की त्यांची विनोदवुद्धी, मार्मिक दृष्टी आणि विकसित अभिरुची यांची आल्हाददायक कल्पना येते.'

**प्रभाकर पाध्ये, २४-१०-१९४९**

याखेरीज अनंत काणेकर, कृ. पां. कुलकर्णी, म.म.पां.वा. काणे, श्री.शं.नवरे, कुसुमावती देशपांडे, ग. त्र्यं. माडखोलकर वगैरेंचे अभिप्राय आहेत.

पंचविशीतील वुवांना हे अभिप्राय, आशीर्वाद ठरले.

इंदुकलेच्या अंकात वुवांनी 'व्यावहारिक शब्दकोश' या शीर्षकाखाली अडीचशे शब्दांच्या विनोदी व्याख्या दिल्या होत्या. उदाहरणार्थ - वाटाघाटी म्हणजे फिसकटण्यापूर्वी करावयाची वोलणी, राज्यपालपद म्हणजे नको असलेल्या पुढाऱ्याची करावयाची नसवंदी, राजदूत म्हणजे परदेशात स्वतःच्या देशासाठी प्रामाणिकपणानं खोटं वोलणारा माणूस ... वगैरे वगैरे.

प्रभाकर पाध्ये वुवांना म्हणाले, 'तुमच्या या व्यावहारिक कोशाची एक प्रत करून द्या. मी हा कोश तुकड्या तुकड्यानी रविवारच्या नवशक्तीतून प्रसिद्ध करतो. यापुढे दर रविवारच्या नवशक्तीत तुम्ही लिहा.'

१९५० साली प्रभाकर पाध्ये यांच्या उत्तेजनावरून वुवा लिहू लागले.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



## वि. आ. बुवा लिखित पुस्तके

१. अकलेचे तारे
२. अकलेचे दिवे
३. एक ना धड
४. खटाटोप
५. उगीच काही तरी
६. आणखी एकाची भर
७. असून अडचण नसून खोळंबा
८. अडाण्याचा गाडा
९. फापट पसारा
१०. द्या टाळी
११. आधुनिक पंचतंत्र
१२. तुका म्हणे त्यातल्या त्यात
१३. पुस्तकाला नाव पाहिजेच कशाला !
१४. चौदावे रत्न
१५. एकेक चमचा
१६. म्हटलं तर आहे म्हटलं तर नाही
१७. नुकतंच सोळावं संपून सतरावं
१८. ढवळाढवळ
१९. नळाचं पाणी
२०. तीन दांडेकर आणि एक मालन
२१. एकविसावा नग
२२. बावीस कॅरेट
२३. अव्वाच्या सव्वा
२४. पोपटपंची
२५. बुवा पंचविशी
२६. अगा जे घडलेचि आहे
२७. हे पुस्तक आवडावे
२८. एकापेक्षा एक (एक ना धड)
२९. कसचं कसचं
३०. आम्ही आपले वगैरे
३१. किंचीत् किंचीत्
३२. झुरळ आणि रंभा
३३. टॉप आणि कडक
३४. मी तर बावा गाढव आहे
३५. चिंतू दि ग्रेट
३६. एच. एम. सी.
३७. कालिदास, पिंपळ आणि रामायण
३८. घडलं म्हणून लिहिलं
३९. निवडक नवरे
४०. वासुदेव शेख महंमद वगैरे वगैरे
४१. निवडक बुवा
४२. त्याचं काय आहे
४३. घोड्याला खोकला झाला
४४. बाईराव बाईसिंग मर्द
४५. वाघ साबुदाण्याची खिचडी खातो
४६. वि.सू., ता.क., ट.ख.नि.
४७. श्री. असो, श्री. चालेल वगैरे
४८. चोरी किया तो डरना क्या
४९. पुढे चालू ठेवू
५०. प्रेमाची टूल बॉक्स
५१. विल दिया दर्द लिया
५२. साहेबासन बत्तिशी
५३. टिकोजीराव
५४. मल्लिनाथी
५५. गरमागरम
५६. हल्कंफुल्कं
५७. गप्पागोष्टी
५८. झकास गोष्टी
५९. पसंत आहे
६०. साठ पूर्ण
६१. एकसष्टी
६२. इकडे गंगू तिकडे अंबू
६३. कशासाठी पैशांसाठी
६४. काही जनातले काही मनातले
६५. छोटी हजेरी
६६. धाडसी बेधडक
६७. पडल्या पडल्या
६८. फिरकी
६९. भालू देशपांडे
७०. ॐ मित्राय नमः
७१. सुरस आणि चमत्कारिक कथा
७२. पुस्तक बाहत्तरी
७३. जमवाजमव
७४. खिडकी
७५. असे नवरे अशा बायका
७६. पापाकडून पपाकडे
७७. मेहुणी वयात येते
७८. प्रेमाची ESSO स्टाईल
७९. प्रेमाची ऐशी की तैशी
८०. लहानपणच्या प्रेयसी
८१. बायको मित्र शेजारी
८२. ऑाटतंत्रम्
८३. सखी शेजारिणी
८४. बुवाबाजी
८५. खट्याळ काळजात घुसली
८६. झीनत मंत्रीमंडळ
८७. लग्न आणि घटस्फोट
८८. मी आणि मेनका
८९. बडबड
९०. एकसारखा देव प्रसन्न
९१. तुमची अंडी आमचं आम्लेट
९२. स्वप्नांचं दुकान
९३. एकच हृदय दोनच डोळे
९४. खाजगी की ऐशी तैशी
९५. माझी बुवाबाजी
९६. अथ बुवा उवाच
९७. अफाट बाबूराव
९८. खुमासदार
९९. तेचि पुरुष भाग्याचे
१००. शंभरावं पुस्तक
१०१. कमी तिथं आम्ही
१०२. खिडकी सहवास
१०३. सातजणांवर प्रेम
१०४. ये बैला मार मला
१०५. मम्मी मराठी शिकवते
१०६. वरं ब्रूहि
१०७. मी श्रीमंत पेशवे
१०८. मूर्खाय नमः
१०९. परलोकचा वृत्तान्त
११०. शूर नवरे
१११. प्रेमाकडून प्रेमाकडे
११२. मी आणि फोर्ड
११३. बुवा उवाच
११४. रामा सरवू
११५. बैल घोडा
११६. सभ्य माणसं
११७. सर्वांसाठी गीता
११८. विज्ञान सर्वत्र '०' ते
११९. फजितीचा सुवर्ण महोत्सव

*१२०, १२१, १२२. १२३. १२४, १२५. १२६ पुस्तकांसाठी साहित्य प्रकाशकाकडे पाठविले आहे. आणखी १२ पुस्तकांसाठी साहित्य घरात तयार आहे.*



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

पण दर रविवारी लिहा म्हंटल्यावर बुवा आटवड्याच्या साती दिवसांचे रविवार करतील, वर्षाच्या तीनशे पासष्ट दिवसांत रविवार पाहतील आणि सलग आजपर्यंत म्हणजे पुरी पन्नास वर्षं लेखणीतून विनोदाचा झरा वाहता ठेवतील हे पाध्यांना काय माहीत? कोणतीही व कसलीही आकडेमोड करून हा असा हिशोब कोणालाही मांडता आला नसता.

लेखक म्हणून बुवांचा जन्म १९५० साली झाला. या घटनेला बुवांच्या वयाच्या पंच्याहत्तरीत पन्नासावं वर्ष होत आहेत.

**बुवांचे मुसळधार लेखन**

'अकलेचे तारे' हे बुवांचे पहिले पुस्तक १९५३ साली प्रसिद्ध झाले. १९९३ साली शंभरावे पुस्तक 'शंभरावे पुस्तक' या नावानेच प्रसिद्ध झाले. 'फजितीचा सुवर्ण महोत्सव' हे ११९ वे पुस्तक १९९९ साली प्रसिद्ध झाले. बुवांच्या १९ पुस्तकांच्या मुद्रणप्रती तयार आहेत. म्हणजे बुवांच्या पंच्याहत्तराव्या वर्षात त्यांचे १२५ वे पुस्तक प्रसिद्ध होणारच होणार!

बुवांची प्रसिद्ध झालेली सर्वच्या सर्व ११९ पुस्तके विनोदी म्हणजे केवळ विनोदी आहेत. मराठी भाषेतील हा विक्रम आहे.

बुवांच्या शंभराव्या पुस्तकाच्या प्रकाशनप्रसंगी कविवर्य शंकर वैद्य लिहितात, 'विनोदी पुस्तकांची ही संख्या अचंबा करायला लावणारी व जीव दडपून टाकणारी आहे. बुवा एवढे लिहू शकले याचे रहस्य त्यांना निसर्गाकडून मिळालेल्या प्रतिभेत, त्यांच्या आत्मविश्वासात आणि या गुणांना त्यांनी जी परिश्रमाची व शिस्तशीर दिनक्रमाची जोड दिली त्यात आहे.'

सौ. (प्रा.) विशाखा ही सून, बुवा या आपल्या सासऱ्यांविषयी लिहिते, 'सकाळपासून संध्याकाळपर्यंत स्वतःच्या वैयक्तिक कार्यक्रमाची वेळ बाबांनी ठरवून घेतलेली आहे. आपण स्वतःवर घातलेल्या सीमारेषेपलीकडे ते सहसा जात नाहीत. रात्री व्याख्यानाहून कितीही उशिरा आले तरी त्यांचा दिवस रोजच्या वेळेलाच सुरू होतो. सकाळी सातपासून त्यांच्या लेखनाला-वाचनाला सुरुवात होते. वाचन, मनन, चिंतन व लेखन या त्यांच्या गोष्टी अव्याहत, रात्रीच्या साडेनऊ या त्यांच्या ठरलेल्या झोपेच्या वेळेपर्यंत सुरू असतात.'

बुवांचा त्यांच्या सुनेनं लिहिलेला हा कार्यक्रम १९९३ सालचा. म्हणजे १९८६ सालच्या वि. आ. बुवांच्या सेवा निवृत्तीनंतरचा आहे.

सेवानिवृत्तीपूर्वीच्या बुवांच्या दिनक्रमाविषयी वसंत सवनीस ('मीही मूळचा पंढरपूरचा. पंढरपूरच्या वाळवंटात खेळलेला व चंद्रभागेच्या पाण्यावर पोसलेला' इति सवनीस) लिहितात, 'रामदास स्वामींनी केलेला उपदेश संभाजीनेही अनुसरला नाही. पण बुवांनी मात्र 'दिसामाजि काहीतरी ते लिहावे' ही ओळ घट्ट धरून टेवली आहे. पंढरपुरात पांडुरंगाचे पुजारी भल्या पहाटे उठून काकडआरती करतात. बुवांनी सरस्वतीची काकडआरती करण्याचे व्रत घेऊन तीच प्रथा चालवली असावी. बुवा रोज पहाटे चार वाजता उठून लिहितात.'

बुवांचा सवनीस-कथित कार्यक्रम त्यांच्या नोकरीच्या काळातील आहे.

मीही व्हीजेटीआय् मध्येच नोकरीला होतो. मी पाहिलं आहे की बुवा कॉलेजच्या वेळात, कॉलेजमध्ये, एक शब्दही लिहीत नसत. बुवांनी आपली नोकरी, आजच्या पाट्या टाकण्याच्या काळाला न शोभावी इतक्या समरसतेने व निष्ठेने केली. संस्थेचे पडेल ते काम करणे हे आपले कर्तव्यच



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आहे त्यात विशेष काय हे बुवांचे नोकरीमागचे साधे व सरळ तत्त्वज्ञान होते. बुवा वयाच्या अठराव्या वर्षी, मॅट्रिकही होण्यापूर्वी नोकरीला लागले होते. बुवांच्या निरलस नोकरीची दखल घेऊन व्हीजेटीआय् ने रसायनशास्त्र विभागात, खास बुवांच्यासाठी फोरमनची वरची जागा निर्माण केली. फोरमनची जागा असलेला हा महाराष्ट्रातील एकमेव रसायनशास्त्र विभाग असावा! आज ती जागा तिथे आहे का बुवांच्या निवृत्तीनंतर ती रद्द झाली याची मला कल्पना नाही.

बुवांच्या साहित्यिक महाउद्योगाची पूर्ण कल्पना त्यांच्या ११९ प्रसिद्ध पुस्तकावरून येणार नाही. त्यासाठी अधिक माहिती देणं ज़रूर आहे.

बुवांनी आकाशवाणीवर सहाशेहून अधिक कार्यक्रमासाठी लेखन केले आहे. व्याख्याने-कथाकथन यांचे शेकडो कार्यक्रम केले आहेत. अनेक नियतकालिकात बुवा वर्षानुवर्षे साप्ताहिक स्तंभलेखन करत आहेत. हे असे स्तंभच दीड हजाराहून अधिक आहेत.

हा सगळा साहित्यिक व्यवहार स्तंभित करणारा व या 'बुवाला, जादूच्या अंगठीसारखी, जादूची लेखणी तर सापडलेली नाही ना ?' असा संशय उत्पन्न करणारा आहे.

### बुवांच्या लेखनाचे विषय

बुवांना लेखनाला विषय कधीही कमी पडत नाहीत. बुवा दररोज कात टाकत असतात. दररोज नवे करकरीत होत असतात. 'दररोजच्या वर्तमानपत्रात मला विषय भेटतात. लोकलच्या प्रवासात विषय सहप्रवासी पुरवतात. मुला-सुनेच्या संभाषणातून विषय सुचतात. भेटायला येणारी माणसं विषय आणतात. आपण नवीन वाचत असतो, त्या वाचनात विषय दिसतात असं बुवा मला नेहमी सांगतात.

बुवांच्या लेखनविषयातील विविधता हेवा करण्यासारखी आहे. या विविधतेमुळेच बुवा पन्नास वर्षानंतरही ताज्या दमाचे लेखक आहेत.

'अकलेचे दिवे' (किंमत पावणे दोन रुपये, १९५४) या बुवांच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत अनंत काणेकर लिहितात, 'या आपल्या पहिल्या पुस्तकात बुवांनी खुद्द परमेश्वराचीच मुलाखत घेतली आहे. 'ठराविक प्रश्न व ठराविक गोलमाल उत्तरे' अशी ठरीव मुलाखतीची बुवांनी ईश्वर साक्षीने टर उडवली आहे.

'बसमध्ये कुठे बसावे?', 'हॉटेलातील बिल चुकतं करणं', 'माझ्या पैसे काढण्याच्या क्लृप्त्या' या विषयावरचे या पहिल्याच पुस्तकातील लेख आजही मार्गदर्शक व स्वत:चेच अप्रकट मन प्रकट करणारे वाटतील.

'माझा अज्ञानकोश' असा बुवांचा लेख या पहिल्या संग्रहात आहे. 'मुस्कराहट या शब्दाचा अर्थ मधुर हास्य आहे हे जेव्हा मला कळले तेव्हा हा शब्द ज्याने शोधून काढला त्याच्या मुसक्या आवळून आणि रहाटाला बांधून विहिरीत सोडून द्यावे असे मला वाटले' या बुवांच्या व्युत्पत्तिपूर्ण शिक्षेला अनंत काणेकरांनी दाद दिली आहे.

'द्या टाळी' या बुवांच्या दहाव्या पुस्तकाला (किंमत रु. ३, १९६०) आचार्य अत्र्यांची प्रस्तावना आहे. आचार्य अत्रे लिहितात, 'श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्या पांडित्यपूर्ण विनोदाचा काळ आता संपला.'

दत्तू बांदेकरांनी विनोदाला दिवाणखान्यातून उचलून रस्त्यावर आणून सोडले आहे. चाळी, गिरण्या, हॉटेल, सलून, पानपट्टीची दुकाने, जुगारी व हातभट्टीचे अड्डे या सृष्टीमधून विनोद वावरायला लागला आहे. श्री. बुवा ह्यांनी विनोदाच्या ह्या नव्या अवताराची चिन्हे बरोबर ओळखली आहेत. प्रचलित



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

राजकारणाचे, साहित्याचे व समाजकारणाचे त्यांना उत्तम आकलन आहे.

'द्या टाळीतील' एक किंचित् कविता आचार्य अत्रे यांनी उद्धृत केली आहे. ती अशी आहे -

एकदा मी 'सूर्यचंद्राना' विचारले,

'हे असं
वर्षानुवर्ष तुम्ही
किती काळ
भ्रमत राहणार?'

सूर्यचंद्र खिन्नपणे म्हणाले,

'यावच्चंद्र दिवाकरौ !'

मी या प्रस्तावनांचा उल्लेख करतो आहे ते बुवांच्या विषयांची अनेकता व आवाका स्पष्ट करण्यासाठी.

'बुवांचा विनोद हा प्रचलित विषयाशी निगडीत असतो' ही आचार्य अत्र्यांची प्रशस्तीची टिप्पणी ध्यानी घेतली की बुवा, पन्नास वर्षानंतरही पंचविसाव्या वर्षातील तरणा विनोद कसा साधतात याचे रहस्य उलगडते. बुवा गेली पन्नास वर्षे लिहीत असले तरीही लेखक बुवा आजचे आहेत, त्यांच्या लिखाणाचे विषय आजचे, प्रचलित आहेत, नव्हे. उद्याचेही आहेत.

'एक ना धड' (किंमत २ रु., १९६१) या पुस्तकाच्या प्रस्तावनेत, बुवांच्या विनोदाविषयी, चिं. वि. जोशी लिहितात, 'जनज्ञानाचा सामोसा' या लेखात आचार्य अत्र्यांना रौप्यपदक मिळाल्यानंतर 'भवसक्ती' दैनिकाला वेगवेगळ्या लेखकांची आलेली नमुनेदार पत्रे देऊन, सामान्य जनतेच्या चोंबडेपणाचे प्रदर्शन बुवांनी मांडलेले आहे. 'चकणाचूर' ही धोंडूनंदणाची लघुकथा सात तवे फोडून आरपार निघून जाणाऱ्या बाणासारखी तीक्ष्ण आहे. तिचे स्वच्छंद शुद्धलेखन म्हणजे हल्लीच्या तरुण पिढीचे मुक्तबंध अशुद्ध लेखनाचे तिखट विडंबन आहे.

बुवा यांचा सर्व विनोद शुद्ध 'मऱ्हाठी' आहे. गीतेपासून आधुनिक शास्त्रीय शोधापर्यंतची त्यांना माहिती आहे आणि तिचा हास्योत्पादनाकडे उपयोग करण्याचे सामर्थ्य त्यांच्याकडे आहे.'

गीतेपासून आधुनिक शास्त्रीय शोधापर्यंतची माहिती मिळवण्यासाठी बुवा सतत वाचन व चिंतन करत असतात. ज्ञान मिळवून देणारी उत्तमोत्तम पुस्तके बुवांच्या चार कपाटे भरून राहिलेल्या ग्रंथसंग्रहात आहेत. बुवांच्या या ग्रंथसंग्रहाचा लौकिक महाराष्ट्र टाईम्सपर्यंत पोचला. म. टा. चे बुवांना त्यांच्या ग्रंथसंग्रहाविषयी लिहिण्याचं पत्र आले. म.टा. (१७.१०.१९९३) मधील बुवांचा लेख वाचावा असा आहे. बुवांच्या विनोदी लेखात विविध विषयांवरची माहिती गुंफलेली असते. या माहितीमागे बुवांचे चौफेर वाचन आहे.

य. गो. जोशी यांनी 'आणखी तुकाची भर' (किंमत ३ रु., १९५८) या पुस्तकाच्या प्रस्तावनेत लिहिले आहे, 'बुवांच्या मनातील 'काही शंका' सर्वांच्याच मनात येतात. त्यांना मुद्देसूद उत्तरे देता येत नाहीत. 'शिष्ट लोकांची चेंगट संभाषणकला या लेखात 'शिष्टपणा' चांगला दाखवून बुवांनी सामाजिक कार्यच केले आहे. 'नारदाचे पुनरागमन' या लेखात थिएटर, भगिनी मंडळ, कॉलेज व सरकारी कचेरी या ठिकाणी नारदांना फिरवून त्या ठिकाणची वागणूक व व्यवहार याचे उत्तम विडंबनामार्फत चित्रण बुवांनी केले आहे. 'माझा दिवाळी अंक' हा लेख बहारीचा आहे. 'एकाच दिवसात सगळ्या अंकाची तडाखेबंद विक्री झाली, तीन आणे रत्तल या भावाने' या वाक्यातील खोच दिवाळी अंक काढणाऱ्यांना छान समजेल. 'नया पैसा' हा हिंदी चित्रपटाचे मूल्यमापन करणारा लेख अलौकिक आहे.'



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वरील सर्व प्रस्तावना बुवांच्या पहिल्या पाचदहा पुस्तकांच्या आहेत. याचा अर्थ बुवांची नजर प्रथमपासून चौफेर आहे. त्यांच्या लेखणीला जीवनाच्या सर्व अंगातील विसंगती सापडते. विसंगती हा सर्व विनोदाचा पायाआहे. विनोदकार बुवांना नव्या नव्या विसंगती सहज गवसतात हे स्पष्ट दिसते.

**बुवांच्या विनोदाबाबतची माझी निरीक्षणे**

बुवांनी वापरलेल्या विनोदाचे काही खास बुवांचेच असे प्रकार खालीलप्रमाणे आहेत :

१) प्राचीन सुप्रसिद्ध पुस्तकांचा ढाचा कायम ठेवून त्या फॉर्ममध्ये बुवा स्वतःच्या कथा व लेख लिहितात.

उदाहरणार्थ - बुवांची 'लाथा सप्तशती'. सात वाहनाचा 'गाथा सप्तशती' हा प्राकृत भाषेतील ग्रंथ मराठीच्या अभ्यासकात प्रसिद्ध आहे. त्या ग्रंथाच्या धाटणीने बुवांनी आधुनिक प्राकृत भाषेत शंभर श्लोक लिहिले आहेत. त्या श्लोकांचं बुवांनी बहारदार विवरणही केलं आहे. प्रेमज्वरानं तापलेला उपाशी प्रेमवीर, अप्राप्य प्रेयसीला उद्देशून आधुनिक प्राकृत श्लोकातून प्रेमयाचना करतो. तप्त म्हणजे प्रेमानं तापलेला, पेटलेला, लाथाशती म्हणजे त्याला प्रेयसीकडून मिळालेल्या शंभर लाथा. मूळ 'गाथा सप्तशती' वर बुवांची 'लाथा सप्तशती'.

दुसरं उदाहरण आधुनिक पंचतंत्राचं. मूळ पंचतंत्राचा सांगाडा वापरून बुवांनी पन्नास कथांचं आधुनिक पंचतंत्र, कामचलाऊ संस्कृतात लिहिलं आहे.

याच पद्धतीनं बुवांनी मूळच्या सिंहासन बत्तिशीवर 'साहेबासन बत्तिशी', वेताळ पंचविशीवर 'गद्धेपंचविशी' व इशावास्य उपनिषदावर 'उषावाश्या उपनिषद' हे लेख बेतलेले आहेत.

बुवांनी मूळ साहित्याचं अवमूल्यन केलं नाही. बुवांचे लेख व मूळ साहित्य यांचा आशयाच्या दृष्टिकोनातून काहीही संबंध नाही. एकाच चालीवर, दोन पूर्ण भिन्न अर्थाच्या गीतांची रचना करावी असा हा प्रकार आहे.

२) साने गुरुजी व बाबुराव अर्नाळकर हे १९४५-१९५० या काळातील बालवाचकांचे आवडते लेखक होते. या दोघांचा मिलाफ करून एका दहा-बारा वर्षांच्या मुलाकडून बुवांनी 'खंड्याळ्याच्या खडकातील खून' ही रहस्यकथा लिहवून घेणं स्वाभाविकच होतं. बुवांनी एक गोड गोड खूनकथा लिहिली. त्या कथेतील पोलीस इन्स्पेक्टर म्हणतो, 'मकरंद, कशाला रे तू लताचा खून केलास? या हातानी खून न करता तुला कबीरासारखे शेले नसते का रे विणता आले ? सावता माळी प्रमाणे तू भक्तीचा मळा का रे फुलवला नाहीस ?'

चोर लताला म्हणतो, 'ताई, तुमची गोड आठवण म्हणून मला तुमचे दागिने लुटू द्याल का?'

लताही प्रतिसाद देते, 'भाऊराया, लूट रे लूट. तू दागिने लूट. मी तुला दागिने दिल्याचा आनंद लुटते.'

३) 'मेघदूत - एक तिरकस परीक्षण' या लेखात बुवांनी प्राध्यापकी पठडीतील क्लिष्ट भाषेत लिहिणाऱ्या समीक्षकांची टोपी उडवली आहे. असे समीक्षक, आपले 'नवे' मानदंड लावून उत्तम कलाकृतीना सामान्य ठरवतात.

बुवांनी थेट कालिदासाच्या मेघदूतावर हल्ला चढवून, क्लिष्ट, अनाकलनीय व अतार्किक फूटपट्ट्या लावून मेघदूताला अतिसामान्य ठरवले आहे ! भोंगळ व भाषाजड समीक्षकांची बुवांनी उडवलेली भंबेरी मुळातून वाचण्यासारखी आहे.

४) 'जाऊ तिथं खाऊ' हे नाटक बुवांनी लोकनाट्याच्या वळणानं लिहिलं आहे. सरकारी नोकराला माळरानावर नेमा नाहीतर सहारा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वाळवंटात नेमा, तो पैसा खाणारच खाणार! शाहीर अमरशेख यांनी बुवांचं हे लोकनाट्य मागणी घालून केलं व याचे चारशेच्यावर प्रयोग झाले.

५) हिंदी सिनेमातील असंभवनीयता, कथानकातील विस्कळीतपणा, योगायोगांची रेलचेल, पात्रांचे ठरीव संवाद व ठराविक प्रतिक्रिया, तर्कांचा पूर्ण अभाव हा मसाला बुवांना कायमचा पुरणारा आहे. हिंदी सिनेमांची टिंगल करणारे बुवांचे वीस एक लेख असतील. एक हिंदी सिनेमा दुसऱ्या हिंदी सिनेमाप्रमाणे असतो. पण बुवांचा प्रत्येक लेख वेगळा आहे.

६) मानवेतर प्राणी मानवाप्रमाणे वागू लागले तर काय घडेल यावरच्या अद्भुत विनोदी कथा बुवा लिहितात. शेळीला मंगळ असल्यावर, शेळीच्या बोकड बापाची मंगळ असलेला जावई शोधताना तारांवळ उडणारच की!

किंवा गरीब हरिणी, तरण्याताठ्या होतकरू वाघाच्या प्रेमात पडल्यावर संसार सुखाचा कसा होणार? हरिणीचे सासू, सासरे, नणंद, दीर हे हरिणीचा हुंडावळी घेण्याकरता टपलेले असणारच!

डास व माशी यांचा आंतरप्राणीय विवाह झाला. पण हा विवाह सफल कसा होणार? माशीला रात्री ओडोमास लावून झोपण्याची सवय झालेली!

७) इहलोकातून परलोकात गेल्यावर एकाच कुटुंबातील माणसं तिथं नेमकी कुठं कुठं राहतात, तिथं भेटल्यावर त्यांचे परस्पर व्यवहार कसे होतात यावर बुवांच्या बऱ्याच कथा व लेख आहेत.

बुवांच्या लेखनविषयाविषयी सारांशानं किंवा तात्पर्यानं लिहायचं तरीही ते विस्तारानंच लिहावं लागेल. काही श्रीमंत लग्नात, बुफेसाठी इतके पदार्थ मांडले असतात की प्रत्येक पदार्थ थोडा थोडा घ्यायचं म्हटलं तरीही आपली थाळी भरून वाहते! बाबुभाई भवानजीच्या साड्यांच्या दुकानात एकच साडी घ्यायची व खरेदी लवकर आटपायची असं ठरवून एखादा नवरा आत गेला तरी त्याला तासभर बाहेर पडता येत नाही. तुम्ही सांगाल त्या किंमतीच्या, रंगाच्या व पोताच्या कतीतरी साड्या विक्रेता तुमच्यापुढं टाकतो! नवरा करेल काय? बुवांच्या लेखनाचा पसारा असाच मोठा आहे. बुवांच्या लेखनाचा विस्तार एवढा अफाट आहे की कॅमेऱ्याच्या एका फ्रेममध्ये बुवांचं लेखनाकाश पकडता येणं शक्य नाही.

**बुवांच्या लेखनविषया विषयी पुढे चालू**

बुवा हे मधुकर पाटकरांच्या आवाजचे परमनंट लेखक होते. पाटकरांनी (१९९३ मध्ये) लिहिलं आहे, 'वाङ्मयातील अश्लीलतेविरुद्ध आवाज उठवण्यात गोडबोले, गाडगीळ व क्षीरसागर (गोगाक्षी) ही मंडळी आघाडीवर होती. या मंडळींनी काही मासिकावर, लेखकांवर खटलेही भरले होते. हा विषय विनोदी पद्धतीनं हाताळण्यास फार चांगला आहे असं वाटल्यावरून मी बुवांशी चर्चा केली. बुवांनी शाकुंतल नाटकाच्या पार्श्वभूमीवर 'कालिदास हाजीर है' या नावाचे अभिरूप न्यायालय लिहिले. फिर्यादी अर्थातच गोगाक्षी होते.

१९५७-५८ साली, हंगेरियन सरकारने इम्रनाजला फाशी दिले. त्यावेळच्या प्रजासमाजवाद्यांना जगातील अडीचशे कोटी मानवी मूल्यांचा उमाळा आला होता. बुवांनी त्या दिवाळीला 'एक इम्रेनाज मरतो आणि पुरून उरतो' हा लेख लिहिला.

कै. दत्तू बांदेकरानंतर नवयुगमध्ये 'रविवारचा मोरावळा' लिहिण्यासाठी आचार्य अत्र्यांनी बुवांना बोलावून घेतले होते.

बुवांनी 'सबकुछ बुवा' या नावाचा एक टाकी दिवाळी अंक काढला होता. त्या अंकात 'जुन्या नव्या नामवंत लेखकांच्या शैलीने एक एक प्रकरण



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

लिहून वुवांनी 'एक एक चमचा' ही कादंवरी सादर केली होती.'

वुवांच्या लेखन प्रकारातील व विपयातील विविधता आणि विपयांचे उत्स्फूर्तरूप यांचे दर्शन कै.मधुकर पाटकरांच्या वरील शब्दातून ध्यानी येते.

वुवांच्या लेखनाच्या वैशिष्ट्याविपयी, स्वतः वहुप्रसव असलेल्या राजा राजवाडे यांनी लिहिलं आहे, 'वुवा वहुश्रुत आहेत. साहित्यावाहेरच्या इतर अनेक विपयांचे त्यांचे ज्ञान प्रचंड आहे. मात्र या ज्ञानाचा वोजा त्यांच्या विनोदी लेखनावर पडत नाही. उलट, वुवांची वहुश्रुतता त्यांच्या विनोदी लेखनात उमटते. त्यामुळे त्यांचे विनोदी लेखन वाचकांच्या ज्ञानात भर घालणारे ठरते.

वुवांचे निरीक्षण सामान्य माणसाच्या जीवन व्यवहारापासून ते साहित्य ते सरकार ते विविध यंत्रणांच्या व्यवहाराशी आणि त्यातील भल्यावुऱ्या प्रवृत्तींशी निगडीत आहे. त्यामुळे, वाचक कुठल्याही क्षेत्रात काम करणारा असला तरी वुवांनी शब्दवद्ध केलेले अनुभव त्यास पुन: प्रत्ययाचा आनंद देवून जातात.'

**वुवा एक व्यक्ती**

वुवांची विनोदी लेखक म्हणून करून दिलेली वरील ओळख वाचकांच्या दृष्टीतून पुरेशी आहे, पुरेशी असावयास हवी.

पण माझी व वुवांची १९६२ पासून उत्तम मैत्री आहे. मी १९६२ मध्ये वुवांच्या व्हीजेटीआय् मध्ये नोकरीसाठी दाखल झालो. 'वुवांचे' व्हीजेटीआय् हा शब्दप्रयोग मी मुद्दाम केला आहे. व्हीजेटीआय् हे इंजिनिअरींग कॉलेज प्रसिद्ध आहे. त्यामुळे 'मी व्हीजेटीआय् मध्ये आहे' हे मी अभिमानाने सांगत असे. मी असे म्हटल्यावर माझे मराठी मित्र अगदी सहजपणे वि. आ. वुवांच्या व्हीजेटीआय् मध्ये का असा प्रतिप्रश्न विचारत. आम्ही सारे केअर ऑफ व्हीजेटीआय् होतो. मराठी माणसाकरता व्हीजेटीआय् ही संस्था केअर ऑफ वुवा होती !

१९६२ ते वुवांच्या निवृत्तीच्या १९८६ या सालापर्यंत, वुवा केंद्रविंदू असलेले, आम्हा वाङ्मयप्रेमी मित्रांचे मंडळ जेवणाच्या सुटीत एकत्र पोळीभाजीचे डवे उघडत असू. साहजिकच, मी वुवांना जवळून पाहिले आहे. वुवांचे व्यक्ती म्हणून असलेले काही विशेप मला जरूर नोंदवावेसे वाटतात. हे विशेप आजकाल दुर्मिळ झाले आहेत. दुर्मिळतेमुळे या विशेपांना गुणांचे स्थान प्राप्त झाले आहे.

अपमार्गाने पैसे मिळवणे, अपमार्गाने पैसे वाचवणे, स्वार्थाकरता उपद्रवकारक खोटे वोलणे या तीनही वावी वुवा कटाक्षाने टाळतात. 'कल्याण ते डोंविवली' हा लोकलचा दुहेरी प्रवास, काही कारणामुळे, वुवांना एकाच दिवशी दोन वेळा कराव लागला आणि नेहमीप्रमाणे तिकीट तपासनीस फाटकावर नसल्यामुळे पहिलं परतीचं तिकीट वुवांच्या खिशात सुखरूप असलं तरीही वुवा दुसरं परतीचं तिकीट काढणार म्हणजे काढणारच ! पहिल्या परतीच्या तिकीटावर पुन्हा एकदा दुसरा परतीचा प्रवास करणं हे वुवांना सरळ सरळ पाप वाटतं.

वुवा पत्रांना वेळच्या वेळी, म्हणजे दुसरेच दिवशी उत्तर देणार, संपादकांना ठरलेल्या तारखेआधी लेख पाठवणार, प्रकाशकांना लेखांची परिपूर्ण मुद्रणप्रत देणार, भापणापूर्वी टिपणं काढणार, हे असं सारं वुवा तुम्ही कसं साधता असं वुवांना विचारलं की वुवा 'जिथल्या तिथं, ज्याचं त्याला, जेव्हाच्या तेव्हा' हा चौदा अक्षरी मंत्र उच्चारतात. शिस्त, व्यवस्थितपणा व टापटीप ही वुवांच्या रक्तात आहे.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'संघर्ष मा गमय, संवाद गमय' हे वुवांच्या वागण्याचं सूत्र आहे. त्यामुळं वुवांना मित्र असतात आणि परिचित व्यक्ती असतात. वुवांना एकही शत्रू नसतो. माझं सुदैव की मी वुवांचा परिचित नाही, मित्र आहे!

कर्ज काढणं व पैसे उसने घेणं हा व्यवहार वुवांना वर्ज्य आहे.

वुवा नम्रपणे स्पष्ट आहेत. वर्तमानपत्रे, मासिके आणि पुस्तके घरी नेण्यास आजिवात मागू नयेत अशी स्पष्ट विनंती आहे. वरील विनंती वाचूनही जे कोणी मागतील त्यांनाही आणि 'आम्हाला हा नियम लागू नाही' अशी प्रेमळ हक्काची जवळीक दाखवणाऱ्यांनाही ही विनंती कटाक्षाने लागू आहे. 'क्षमा असावी' अशा मजकुराचा फलक वुवांच्या घरात दर्शनी भागी लावला आहे.

धर्म, तत्त्वज्ञान, साहित्य, भूगोल, इतिहास, संस्कृत, व्याकरण या विषयांची वुवांना आवड आहे. वुवांचा वैयक्तिक ग्रंथसंग्रह या आवडींना धरून आहे.

धर्माची मूलभूत चांगली तत्त्वे घ्यावीत आणि वाह्य आचरण, अवडंवर कर्मकांड फोल आहे या विचारांचा व मुख्यत्वे आगरकर-सावरकर यांच्या सामाजिक व वैज्ञानिक दृष्टिकोनाचा वुवांच्यावर प्रभाव आहे. वुवा हुंड्याच्या विरुद्ध आहेत. वुवांनी आपलं स्वत:चं लग्न साधेपणानं, डामडौलाशिवाय हुंडा न घेता केलं. मुलाचं लग्न करतानाही वुवांनी टिचभर कापड व ग्रॅमभर सोनेही न घेण्याचा उत्तम व्यवहार पाळला.

एकुलत्या एक मुलीच्या लग्नाच्या वेळी वुवा तसे सचिंत होते. कारण वुवांचा वधूपक्ष होता. पण वुवांना मिळालेले व्याही पूर्णपणे वुवांच्या विचाराचे असे लाभले. वुवांच्या विचारसरणीला मुलीच्या विवाहातही गालवोट लागले नाही.

**परमेश्वरापाशी मागणे**

वुवा पंच्याहत्तरीत प्रवेश करत आहेत. अशा वेळी वुवांनी वयाचं शतक पुरं करावं, त्यांना उत्तम आरोग्य लाभावं हे नेहमीचं मागणं आपण परमेश्वरचरणी ठेवायचं. हीच प्रार्थना मी वेगळ्या प्रकारे मांडतो.

मराठी वाचकांना वुवांचे दोनशेवे पुस्तक वाचावयास मिळावं अशी माझी परमेश्वराच्या पायी नम्र विनंती आहे. या वाचकात मी आलोच.

माझा हिशोव मी परमेश्वराला समजावून सांगतो. गेल्या पन्नास वर्षात वुवांची ११९ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत, १८ प्रकाशनाच्या मार्गावर आहेत. म्हणजे पन्नास वर्षात १३७ पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत.

२०० वे पुस्तक प्रसिद्ध व्हायचे तर आणखी ६३ पुस्तके वुवांना लिहावयास हवीत. पुस्तक लिहिण्याच्या सध्याच्या वुवांच्या वेगानुसार ६३ पुस्तके लिहिण्याकरता वुवांना साडेसव्वीस वर्षे लागणार आहेत.

वस्स! वस्स! मागणे एवढेच आहे. वा परमेश्वरा! 'अकलेचे तारे' या आपल्या पहिल्या पुस्तकात वुवांनी तुझी समक्ष भेट घेतली आहे, तुझी मुलाखतपण घेतलेली आहे. वुवांच्या दोनशेव्या पुस्तकाची भेट कृपावंत होऊन तू आम्हांपर्यंत पोचव.



भा. ल. महावळ
१७, चंद्रविजय हौ.सोसा., लो.टिळक रस्ता, मुलुंड (पू.), मुंबई ८१. फोन : ०२२-५६४१९४३.



अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

 **स्वागत** 

**डॉ.भीमरावजी रामजी आंबेडकर :** चांगदेव भगवानराव खैरमोड, सुगावा प्रकाशन, पुणे. पृष्ठे २५६.
**रिपब्लिकन खासदारांकडून दलित जनतेची उपेक्षा :** संपादन : विलास वाघ, सुगावा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९४.
**सेक्युलॅरिझम प्रबोधनाचा मानदंड :** डॉ.श्रीपाल सबनीस, सुगावा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९०.
**रावणाची सत्यकथा :** रामनगीनी सिंह, अनुवाद-वासंती पुणतांबेकर, सुगावा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ८०.
**ज्ञानदेव व ज्ञानेश्वर :** भारद्वाज, सुगावा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १३०.
**गोळवलकर गुरुजींचा विकृत राष्ट्रवाद :** अरविंद पुराणिक, सुगावा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३६.
**भारतातील मुस्लिम महिला :** डॉ.मलिका मिस्त्री, सुगावा प्रकाशन, पुणे. पृष्ठे २४.
**घर धकले संन्यासी :** शीला निपुणगे, पुष्पक प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८४.
**निशाणी :** क. दि. सोनटक्के, पुष्पक प्रकाशन, पुणे. पृष्ठे १३२.
**आधुनिक मराठी कवितेचं पीकपाणी :** भगवान ठग, महाराष्ट्र अनुवाद परिषद प्रकाशन, कुल्ह्यणा. पृष्ठे १८५.
**वास्नावर :** डॉ. नीलिमा गुंडी, शिव पब्लिकेशन्स, पुणे. पृष्ठे ३६.
**छावा :** शिवाजी सावंत, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पृष्ठे ८६०.
**मानस लहरी :** रमेश तेंडुलकर, असस प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १०४.
**सेतु :** आशा वगे, मौज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे २२०.
**बालकवींच्या कविता तीन संदर्भ :** रमेश तेंडुलकर, मौज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १३४.
**प्रधान मास्तर :** सविता भावे, अमेय प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३२८.
**करमचंद थापर :** अनुवाद यमाजी मालकर, अमेय प्रकाशन, पुणे. पृष्ठे १९१.
**अमृतगाथा :** भाऊसाहेब थोरात, अमेय प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३६२.
**आत्मकथाकार एलकुंचवार :** हर्षलता दाढे, तनुजा प्रकाशन, नागपूर. पृष्ठे ५५.
**आपलं आभाळ :** राम कदम, शारदा प्रकाशन. पृष्ठे ५६.
**उन्हेरे :** राम कदम, शारदा प्रकाशन. पृष्ठे ६०.
**पाच पावलं पश्चिमेकडे :** शालिनी वाटपे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९५.
**नदैन्यं न पलायनम् :** अटलविहारी वाजपेयी, अनुवाद-गंगाधर महांबरे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ११५.
**दहावी - भाषा (मराठी) व्याकरण लेखन :** डॉ.मनिषा वर्वे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे १०७.
**बाई माणसाची अब्रू :** श्री.भा.महाबळ, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे १५७.
**हस्त सामुद्रिक शास्त्राचे अंतरंग :** श्री.कटककर, श्री.पानसे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३६२.
**भारतीय सण आणि उत्सव :** स्वाती कर्वे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४०.
**रिद्धी सिद्धीचा नायक :** श्री.दि इनामदार, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४०.
**श्रीरामरक्षा :** श्री.दि इनामदार, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७१.
**मुक्तीचा येळकोट :** श्री.दि इनामदार, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३२.
**मोतीचे साहस :** मोहन जोशी, भक्ती प्रकाशन, कोल्हापूर. पृष्ठे ३२.
**त्रैलोक्याचे स्वामी :** मोहन जोशी, भक्ती प्रकाशन, कोल्हापूर. पृष्ठे १६८.
**चॉकलेटवाली :** रजनी हिरळीकर, भक्ती प्रकाशन, कोल्हापूर. पृष्ठे ३०.
**अंतर्नाद :** रजनी हिरळीकर, भक्ती प्रकाशन. कोल्हापूर. पृष्ठे ६८.
**असा झाला देश्याचा वट्ट्यावोळ :** जुगलकिशोर राठी, विजयश्री प्रकाशन, अमरावती. पृष्ठे ८०.
**झेप ही अवकाशाची :** सौ. अंजली वापट, कुसुमजाई प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४४.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# डॉ.भालचंद्र फडके यांची समीक्षा : एक दृष्टिक्षेप



डॉ.मनोहर जाधव

डॉ.भालचंद्र फडके यांची विपुल ग्रंथसंपदा आहे. व्यासंगी आणि व्रतस्थ समीक्षक म्हणून त्यांची प्रतिमा असली तरी विविध प्रकारचे लेखन त्यांच्या नावावर आहे. वैचारिक आणि समीक्षात्मक लेखनात विशेप रस असला तरी डॉ.फडक्यांनी ललित लेखनही केलेले आहे. वेगळ्या वाटेवरचे, सामाजिक समस्यांचे कलात्मक चित्रण करणाऱ्या हिंदी चित्रपटासंबंधी त्यांनी वैशिष्ट्यपूर्ण लेखन केले आहे. हे लेखन 'खरंच, माझा देश स्वतंत्र आहे काय?' या पुस्तकात संग्रहित केले आहे. 'आंबेडकर आणि गांधीजी' हे नाटक आणि काही एकांकिका त्यांनी लिहिलेल्या आहेत. आंबेडकर-गांधी यांच्या विचारातील संघर्ष आणि प्राप्त परिस्थितीत या दोन्ही नेत्यांनी घेतलेल्या राजकीय-सामाजिक भूमिका, त्यामुळे निर्माण झालेला ताण-तणाव, वाद-प्रतिवाद अनेक लेखकांना खुणावत राहिला. डॉ. फडक्यांनी या संघर्षातील नाट्य नेमकेपणाने हेरलेले दिसते. आंबेडकरी चळवळीत डॉ.फडक्यांनी उभी हयात घालविली आहे. अस्मितादर्श साहित्य संमेलन असो वा दलित चळवळीने सामाजिक प्रश्नांवर उभारलेले लढे असो, डॉ.फडके यांनी नेहमीच योगदान दिले आहे. अनेक पुस्तकांचे संपादन करून त्यांनी आपल्या मार्मिक साहित्यदृष्टीचा परिचय करून दिला आहे. दलित रंगभूमी, सहा कथाकार, डॉ.आंबेडकरांचे समाजचिंतन ही त्यापैकी काही पुस्तके. अर्थातच त्यात फडके प्रणित संपादनातील शिस्त आणि संदर्भाचा काटेकोरपणा दिसतो. हे ग्रंथ अभ्यासकांना उपयुक्त ठरले आहेत. समीक्षात्मक ग्रंथामुळे तर त्यांच्या विचक्षण दृष्टीचा प्रत्यय येतो. कामाचा वेगाने उरक, स्वभावातील विनयशील गोडवा, स्वीकृत कार्यावरील असीम निष्ठा, अकृत्रिम स्नेहामुळे लाभलेली विद्यार्थीप्रियता, व्यापक सामाजिकतेचे भान, पुरोगामी-प्रगतिशील विचारांची पाठराखण ही डॉ.फडक्यांच्या व्यक्तिमत्त्वाची काही ठळक वैशिष्ट्ये. डॉ.फडक्यांच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त या ठिकाणी त्यांच्या एकूण साहित्यलेखनाचा विस्तृत परामर्श घेणे औचित्याला धरून झाले असते मात्र अलिकडे म.सा.पत्रिकेला आर्थिक विवंचनेमुळे पृष्ठमर्यादा पाळावी लागते. त्यामुळे डॉ.फडक्यांच्या समीक्षा लेखनाचा विचार प्राधान्याने प्रस्तुत लेखात केला आहे.

'कथाकार खानोलकर' (१९७९) या ग्रंथात डॉ.भालचंद्र फडके यांनी चिं.त्र्यं.खानोलकरांच्या कथेचे स्वरूप आणि वैशिष्ट्ये शोधण्याचा प्रयत्न केलेला आहे. आरती प्रभू या नावाने खानोलकरांनी ज्या कविता लिहिल्या त्या कवितेच्या आधारे खानोलकरांच्या कथेचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न डॉ.फडके करतात. कलावंताची संवेदशीलवृत्ती एकाचवेळी अनेक कलाप्रकारातून आणि कलाकृतीतून प्रकटत असते. त्यामुळे लेखकाच्या एका वाङ्मय प्रकारातील आशयवस्तूची मीमांसा करताना त्याने लिहिलेल्या अन्य वाङ्मय प्रकारातील लेखनाचा आधार घेता येऊ शकतो. आकलन, आस्वाद आणि मूल्यमापनाचा हा एक मार्ग आहे, अशी धारणा डॉ.फडके यांची आहे आणि ती बरोबर आहे.

खानोलकरांचे लौकिक जीवन आणि त्यांचे कथालेखन याचा परस्परसंबंध उलगडून दाखवता येतो का, या दिशेनेही डॉ.फडके विचार करताना दिसतात. अर्थातच पूर्वी ज्या समीक्षकांनी खानोलकरांच्या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## अभीष्टचिंतन



**भालचंद्र दिनकर फडके**

**जन्म : १३ मे, १९२५**

**डॉ. भा. दि. फडके साहित्य - संपदा**

१. दलित साहित्य : वेदना व विद्रोह (१९७७)
२. कथाकार खानोलकर (१९७९)
३. मराठी लेखिका : चिता आणि चिन्तन (१९८०)
४. दलित साहित्याची प्रकाशयात्रा (१९८०)
५. फुले-आंबेडकर : शोध व बोध (१९८५)
६. डॉ.बाबासाहेब आंबेडकर (चरित्र) (१९८५)
७. डॉ.आंबेडकर आणि दलित साहित्य (१९८९)
८. डॉ.आंबेडकर आणि गांधीजी (नाटक) (१९९७) (महाराष्ट्र राज्य पुरस्कार)
९. डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीचा परामर्श (१९९६)
१०.डॉ.आंबेडकरांचे लोकशाही विषयक चिंतन (१९९७)
११.खरंच, माझा देश स्वतंत्र आहे काय? (१९९७)
१२.सत्यशोधक पत्रकार (१९९७)
१३.पाणी पेटले आहे आणि इतर एकांकिका (१९९९)

**इंग्लिश :**
१. सिलेक्टेड रायटिंग्ज् अँड स्पीचेस् ऑफ डॉ. बी. आर. आंबेडकर (१९९६)

**संपादने :**
१. सहा कथाकार (१९७५)
२. अरविंद गोखले यांची कथा (१९७९)
३. शांकर कथा (१९८२)
४. दलित रंगभूमी (एकांकिका) (१९८२)
५. डॉ.आंबेडकरांचे समाजचिंतन (१९८९)

**प्रस्तावना :**
१. समुद्रकाठची रात्र
वा.भ.बोरकरांच्या कथासंग्रहास प्रस्तावना.
२. राघववेळ - नामदेव कांबळे यांच्या कादंबरीस प्रस्तावना. (साहित्य अकादमीचा पुरस्कार)
३. अंतस्थ
प्रज्ञा लोखंडे यांच्या काव्यसंग्रहास प्रस्तावना.
४. विमुक्त
दादासाहेब मोरे यांच्या कथासंग्रहास प्रस्तावना
५. प्रदक्षिणा

**सहकार्याने संपादन :**
१. विचारधन - निवडक निबंध (१९६१)
२. काव्यसरिता (कविता संग्रह) (१९६१)

**आगामी प्रकल्प :**
१. मेणबत्ती अजून जळते (आंबेडकर चरित्र)
२. डॉ.आंबेडकरांवरील लेख
३. दूरदर्शन : तंत्र आणि मंत्र
४. तमाशा
५. दलित नाटककार

**डॉ.भालचंद्र दिनकर फडके**
एफ-३, एन्क्लेव्ह नं.३, सर्व्हे नं.१५५/१/७,
एम.पी.१, औंध, पुणे ४११ ००७.
फोन : ५८८५१५४.

साहित्याचा या पद्धतीने शोध घेतला आहे, त्याचाही संदर्भासाठी वापर करतात. खानोलकरांची कथा, कथा म्हणून कशी आहे याची चिकित्सा तर ते करतातच, त्यातील वाङ्मयीन मूल्ये, लेखनशैली याबाबतही ते मतप्रदर्शन करतात. पण खानोलकरांचे केवळ कथावाङ्मय समोर ठेऊन ते आशयकेंद्री चर्चा करीत नाहीत तर वाङ्मयाच्या अभ्यासाला पूरक ठरू शकेल अशा अनेक दिशांचा आणि साधनांचा वापर करून डॉ.फडके निष्कर्षाला येऊ पाहतात.

खानोलकरांच्या कथेचा परामर्श घेताना त्यांनी त्यांच्या कथालेखनाचा कालखंड निश्चित केला आणि प्रारंभीच्या कथा, नंतरच्या कालखंडात कथेचा होत गेलेला विकास आणि पुढे ओसरलेला बहर या दिशेने डॉ.फडक्यांनी काही निरीक्षणे नोंदवली आहेत. महायुद्धोत्तर मराठी कथेच्या पार्श्वभूमीवर डॉ.फडके खानोलकरांच्या कथेचा विचार करतात. कोणत्याही लेखकाचे लेखन एका विशिष्ट सामाजिक, वाङ्मयीन पार्श्वभूमीवर होत





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असते. या पार्श्वभूमीचा लेखकाच्या लेखनावर भला-बुरा परिणाम होत असतो. या परिणामाची चर्चा अर्थातच अभिप्रेत असते. तशी ती डॉ.फडके यांनी केली आहे. '.... खानोलकर कथेचे विक्षिप्त वातावरण उभे करू पाहत होते. 'विक्षिप्त' कथा सिद्ध करण्याचा त्यांचा प्रयत्न पुढेही फारसा यशस्वी ठरलेला नाही' (पृ.५३) अशी खानोलकरांच्या 'विक्षिप्त कथालेखना' च्या धडपडीची नोंद करून 'मराठी कथा प्राधान्याने जे दिसतं त्याचं दर्शन घडविण्यापलीकडे झेप घेऊ शकली नाही. पण गाडगीळ, जी.ए. यांच्याप्रमाणे जे दिसतं त्यामागे जे आहे ते शोधण्यात खानोलकरांना रस वाटतो हे महत्त्वाचे' (पृ.१०५) असा अभिप्राय त्यांनी दिला आहे. अर्थातच या अभिप्रायात खानोलकरांच्या कथालेखनाची झेप प्रकट झाली आहे.

'खानोलकरांना नेहमी मध्यमवर्गीय माणसाची दया येते.' (पृ.५४), 'दुर्दैवाचे दशावतार त्यांना (खानोलकरांना) भोगावेच लागले. त्याची छाया त्यांच्या कथालेखनावर आहे.' (पृ.५८), 'खानोलकरांची कथा प्राधान्याने एखाद्या व्यक्तीच्या अंगाने विकसित होते. एखाद्या व्यक्तीचे मन त्यांचा कुतूहलविषय बनते.' (पृ.६३) डॉ.फडक्यांची ही निरीक्षणे खानोलकर ही व्यक्ती आणि लेखक अशा दोन्ही अंगावर प्रकाश टाकणारी आहे. किंबहुना खानोलकरांच्या व्यक्तीविशेषाची पाहणी ही त्यांच्या वाङ्मयातील व्यामिश्रता उलगडण्यासाठी कामी येऊ शकते, अशी एक शक्यता वरील विधानातून डॉ.फडक्यांनी सूचित केली आहे. लेखकाच्या वाङ्मयाचा विचार या दृष्टीने करता येतो हे खरे असले तरी 'खानोलकरी प्रतिभा' समजून घेण्यासाठी हा प्रयत्न महत्त्वाचा ठरतो. म्हणूनच खानोलकरांच्या कथेत येणारे बुवा, स्त्रीच्या तप्त देहाच्या भीतीचा संदर्भ, कथेतून डोकावणारे मृत्यूसंबंधीचे चिंतन या गोष्टींचा डॉ.फडके साधार वेध घेतात. डॉ.फडके यांची समीक्षा या ठिकाणी जीवनानुभवाच्या संदर्भातील कलाकृतीचे नातेसंबंध शोधते. हा शोध गुंतागुंतीचा असला तरी तो कलाकृतीच्या आकलनासाठी साह्यभूत ठरतो, याबद्दल दुमत असण्याचे कारण नाही.

'मराठी लेखिका : चिंता आणि चिंतन' (१९८०) हा डॉ.भालचंद्र फडके यांचा एक महत्त्वाचा समीक्षाग्रंथ आहे. जवळपास पावणेदोनशे वर्षाच्या प्रदीर्घ कालखंडातील स्त्रियांच्या विविध वाङ्मयप्रकारातील मराठी लेखनाची समीक्षा डॉ.फडके यांनी हिरिरीने केली आहे. या ग्रंथाबद्दल मतभिन्नता आहे हे लक्षात घेऊनही असे म्हणता येईल की, डॉ.फडके यांची धारदार समीक्षादृष्टी अधिक प्रकर्षाने या ग्रंथातून प्रकटलेली आहे. स्त्रियांच्या लेखनासंबंधी डॉ.फडके यांची मते बहुसंख्य लेखिकांना रूचणारी नाहीत. या ग्रंथातील डॉ.फडके यांचे निष्कर्ष कितीही अप्रिय वाटले तरी ते वस्तुस्थितीला धरूनच आहेत हे मान्य करावे लागते. आग्रही प्रतिपादनाची धार डॉ.फडके कुठेही बोथट होऊ देत नाहीत. डॉ.फडके यांच्या मूळातील स्वागतशील वृत्तीचा प्रत्यय या ग्रंथात कुठेही येत नाही' आरंभी आरंभी स्त्रिया जे लिहित त्याचे कौतुक होत असे. आता कौतुकपर्व संपले आहे आणि त्यांचे लेखन कसाला लावून पाहण्याचा आता कालखंड सुरू झाला आहे.'[१] या भूमिकेमुळे त्यांच्यातील कठोर टीकाकार ग्रंथातील पानापानावर भेटतो. स्त्रियांचे कथालेखन, कविता लेखन, आत्मचरित्रपर लेखन, कादंबरी लेखन आणि इतर वाङ्मय प्रकारातील लेखन कशा पद्धतीचे आहे, याची कठोर मीमांसा डॉ.फडके यांनी केली आहे. 'स्त्रियांचे लेखन हे चिंताजनकच आहे' हे निष्कर्षाअंती तयार झालेले मत त्यांनी आपल्या चिंतनातून मांडलेले दिसते. स्त्रियांच्या लेखनासंबंधी एकूणच त्यांनी असमाधान व्यक्त केले आहे आणि असमाधान व्यक्त करताना त्याची यथोचित कारणे



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नोंदविलेली आहेत. जीवनानुभवाकडे पाहण्याचा उथळ दृष्टिकोन, थिटे सामाजिक आकलन आणि लेखिकांचा स्वत:बद्दलचा (गैर) समज, या आणि इतर अनेक कारणांची चर्चा डॉ.फडके करतात. मराठीतील एकूणच साहित्य बहुसंख्येने अशक्त स्वरूपाचे आहे, असेही जाता जाता सुचवितात.

'मराठी लेखिका वर्तमानाला सामोरे जाताना विचकतात. त्यापेक्षा स्वप्नरंजनात दंग होणे त्यांना अधिक आवडत असावे.' (पृ.२३), 'काही मराठी लेखिका का आणि कशासाठी लिहितात तेच कळत नाही.' (पृ.२५), 'मराठी लेखिका अजूनही कसला तरी 'फार्म्युला' घेऊन लिहीत आहे. तिचे लेखन केव्हा स्वयंप्रकाशी होणार याची मला चिंता आहे.' (पृ.२६), 'मराठी लेखिका आत्मकेंद्रित असल्यामुळे त्यांना समाजाच्या वा दुसऱ्याच्या दु:खाचा शोध घेता येत नसावा.' (पृ.२७), 'कथालेखक जे अर्थपूर्ण अनुभव व्यक्त करतो त्या अनुभवात अंगभूत व्यापकपणा असावा. ते अनुभव जीवनाच्या मूलभूत स्वरूपावर प्रकाश टाकणारे आणि मानवी अस्तित्वाचा अर्थ शोधण्याचा प्रयत्न करणारे असावेत या जाणिवेतून विकसित होणाऱ्या कथेशी संवादी असणारी कथा फारच थोड्या मराठी कथालेखिकांनी लिहिली. (पृ.५६) डॉ.फडके यांची ही विधाने पाहिली तर आजदेखील फारशी परिस्थिती बदललेली आहे असे वाटण्याचे कारण नाही. अर्थातच आज काहीअपवाद आहेत, अपवाद तर तेव्हाही होतेच. चर्चा अपवादाची नव्हे, तर एकूण व्यापक पातळीवरील लेखनाची आहे, हे लक्षात घेतले तर वातावरण आजही चिंता करण्यासारखेच आहे. कोणत्या स्त्रियांचे लेखन दर्जेदार आणि कलात्मक आहे, याची दखल डॉ.फडके यांनी घेतलेली आहेच, त्या लेखिकांची जंत्री प्रस्तुत लेखात देण्याचे कारण नाही. कारण त्या लेखिकांनी स्वयंमुद्रा उमटवली आहे आणि त्यांना मान्यताही मिळालेली आहे. अशा स्त्रियांची संख्या मात्र फार मोठी नाही, हे खरे काळजीचे कारण आहे.

प्राधान्याने स्त्रियांचे लेखन छापणारी मासिके स्वातंत्र्योत्तर काळात मोठ्या प्रमाणात उदयाला आली आणि त्यांनी उबग आणणाऱ्या कथा छापल्या असे निदान डॉ.फडके यांनी केले आहे. चाकोरीबद्ध जीवन' जगणाऱ्या पांढरपेशी मध्यमवर्गाची अभिरूची जोपासणारी ही मासिके गल्लाभरू स्वरूपाची होती आणि त्यात लेखन


**डॉ.मनोहर जगन्नाथ जाधव**
एम.ए., पीएच.डी.
मराठी विभाग, पुणे विद्यापीठ,
पुणे ४११ ००७.


एम.ए. च्या परीक्षेत पुणे विद्यापीठाचे कविवर्य भा.रा.तांबे पारितोषिक.
चाळीसगाव, फैजपूर येथील महाविद्यालयात मराठीचे अध्यापन.
सध्या पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात कार्यरत.

**प्रकाशित साहित्य :**
संपदा, कधी कधी (कविता)
दृष्टी आणि दृष्टीकोन
(अस्मितादर्श वाङ्मय पुरस्कार) (समीक्षा)
प्रबोधन आणि परिवर्तन (वैचारिक)
शोध आणि संवाद (संपादित)
(डॉ.गंगाधर पानतावणे यांची अध्यक्षीय भाषणे आणि निवडक मुलाखती)
गद्यविविधा (संपादित)
(खानदेशातील ज्येष्ठ कवी भानु चौधरी यांचे गद्यलेखन)
विद्यार्थीदशेपासून आंबेडकरी चळवळीत सक्रिय सहभाग
परिसंवाद, चर्चासत्रांमधून निबंधवाचन
आदिवासी समाज कृती समिती, विद्रोही साहित्य चळवळ इ.
परिवर्तनवादी संस्थांशी संबंधित.




अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


महाराष्ट्र साहित्य परिषद

करणारी लेखिका आत्मसंतुष्ट आणि स्वकेंद्री होती. त्यामुळे आपल्याही पलीकडे एक विशाल जग आहे याचे भान नसणाऱ्या लेखिकांची संख्या उत्तरोत्तर वाढत गेली. 'मराठीत जी काही चांगली आत्मचरित्रे आहेत ती सगळी स्त्रियांनी लिहिलेली आहेत.' (पृ.१४०) असे डॉ.फडके यांनी म्हटले असले तरी या आत्मचरित्रांची मर्यादा स्पष्ट करताना 'एका अर्थाने ती पतिचरित्रे आहेत' (पृ.१४१) असेही त्यांनी नमूद केले आहे.

स्त्रियांचे नाट्यलेखनाचे प्रयत्न तुरळक दिसतात हे सांगताना 'नाटक हा वाङ्मयप्रकार स्त्रियांच्या संवेदनशीलतेला मानवत नसावा की काय असे वाटू लागते.' (पृ.२२१) असे भाष्य डॉ.फडके यांनी केले आहे. 'मी वाचकांसाठी लिहिते, मला टीकाकारांची पर्वा नाही.' (पृ.१७) असे म्हणणाऱ्या लेखिका साहित्याकडे किती गांभीर्याने पाहतात याबद्दलचे प्रश्नचिन्ह डॉ.फडके यांनी उभे केले आहे. मुळात लेखिकांच्या सकस साहित्य निर्मितीची संख्यात्मक वाढ कमी, त्यात प्रयोगशीलता आणि वाङ्मयीन मूल्यांची वानवा, या संबंधीचे मतप्रदर्शनही डॉ.फडके यांनी केलेले दिसते. 'साहित्य 'मानवकेंद्री' असावे असे म्हणणे तसे दिसायला सोपे दिसते पण ते अतिशय कठीण आहे. म्हणून 'साहित्याकडे' पाहण्याची आपली दृष्टीच बदलली पाहिजे. साहित्यनिर्मिती हा हौसेचा खेळ नव्हे. साहित्यनिर्मितीला प्रयोजन आहे. मानवी मूल्यांची जाणीव जागृत ठेवून लिहायचे म्हणजे संघर्ष टाळता येणार नाहीत.'[२] डॉ.फडके यांनीच एका वेगळ्या संदर्भात प्रकट केलेले हे मत स्त्रियांच्या लेखनालाही लागू पडते.

'दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह' (१९७७), 'दलित साहित्याची प्रकाशयात्रा' (१९८०), 'फुले-आंबेडकर : शोध आणि बोध' (१९८५), 'डॉ.आंबेडकर आणि दलित साहित्य' (१९८९) आणि 'डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीचा परामर्श' (१९९६) ही डॉ.भालचंद्र फडके यांची दलित साहित्यासंबंधी भूमिका मांडणारी मौलिक ग्रंथसंपदा आहे.

'दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह' ग्रंथाच्या प्रास्ताविकात डॉ.फडके डॉ.आंबेडकरांच्या चळवळीचा साधार परामर्श घेतात. हा परामर्श घेताना अनेक राजकीय, सामाजिक आणि सांस्कृतिक संदर्भांची ते चर्चा करतात. डॉ.आंबेडकरांच्या चळवळीच्या पार्श्वभूमीवर दलित साहित्य प्रवाहाचा उदय झाल्यामुळे अशा पार्श्वभूमीची चर्चा औचित्याला धरूनच म्हणता येईल. दलित साहित्य म्हणजे नेमके काय, याची मांडणी डॉ.फडके यांनी केली आहे. दलित साहित्याचा झंझावाती प्रवाह मराठी साहित्यात दाखल झाला त्यावेळी साहजिकच खळबळ उडाली. 'हे साहित्यच नव्हे' अशी भूमिका प्रस्थापितांनी घेतली. दलित साहित्याचा हादरा पचवू न शकलेले अनेक भुखंड या साहित्याच्या विरोधात मोर्चेबांधणी करू लागले तेव्हा सैद्धांतिक आणि मुलभूत मांडणी करणाऱ्या अनेक समीक्षकांची फळी पुढे आली. डॉ.सदा कऱ्हाडे, प्रा.रा.ग.जाधव, डॉ.गंगाधर पानतावणे, शंकरराव खरात, प्र.श्री.नेरूरकर यांच्याबरोबरीने डॉ.भालचंद्र फडके हे या फळीत अग्रेसर होते. डॉ.आंबेडकरांचा सहवास डॉ.फडक्यांना लाभला होता. त्यांच्या विचारांचा आणि चळवळीचा प्रभाव डॉ.फडक्यांवर पडला होता. स्वत: डॉ.आंबेडकरांनी स्थापन केलेल्या मिलिंद महाविद्यालयात डॉ.फडके अध्यापनाचे काम करीत होते. बौद्ध धर्माची दीक्षा घेतल्यानंतर नागपूरला बाबासाहेबांच्या साक्षीने दीक्षाभूमीवर 'युगयात्रा' या नाटकाचा जो अभूतपूर्व नाट्यप्रयोग झाला त्यात डॉ.फडके यांचा महत्त्वाचा सहभाग होता. मिलिंद महाविद्यालय त्या काळात महाराष्ट्रातील परिवर्तनवादी चळवळीचे एक महत्त्वाचे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सशक्त संस्कार केंद्र म्हणून आकाराला आले होते. या सर्वच गोष्टींचा परिणाम डॉ.फडक्यांवर होणं स्वाभाविक होते. 'कोणताही वैचारिक प्रवास तटस्थ नसतो. एक भूमिका घ्यावीच लागते. ही भूमिका मला जशी डॉ.आंबेडकरांच्या साहित्यातून मिळाली तशी दलितांच्या समस्यांचे अध्यापन करताना मिळाली आणि विशेष म्हणजे दलित जाती जमाती, आदिवासी यांच्याबरोबर प्रत्यक्ष काम करताना मिळाली.'[३] डॉ.फडक्यांच्या या विधानातून जी भूमिका प्रकट होते तिला आंबेडकर विचारांचे अधिष्ठान आहे. दलित साहित्यातील वेदना आणि विद्रोहाची मांडणी करण्यामागे याच प्रेरणेचे बळ होते. या ग्रंथाची भरपूर चर्चा झाली. अभ्यासकांना आणि आंबेडकरी चळवळीतील कार्यकर्त्या लेखकांनाही या ग्रंथाने दिशा दिग्दर्शन केले. दलित साहित्यासंबंधी इतकी नेमकी आणि नेटकी चर्चा डॉ.फडके यांनी केली की, त्यापुढील अनेक अभ्यासकांना या ग्रंथाने सातत्याने संदर्भद्रव्य पुरविले.

मराठी साहित्यात दलितांचे चित्रण करूण भावनेने आणि सहानुभूतीने रेखाटलेले होते. मुळात हे चित्रण उपरे आणि क्षीण स्वरूपाचे होते. त्याच्या मुळाशी जाऊन डॉ.फडके यांनी मीमांसा केली आणि त्यावरोवर कविता, कथा, कादंबरी, नाटक या वाङ्मय प्रकारातील दलितांचे लेखन कसे वेगळे आणि जीवनसंबद्ध आहे याची समीक्षा केली. दलित साहित्य प्रवाहाची ही समीक्षा डॉ.फडक्यांनी स्वागतशील रसिक वृत्तीने केली आहे. अशी समीक्षा करण्यामागे त्यांची एक निश्चित दृष्टीही आहे. कोणताही नवीन वाङ्मयीन प्रवाह ज्यावेळी साहित्यात दाखल होतो त्यावेळी बुजुर्गांनी कर्मण्य भावनेने मार्गदर्शन करून प्रोत्साहन द्यायचे असते. नवीन प्रवाह रुजणे, त्याची भरभराट होणे, स्वरूप निश्चिती होणे आणि मग यथावकाश मूल्यमापन होणे या टप्प्यांतर्गत मोडणारी डॉ.फडक्यांची समीक्षादृष्टी आहे. ती समकालीन वाङ्मयीन औचित्याला धरून आहे. त्यांनीच म्हटल्याप्रमाणे, 'दलित साहित्याची अनेक जण चर्चा करीत आहेत. आणि दलित साहित्याची भूमिका समजावून सांगत आहेत. या सर्व चर्चेला एक व्यवस्थित रूप द्यावे आणि दलित लेखकांनी कविता, कथा, कादंबरी, नाटक इ.क्षेत्रात जी महत्वाची भर घातली त्याचा आढावा घ्यावा असा माझा प्रयत्न आहे.'[४] हा आढावा घेताना त्यांनी विद्रोह, नकार, दुःख, प्रेरणा, स्वरूप आणि विचारांची पाळेमुळे अधोरेखित केली आहे. दलित साहित्याच्या भवितव्यासंबंधी आश्वासकता प्रकट केली आहे.' डॉ.आंबेडकरांनी सांगितलेली लेखणी आणि वाणी ही दोन अस्त्रे दलित लेखकांनी कमविली पाहिजेत कारण या दोन अस्त्रांच्या जोरावरच 'प्रबोधना' ला गती येईल आणि दलित लेखकाला स्वत्व लाभेल.' (पृ.२१५) डॉ. फडक्यांचा हा आशावाद तेव्हा अनाठायी होता, असे आज म्हणता येणार नाही. कारण आज दलित लेखकांच्या अनेक पिढ्यांनी लेखणी आणि वाणीचा प्रतिभाशाली अविष्कार घडविलेला दिसतोच आहे. 'दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह' या ग्रंथामुळे डॉ.फडक्यांची 'दलित साहित्याचे समीक्षक' म्हणून ओळख निर्माण झाली. डॉ.फडक्यांनी अनेक विषयांवर आणि अनेक मराठी लेखकांच्या साहित्यावर समीक्षा लेखन केले तरीदेखील त्यांची हीच ओळख आज सर्वमान्य आहे. नंतर सातत्याने त्यांनी दलित साहित्याची समीक्षा केलेली दिसते.

दलित साहित्याची समीक्षा आणि संशोधन करून डॉ.फडके यांनी जी मौलिक कामगिरी केली त्याचे मोल मात्र लौकिक जीवनात त्यांना चुकवावे लागले. अभावग्रस्तांच्या बाजूने उभे राहणाऱ्या आणि शोषण प्रक्रियेच्या विरोधात बोलणाऱ्या म्हणजेच प्रवाहाविरुद्ध जाणाऱ्या व्यक्तीला समकालीन जीवनात नेहमी उपेक्षाच सहन करावी लागते. त्याचा अनुभव डॉ.फडके यांनी घेतला. 'दलित फडके'[५] म्हणून अवहेलना



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

सहन केली, मात्र त्यामुळे डॉ.फडक्यांची ध्येयदृष्टी करपून गेली नाही. तिला नेहमीच धुमारे फुटले आणि ती पुढेच झेपावत राहिली. आंबेडकरी विचारांचा वारसा आणि वसा घेतलेले डॉ.फडके संघर्षरत राहिले 'दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह' या ग्रंथाची 'पाठ्यपुस्तक म्हणून प्रस्थापितांनी हेटाळणी करणे'[६] यात नवल नव्हते. मात्र या ग्रंथरूपाने दलित साहित्याची तपशीलवार, सुनियोजित आणि शिस्तशीर चर्चा करण्याचा डॉ.फडक्यांचा पहिला प्रयत्न अभिनव आणि म्हणूनच आज ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाचा वाटतो.

'दलित साहित्याची प्रकाशयात्रा', 'फुले-आंबेडकर : शोध आणि बोध', 'डॉ.आंबेडकर आणि दलित साहित्य' आणि 'डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीचा परामर्श' ही डॉ.फडके यांची पुस्तके म्हणजे वेळोवेळी लिहिलेल्या लेखांचे एकत्रित रूप आहे. या ग्रंथातून दलित साहित्याविषयक लेखनाबरोबरच सामाजिक, सांस्कृतिक आणि शैक्षणिक प्रश्नासंबंधी चर्चा आलेली आहे. फुले-आंबेडकरांच्या वेगवेगळ्या पैलूंवर, त्यांच्या प्रकाशित, अप्रकाशित आणि दुर्लक्षित लेखनावर डॉ.फडके यांनी समरसून लिहिलेले आहे. दलित साहित्यासंबंधी त्यांची भूमिका उत्तरोत्तर कशी विकसित होत गेली हेही या लेखनातून पाहावयास मिळते. दलित साहित्याने पाव शतकाच्या वाटचालीनंतर कोणते प्रश्न उपस्थित केले, त्या प्रश्नांना भिडण्यासाठी काय केले पाहिजे, साहित्यप्रवाह शयलीत किंवा क्षीण होऊ नये यासाठी कसा विचार करायला हवा, यासंबंधीची चिंतनशील टिपणे या पुस्तकांतून वाचावयास मिळतात. दलित साहित्यावर बदलत जाणाऱ्या काळात जे आक्षेप घेतले गेले त्याचा प्रतिवाद मात्र डॉ.फडके मनापासून करतात. प्रतिवाद करताना कधी युक्तिवादाचा आधार घेतात तर कधी आक्षेपकर्त्यांच्या साहित्यदृष्टीचा दोष प्रतिपादन करतात. सोयीचा विचार करण्यापेक्षा निर्लेप भावनेने विचार केला तर प्रश्न उपस्थित करणाऱ्याचा प्रांजळपणा स्पष्ट होतो. असा प्रांजळपणा दलित साहित्याच्या टीकाकारांजवळ अभावाने दिसतो. 'मराठी लेखकाने खरे म्हटले तर अन्य भाषिक लेखकांशी संवाद साधला पाहिजे. या संवादातूनच लेखकाला नवी दृष्टी लाभेल. मराठी साहित्याच्या जाणिवा विशाल होण्याच्या दृष्टीने अन्य भाषांशी संपर्क आवश्यक आहे.'[७] हे डॉ.फडक्यांचे विधान एकूणच मराठी लेखकांना आवाहन करते. जातीपातीच्या कोंडाळ्यात अडकलेल्या मराठी लेखकांना अशा व्यापक भूमिका घेण्याची सवय नसल्याने या आवाहनाच्या साक्षेपाची तीव्रता तर जाणवण्यासारखी आहे. सर्वभाषीव्यापकता साहित्यव्यवहाराला उमदेपण बहाल करते, हा आवाहनातील विश्वास अंतर्मुख करणारा आहे.

'दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह' या पुस्तकानंतर एकापाठोपाठ एक अशी अनेक दलित आत्मकथने प्रसिद्ध झाली. दलित, भटके-विमुक्त असे वेगवेगळ्या थरातील लेखक या आत्मकथनांमुळे झोतात आले. अनेक लेखक आत्मकथने लिहिल्यानंतर पुरस्काराचे कौतुक झेलीत स्वस्थ बसले. कित्येकांचे लेखन थंडावले तर काहीजण फक्त स्वंथ करीत राहिले. आत्मकथन लेखनातील ओजस्वी पारदर्शीपणा काहीजण गमावून बसले. डॉ.फडक्यांना याची जाणीव झाली तरी त्यांनी याबाबत दलित लेखकांची कानउघाडणी केली नाही, मात्र याबद्दल त्यांना निश्चित काळजी वाटत असावी. 'आपल्या वाट्याला येणारं दुःख या विषमताधिष्ठीत समाजव्यवस्थेचं अपत्य आहे याचे 'भान' आपल्या समाजाला आणून दिल्याशिवाय परिवर्तनाचे चमू गतिमान होणार नाही. मात्र दलित लेखक आपण भोगलेल्या वेदनांचा बाजार मांडतील तर दलित साहित्य मध्यमवर्गीय साहित्याप्रमाणे लोकानुययी, रंजनवादी होईल.'[८] दलित साहित्यासमोरील प्रश्न आणि आव्हाने यांचा शोध घेताना डॉ.फडके यांनी दिलेला वरील अभिप्राय पुरेसा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

बोलका आणि सूचक आहे. दलित साहित्यावरील आक्षेप फेटाळून लावताना डॉ.फडके कधी तार्किकतेचा तर कधी युक्तिवादाचा आधार घेतात. क्वचित त्वेषाने आणि नेहमी परखडपणे प्रतिपादन करतात. परखडपणात बोचरेपणा मात्र नसतो. संयम झिरपत राहतो. दलित लेखकांच्या साहित्यातील वैगुण्ये दाखवतानाही ते जरा सबुरीने आणि धीराने लिहितात.

दलित कवितेतील आवर्ताची चिकित्सा करताना त्यांनी नेहमीचा संतुलीतपणा दाखविला आहे. दलित कवितेत आवर्त असेल तर दलितेतर कवितेत आवर्त नाही काय? अशा स्वरूपाचे समर्थन त्यांना योग्य वाटत नाही. मूळ प्रश्न शिल्लक राहतोच, त्याचे उत्तर यात कुठे आले ? अशी त्रयस्थ भूमिका ते घेतात आणि बजावतात की, 'दलित कवितेतील आवर्ताची मीमांसा करताना आपण कुणासाठी लिहितो? आपण कुणाचे लेखनादर्श स्वीकारले? आपण का लिहितो? या प्रश्नांची उत्तरे शोधली पाहिजेत. यासाठी दलित कवितेला आत्मशोधाची आणि आत्मटीकेची वाट चोखाळली पाहिजे. या आवर्ताचे मूळ दलित लेखकाच्या आत्मसंतुष्ट वृत्तीत किंवा बधीर संवेदनशीलतेत आहे काय, याचा शोध घेतला पाहिजे'[९] मोठा कालखंड उलटल्यानंतर दलित कविता एका नव्या टप्प्यावर किंचित् थबकून नवे अविष्कार घडवू पाहत होती तेव्हाची ही डॉ.फडक्यांची टिप्पणी वास्तवदर्शी आहे. मघाचाच मुद्दा सांगायचा झाला तर, डॉ.फडके मर्मावर नेमके बोट ठेवतात, मात्र त्याची झडझडून चर्चा करीत नाहीत. सोदाहरण, साधार चर्चा नेहमीच वाङ्मयाला उर्जा पुरवीत असते. लेखक, कवींना दृष्टी प्रदान करीत असते. साहित्य प्रवाहाच्या एखाद्या विशिष्ट निर्णायक टप्प्यावर किंवा अवघड वळणावर अशा चर्चेची गरजच असते. डॉ.फडक्यांसारख्या समीक्षकाने अशी चर्चा करणे हे अप्रस्तुत ठरले नसते.

दलित कथाकारांच्या वर्तमानाला सामोरे जाणाऱ्या वृत्तीचा शोध डॉ.फडके 'दलित साहित्याच्या प्रकाशयात्रे'[१०] त घेतात आणि नव्या-जुन्या दलित कथेच्या जडणघडणीची वैशिष्ट्ये सांगतात. विविध कथालेखकांच्या कथाशयात एखाद्या सूत्राची समानता त्यांना जशी दिसते तशी प्रत्येक कथालेखकाची संवेदनशील प्रकृती वेगवेगळी आणि वैशिष्ट्यपूर्ण कशी आहे, तेही त्यांना जाणवते. सुर्व्यांच्या कवितेतील वास्तव, मनोहरांच्या कवितेतील आकांताचे तांडव, डॉ.म.ना.वानखेड्यांमधील अस्वस्थ शिक्षक, गं.बा.सरदारांच्या साहित्यातील जाणिवा, शहाजिऱ्यांच्या कवितेतील एकलेपणा आणि कोंडविलकरसारख्या अस्पृश्याच्या 'डायरी' बरोबरच कऱ्हाडेसारख्या 'स्पृश्याच्या डायरी' चेही अवलोकन डॉ.फडके यांनी केले आहे. वैचारिक आणि वाङ्मयीन स्वरूपाची 'दलित साहित्याची प्रकाशयात्रा' अनेक लेखकांना उजेडाचा मार्ग दाखविते.

डॉ.आंबेडकरपूर्व काळात शिवराम जानबा कांबळे यांनी चालविलेल्या 'सोमवंशीय मित्र' या साप्ताहिकात एका दलित स्त्रीने लिहिलेल्या दुर्मिळ लेखाचा परिचय[११] डॉ.फडके करून देतात आणि दलित स्त्रियांच्या लेखनाची पार्श्वभूमी समजावून घेण्याचा प्रयत्न करतात. दलित साहित्याच्या नामांतरासंबंधी चर्चा आज हिरीरिने सुरू आहे. दलित साहित्याला नेमकी कोणती पर्यायी संज्ञा वापरावी याबद्दल अनेक मते असली तरी डॉ.फडके यांनी 'आंबेडकरवादी साहित्य' अशी संज्ञा योजून तिचे समर्थन केले आहे. 'दलित साहित्या' ची प्रथमपासून मांडणी करणाऱ्या आघाडीत डॉ.फडके हेही एक समीक्षक होते. हे वर आलेलेच आहे. तथापि हेच डॉ.फडके आज 'दलित साहित्या' ला 'आंबेडकरवादी साहित्य' संबोधतात आणि आपली



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

परिवर्तनवादी, कालोचित दृष्टी नजरेस आणून देतात. 'आंबेडकरवादी' या विशेषणाची मांडणी करताना डॉ.फडके डॉ.आंबेडकरांच्या प्रमुख ग्रंथातील आणि भाषणांमधील काही महत्त्वाचा भाग उद्धृत करतात आणि त्याचे विश्लेषण करतात. त्या आधारे 'आंबेडकरवादी' या संज्ञेची योजकता स्पष्ट करतात.

विद्यापीठ नामांतर आंदोलन चित्रित करणाऱ्या कवितासंबंधी डॉ.फडक्यांनी जसे विस्ताराने लिहिले आहे तसे गुजराथमधील आरक्षणविरोधी आंदोलनाचा समाचार त्यांनी घेतला आहे. समकालीन दलित जीवन आणि चळवळ हा सातत्याने डॉ.फडक्यांचा चिंतनाचा विषय राहिला आहे. नव्या दलित लेखकांच्या साहित्यकृतीवर ते आस्वाद पद्धतीने लिहितात मात्र त्यातील सौंदर्यस्थळे आणि सामाजिक जाणिवा उलगडून दाखवतात. समाज आणि साहित्य यांच्या अन्योन्य संबंधाची चर्चा करतात, त्यामुळे ही मूल्यांचा आग्रह धरणारी समीक्षा होते.

डॉ.भालचंद्र फडके साहित्य विश्लेषणासाठी कोणत्याही विपक्षित समीक्षा पद्धतीचा हेतूत: वापर करीत नाहीत. विशेषत: पाश्चात्यांकडून आयात झालेल्या विविध समीक्षा पद्धतींचे आपल्याकडे भल्याभल्यांना जे आकर्षण आहे तसे काही डॉ.फडक्यांच्या समीक्षेत दिसत नाही. त्यांची समीक्षा साहित्याचे मूलद्रव्य शोधण्याचा प्रयत्न करते. भारतीय परिप्रेक्ष्यातील अनेकजिनसी समाज, बहुआयामी संस्कृती, समकालीन भिन्नस्तरीय वास्तव, साहित्यकृती घडविणाऱ्या लेखकाचा व्यामिश्र पिंडधर्म अशा अनेक घटकांचा विचार करून ते साहित्य चर्चा करतात. आधीच निष्कर्ष निश्चित करून साहित्याचा धांडोळा घेण्यात त्यांना रस नाही. त्यांच्या समीक्षेत अभिनिवेश डोकावत नाही. आग्रही भूमिका प्रकटली तरी ती पोज घेत नाही. मूल्यमापनाची त्यांच्या ठायी असलेली दृष्टी मात्र जाणवते, अशी दृष्टी नेहमीच मौलिक साहित्य सर्जनाला प्रोत्साहित करते, हे नाकारता येणार नाही.

**संदर्भ :**


१. मराठी लेखिका : चिंता आणि चिंतन, श्रीविद्या, १९८०, पृ.१५.
२. फुले-आंबेडकर : शोध आणि बोध, आनंद, १९८५, पृ.६२.
३. उनि, पृ.१२५
४. दलित साहित्य : वेदना आणि विद्रोह, श्रीविद्या, १९७७, मनोगत
५. फुले-आंबेडकर : शोध आणि बोध, आनंद, १९८५, पृ.१०९.
६. उनि, पृ.११०.
७. उनि, पृ.५३.
८. डॉ.आंबेडकर आणि दलित साहित्य, प्रचार, १९८९, पृ.९८.
९. उनि, पृ.१९१.
१०. दलित साहित्याची प्रकाशयात्रा, आनंद, १९८०
११. डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीचा परामर्श, आनंद, १९९६, पृ.७२.


◇ ◇


डॉ.मनोहर जाधव,
मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७. दूरभाष : (निवास) ६६८९४९४.





अनुक्रमणिका






# ‘काव्यसंजीवनी’ ते ‘आत्मीय’



माधवी पटवर्धन

गेल्या काही दिवसांत साहित्याच्या क्षितीजावरचे एकेक तारे पाटोपाठ निखळले. संजीवनी मराठे, ना.घ.देशपांडे, गोपीनाथ तळवलकर, पु.ल. आणि हा लेख लिहीत असतानाच इंदिरा संत गेल्याचे कळले. दरवेळी वार्तेने मन विषण्ण होतं. वय, पिकलं पान अशा शब्दांनी आपण आपली समजूत घालीत असतो आणि त्यांच्या रचनांनी आपल्याला दिलेला आनंद, कधी आधार, आश्वासन, तर कधी आपल्याला दिलेलं संपन्नपण आठवत त्यांच्याविषयी कृतज्ञ राहतो. त्यांनी आपल्याला दिलेलं संचित आठवण, इतरांना वाटणं, लुटणं एवढंच आपल्या हाती राहतं. याच भावनेतून ‘काव्यसंजीवनी’ या संजीवनीबाईंच्या पहिल्या काव्यसंग्रहापासून शेवटच्या ‘आत्मीय’ पर्यंतचा प्रवास पुन्हा निरखणार आहे. त्यातल्या हव्याहव्याशा वाटणाऱ्या कवितांचा आस्वाद घेणं, गुणवैशिष्टयांना उजाळा देणं करणार आहे.

संजीवनीबाई या मान्यता पावलेल्या कवयित्री असल्याने साहित्य पत्रिकेच्या वाचकांना ज्ञात नसलेलं आपण नवीन काय सांगणार हा प्रश्न माझ्यापुढे पडलाय. त्यांच्या कविता आणि मान्यवरांनी केलेली कवितेची समीक्षाही पुष्कळशी परिचित आहे. काही संग्रहांच्या प्रस्तावना आणि संपादित संग्रहांच्या प्रस्तावना त्यांच्या कवितेविषयी खूप बोलून गेल्या आहेत. तेव्हा त्याहून अधिक मी काय मांडू शकेन ? पण साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या माध्यमातून त्यांच्याशी परिचय झाला आणि त्यांच्यातल्या स्नेहमयीने आम्हा साऱ्याजणींवरच जादू केली होती. त्यामुळेच त्यांच्या कवितातून त्यांना आठवावं वाटून सर्व संग्रहांचं नीट अवलोकन केलं. त्यांच्या काव्यजाणिवेपासूनचा तो प्रगल्भतेपर्यंतचा प्रवास न्याहाळायचा ठरवलं. तांबे-रविकिरण मंडळ, कुसुमाग्रज-बोरकर-माडगूळकर यांच्याबरोबरच नवकाव्यापर्यंतच्या काळातली त्यांची वाटचाल पाहणं मनोरंजक वाटलं.

१९३२ सालातला एक मध्यमवर्गीय पिता,ज्या काळात अजून मुलामुलीत भेदभाव केला जात होता त्या काळात आपल्या एकुलत्या एक असलेल्या कन्येचं कवितांचं पुस्तक तिच्या १६ व्या वर्षी स्वतः प्रकाशित करतो ही गोष्टच मुळी अतीव कौतुकाची वाटते. इतर ललितकलांप्रमाणे काव्यरचनेच्याबाबत स्वतंत्र शिक्षण देण्याची पद्धत नाही म्हणून पुस्तक प्रसिद्ध करणं हाच त्यांना शिक्षणाचा मार्ग वाटलेला आहे. अनुकूल, प्रतिकूल अभिप्रायांनी दोष लक्षात घेऊन सुधारणा होईल ही त्यांची आशा पुढचा प्रवास पाहता फलद्रुप झालेली दिसते.

केशवसुत, गोविंदाग्रज, बालकवी या त्यावेळी दिवंगत झालेल्या कवींची कविता, तसंच यशवंत, गिरीश, माधव ज्यूलियन या रविकिरण मंडळातील कवींची कविता, मध्यप्रदेशातल्या भा. रा. तांबे यांची कविता आणि रवींद्रनाथांच्या अनुवादित कविता संजीवनीबाई पुन्हा पुन्हा वाचत असत. त्यातली काव्यात्मता, स्वप्नरम्यता आवडत असे. भावार्तता त्यांचं मन वेधून घेत असे. त्यामुळे काव्यविश्वात हरवण्याचा छंद त्यांना जडला. मनाला चैतन्याचा झराच सापडला. सौंदर्याचा ध्यास लागला. अपार्थिव भावजीवनासाठी त्यांचं मन व्याकुळ झाल्याचं जाणवतं. या सर्व कवींच्या कवितेची आठवण



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

***माधवी पटवर्धन***
***एम्.ए.एम्.फिल.***
*सध्या पुण्यातल्या टिळक आयुर्वेद महाविद्यालयात अध्यापन.*
*संस्कृत हा पदवीचा विषय पण मायबोलीतल्या साहित्याच्या प्रेमाने वाचन आणि अधूनमधून लेखन.*
*आकाशवाणी, दूरदर्शनसाठीपण लेखन.*
*कवितासंग्रह प्रकाशनाच्या वाटेवर.*

'काव्यसंजीवनी' वाचताना येते. विशेषतः गीतलयीतून जन्मणाऱ्या तांब्यांच्या गीतांची भूल त्यांना पडली आणि संजीवनींच्या कविताही पहिल्याच संग्रहापासून स्वरांचे रुणझुणते नूपुर घालूनच पुढे आल्या.

त्यांच्या घरातल्या थिऑसॉफीच्या वातावरणाचा परिणाम म्हणजे १६ व्या वर्षीच 'देव' कल्पनेबद्दल काही स्वतंत्र विचार यायला लागले होते. परमेश्वरविषयक श्रद्धेचे पडसाद या संग्रहापासूनच दिसतात. त्याच्या कृपेसाठी जीव तहानला आहे. त्याचे चरण हेच जीवनात निराशेतून बाहेर पडायला साधन आहेत.

१६ वर्षांच्या मुलीचा खेळकरपणा, अल्लडपणा दिसेल अशाही तुरळक कविता इथे आढळतात. परीक्षा चित्ताला त्रास देत असल्याने देवाला विनवणी आहे, 'गुरूंना तू सांगे 'पास' करायला.' सखीला धम्मकलाडू, चापटपोळ्या खायला देऊ का, फ्लॉवरचा गुच्छ हातात देऊ की उकडतंय म्हणून बाभळीच्या पानांचा पंखा देऊ असं विचारणारी अल्लड नायिका दिसते.

'जातस्य ही ध्रुवो मृत्यू: ...' या गीतावचनाचा अनुवाद 'जनन असे ज्या मरण तया' 'काळाच्या सरीतेवरचे जीवितबुद्बुद् हे साचे' 'प्रेम अमर आहे. जगाच्या नश्वरतेमाजी' असं तत्वज्ञान मांडणाऱ्या ओळी दिसतात पण अजून त्याला चिंतनशीलतेचं बळ लाभायचं आहे.

कलिका-भृंग यांच्या आडवळणाने प्रेमकथा भेटते. सुंदर निसर्ग, स्वर्गीय गायन यांनी अधिकच व्यथित झालेली कुणी तर कुठे प्रेमासाठी 'जीवनासी एक आस क्षण माझ्यासंगे हास' अशी याचना दिसते. तर 'रानकिशोरीस' सारख्या कवितेत ज्याला हृदयमंदिरात स्थापले आहेस तो देव नाहीये अशी सावध सूचना. रणांगणावर निघालेला प्रियकर आणि रणांगणावरून परत आणलेला मृत सहचर दोन्ही कवितेत भेटतात. इंग्रजी कवितांच्या प्रेमात पडल्याने त्यांना मायबोलीत आणण्याचा प्रयत्न इथे दिसतो. 'Home they brought her warrior dead' या टेनिसनच्या प्रसिद्ध कवितेचा 'मोहपाश' हा इथे अनुवाद आढळतो.

एकंदरीत या संग्रहाकडे पाहता कवितेची जाणीव नुकत्याच झालेल्या संजीवनीबाई इथे भेटतात. छांदस रचनेचे तंत्र साधलेली, जुन्या वळणाची, संस्कृतप्रचुर शब्दांची, समासबाहुल्याची पारंपारिक पद्धतीची रचना दिसते.

दुसरा संग्रह 'राका' १९३९ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यात निवेदनात त्या म्हणतात की वडिलांच्या आशेला आलेले हे चिमुकले फूल त्यांच्या नजरेसमोर आणण्यात मला धन्यता वाटते आहे. दोन संग्रहामधे ७ वर्षांचे अंतर पडले आहे. स्वतः संजीवनीबाई वयाने, शिक्षणाने, वाचनाने, अनुभवाने वाढल्या होत्या. प्रेमाला झालेला विरोध, प्रेमातली हुरहुर, प्रेमपूर्ती त्यांनी अनुभवली होती. त्यामुळे राकामधला कवितांचा सूर काही प्रमाणात बदलला होता.

मात्र 'काव्यसंजीवनी' त प्रसिद्ध झालेल्या काही कविताही इथे पुनर्मुद्रित का केल्या आहेत



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कळत नाही. कदाचित आता काव्यगायनामुळे त्यांचं नाव व्हायला लागलं होतं त्यामुळे पूर्वीचं छोटेखानी पुस्तक ज्यांच्या नजरेला पडलं नसेल त्यांनाही नव्या संग्रहाच्या निमित्ताने पूर्वीच्याही कविता कळाव्यात हा हेतू असेल. यातल्या गीत विभागात 'प्रभूविण जीवन असार भासे', 'भूल कशी पडली जिवाला', 'उठ सखी पातला भानू उदयाचली', 'यदुनंदना झणि धाव ना' अशी शास्त्रीय गायनाला उपयुक्त वेगवेगळ्या रागातली पदं लिहिली आहेत. ही पदं शास्त्रीय संगीताचे प्राथमिक ज्ञान घेणाऱ्या सर्वांना परिचयाची आहेत.

निसर्गातले तारे, वारे, फुलं, चांदणं सारे एका नायिकेची अस्वस्थता वाढवतात तर दुसरी नायिका 'हे हृदय भरोनी जाईल आनंदाने, तेंव्हाच गडे मी गाईन गाणे' असं म्हणते आहे. 'संगमोत्सुक' मधल्या ओव्या चपखल रचनेची साक्ष देतात. प्रेमपूर्तीसाठी उत्सुकता वऱ्याच कवितात दिसते. मला माझ्या सुखाची पर्वा नाही तर 'तव जीवन सुखमय करणे हृदया आस खरी' किंवा 'नरजीवन पूर्ण करण्यास मला नेशील ना' म्हणताना त्या काळातल्या स्त्रीची मनोभूमिका कळते.

वात्सल्यभावाच्या २-४ कविता इथे भेटतात पण अजून पुढे सापडला तसा अधिक गहिरा स्वर सापडलेला नाही. संजीवनींच्यात एक 'लहानगी' कायम वास करते. त्याचं प्रत्यंतर इथेही येते. 'सुख गोड शैशवीचे गमते पुन्हा लुटावे' किंवा भावचिंतांनी ग्रासल्यावर कुणाला आईच्या मांडीवर डोके टेवावेसे वाटते आहे.

संक्रांत, पाडवा अशा निमित्तांनी सामाजिक वा राष्ट्रीय भावना व्यक्त झालेली दिसते पण त्यात उत्कटता कमी दिसते.

रवींद्रनाथांच्या तसंचं पाश्चात्य कवींच्या कवितांचा अनुवाद इथेही आढळतो. 'देहे नुरला तरी अवघ्या विश्वी भरला' असं शेलेचं वर्णन 'महाकवी शेले' या कवितेत त्या करतात. निसर्गातल्या सौंदर्यानं आनंदित झालेल्या आणि नाचू लागलेल्या सख्यांची दोन गाणी इथे आहेत. त्यापैकी एक आकाशवाणीवरून आपल्या सर्वांनाच परिचयाचं झालेलं गोफाचं गाण - 'सकल मिळूनी हसुनि खेळूनि गोफ गुंफू या ग' शब्दांनी लय, ताल, सुंदर साधलेलं

**संजीवनी मराठे**
**यांचे प्रकाशित वाङ्मय**

१) काव्य संजीवनी १९३२
२) राका १९३९
३) संसार १९४३
४) छाया १९४९
५) भावपुष्प (गीते) १९५१
६) गंमत (बालगीते) १९५६
७) चित्रा १९५७
८) परिमला (गीते) १९५९
९) मराठी साहित्यदर्शन (पुष्प १० वे) १९६१
१०) वरं का ग आई १९६२ (महाराष्ट्र राज्य पुरस्कार : बालगीते)
११) हंसू बाई हंसू १९६३ (महाराष्ट्र राज्य पुरस्कार : बालगीते)
१२) चंद्रफूल १९७१
१३) लाडकी लेक १९७६ (अनुवादित बाल कादंबरी)
१४) संजीवनी (संपादित कविता) १९७६
१५) जुई (बालगीते) १९७८
१६) मी दिवाणी १९८१
१७) कौतुक (बालगीते) १९८१
१८) इच्छामणी आणि इतर गोष्टी (बालकथा) १९८४
१९) माझा भारत १९९३ (काव्य प्रश्नमंजूषा)
२०) आत्मीय १९९४
२१) सोनतारा (बालकविता) १९९६
२२) गीतांजलीदर्शन (अनुवाद) १९९८



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आहे असं हे गीत. 'बाळ करी झोपला' कोल्हापूरच्या साहित्य संमेलनात प्रथमच गायलेल्या या गीताने त्या लोकांना माहीत झाल्या आणि चांगलीच दाद त्यांच्या काव्यगायनाला मिळाली आणि पुढेही यशवंत, गिरीश यांच्यावरोबर संमेलनात समाविष्ट केल्या जाऊ लागल्या. तर असं हे गाणं या संग्रहात आहे. मातेला बाळापुढे इतर गोष्टी फोल वाटतात आणि म्हणूनच ती इच्छा व्यक्त करते.

'मज नको अर्पिली कुणी, नव सौख्ये पदी आणुनी,
मज एक हवे निर्शादिनी, असावा बाळ करी झोपला'

मला पुढच्या संग्रहात न आढळलेला एक प्रकार द्वंद्वगीत 'विजयी वीर' नावाचा इथे आढळला आणि लहानपणी कधीतरी ऐकलेल्या 'तिथे तू कैसा येशील रे, तुझी माझी भेट कशी होईल रे' या गीताची आठवण झाली. कवितेतली ती वेगवेगळी रूपं घेईन म्हणते आणि त्या त्या रूपाला योग्य असं रूप तो घेणार आहे आणि तिला भेटणार आहे.

'मधू मधूर होऊनी राहिन, कुसूमांमधला
मी भ्रमर होऊनी येईन मधुपानाला'

याही संग्रहात अजून केशवसुत, तांबे, रविकिरण मंडळ यांच्या प्रभावातली कविता आढळते. शब्दांइतकेच नादाचे लयीचे प्रेम असल्याने रचनेचे स्वरूप नुसते छंदोबद्धच नाही तर गीतस्वरूपाचे राहिले असे त्या स्वत:च म्हणतात. याला कारण त्यांची मूळ प्रवृत्ती. तसंच गोड आवाजात सादर केल्यामुळे त्यांच्या रचनांना कविसंमेलनात मिळत असलेली पावती, लोकांकडून भरभरून होणारं कौतुक हेही कारण असावं. तांब्यांच्या वळणानं मुख्य कल्पनेचं आकर्षक ध्रुवपद रचून मग वेगवेगळ्या कडव्यांमधून त्या कल्पनेचा विस्तार केलेला दिसतो. अनेकवेळा तर लोकप्रिय चालींवर सुंदर, सुंदर शब्द रचण्याची हौसही दिसते. जुन्या कवींच्या रूढ संकेतातून वलय फोडून बाहेर पडलेल्या संजीवनीबाई इथे भेटत नाहीत. हिमधवलित, वायुविचिका यासारखे संस्कृतप्रचुर शब्द अजून आहेत. आशयावरच रचनेच्या तंत्राने कुरघोडी केल्याबद्दलची खंत म्हणूनच समीक्षकांनी व्यक्त केली आहे.

'संसार' हा १९४३ मध्ये प्रसिद्ध झालेला त्यांचा तिसरा संग्रह. याला वि. द. घाटे यांची प्रस्तावना लाभलीय. त्यात ते म्हणतात 'कोल्हापूरच्या संमेलनात पित्याचा हात धरून आलेली संजीवनी आणि सोलापूरच्या संमेलनात पुरुषांच्या घोळक्यात मोकळेपणाने वावरणारी संजीवनी या दोघीत कितीतरी अंतर! त्या संजीवनीने केवळ गाण्याचे साधन म्हणून कविता केल्या आणि म्हटल्या आणि ही संजीवनी आता काव्याविष्काराचे साधन म्हणून गाण्याकडे पाहू लागली आहे. अजून जुन्या खोडी गेल्या नाहीत. गेयतेकडे व नादमाधुर्याकडे, गोड गोड शब्दांकडे अजून मनाची ओढ आहे. जे काही सांगायचे ते ध्रुपदाच्या दोन ओळीत गाण्याच्या गुंगीत सांगून टाकल्यावर, तीन-चार कडव्यांची उत्प्रेक्षांची इमारत रचण्याकडे अजून प्रवृत्ती होते. परंतु अलिकडच्या काव्यात एक प्रकारचा संयम व अर्थप्रवणता आली आहे.'

'संसार' मधल्या कविता म्हणजे संजीवनींच्या विकसित यौवनाचा आणि त्याच्या साक्षीनेच जन्मलेल्या व जपलेल्या भावनांचा उत्फुल्ल फुलोरा, प्रीतीचा अक्षय उत्सव या अनुराधाबाई पोतदारांच्या विधानाची प्रचीती एकेक कवितेचा आस्वाद घेताना येत जाते. जे गीत संजीवनींच्या नावापासून वेगळं करता येणार नाही. ते 'शांत सागरी कशास उठविलीस वादळे' गीत याच संग्रहातलं. कवयित्रीच्या साध्यासुध्या जीवनात



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

उठलेलं वादळ तिला नवसंमोहन वाटतंय आणि त्यामुळेच जीवन नंदनवन बनलंय. प्रणयाचा प्रथम परिचय किती नाजूकपणे रंगविला आहे. प्रणयाच्या अनुभवाने ती काहीशी गोंधळली आहे आणि मनाचं हे भांबावलेपण 'संभ्रम' या कवितेत अचूक दिसते. मी तुला स्तोत्र गायली की मूकच राहिलें? 'भावगंधे तुला काय मी चर्चिले, सुगुण स्पंदन तुझे मीच वा वेष्टिले?' असा संभ्रम तिचा होतो. मग तिची मनोवेल फुलून येते, भाव मोर नाचू लागतो आणि मीलनोत्सुक अशी ती 'संधिकाल पातला जवळी घे सख्या मला' अशी विनवणी करते तर कधी 'असाच लावी प्रिया अधराला दिव्य प्रीतिचा अमृत पेला' म्हणत मंत्रमुग्ध होते. तिला आश्चर्य वाटतं प्रीतीच्या जादूचं त्याच्या सुखात तिला सौख्य देऊन जाते.

कधी सहवासाच्या स्मृतीत रमणारी नायिका आपल्याला भेटते. वियोगामुळे जीवन शापासारखं वाटून जीवाचा अंत व्हावासा वाटतो. वाट पाहताना तेवता तेवता वात मंदावते. सहवास प्रत्यक्ष नाही तर त्याच्या स्वप्नस्मृतीत हरवून जाऊ लागते आणि मग 'नयनात नीज मी साठविते, ते गोड स्वप्न मनी आठवते' असं गोड गीत तिच्या ओठी येतं. त्याची प्रतीक्षा करत ती युगानुयुग त्याची वाट पहायला तयार आहे. अशावेळी स्वप्नांचा मधुमास उरीचा उल्हास उमलवीत येतो आणि जागेपणी जे वांछिले होते ते स्वप्नात हाती येते असा सत्याचा परिहास करायला शिकवणारा हा मधुमास आहे.

प्रीती ही नटवी, नाना रूपं दाखवणारी कधी तिला मायाविनी वाटते आणि 'जळशील, जळशील' म्हणत पेटत्या प्रीतीला उराशी धरणाऱ्या जीवाला सूचना देते. हा वेडा स्नेहविकल जीव उडाल्या स्वप्नांपाठी आणि भंगल्या मूर्तिसाठी उत्सुक आहे. ही वेडा जीव कविता किंवा भ्रांती, संभ्रम अशासारख्या कवितात पुढच्या विकासाच्या शक्यता दिसतात कारण स्पष्टीकरणात्मक, वर्णनात्मक चरण इथे आढळत नाहीत.

मज संगे चल सजणी म्हटल्यावर ज्या विश्वासाने तिने त्याच्या स्कंधावर शीर ठेवले आहे त्याला आश्वासन देणारं त्याचं आचरण दिसतंय. 'साजणी ! संसारी मुक्तीचे माहेर सरायाचे दूर नाही आता' आणि तीही त्याच्या आश्वासनाने प्रतिआश्वासन देते 'करू ये सुखमय संसार' असं म्हणत. दोघांनी एकमेकांच्या नित्याच्या व्यापांनी होणाऱ्या त्रासाला जाणलंय याचं सुखद चित्रण दिनान्तीमधे दिसतं.

'सखी, या सुखशांतीचे वेळी, निद्रेचा कर फिरता भाळी ,
तरंगातील वरि दु:खे सगळी, सौख्य मात्र राहील तळी,ये बैस जराशी मजजवळी !'

संसारवेलीवर उमललेल्या फुलाला पाहून ती म्हणते 'तूज बघुनि बाळा, पुन्हा पुन्हा मज वाटे निर्मिले तवपणी मी तुझिया पितयाते.' त्याचे हसरे डोळे औदास्याचं शेवाळं घालवतं. त्याला घास भरवताना साऱ्यांचे घास दिल्यावर 'जये सृष्टी गोड गेली । तुम्हा आम्हा जो सांभाळी । तया देवाजीचा अंती उचला हो गोड घास' असे बाळावर संस्कार करणारी माता इथे भेटते.

प्रेम, वात्सल्य यावरोबरच परमेश्वरश्रद्धेच्या कवितांचा गट बहुधा प्रत्येक संग्रहात दिसतो. तृप्त सुखी संसार ही त्याचीच कृपा वाटते. त्यात सदैव आपल्या पाठीशी रहावे म्हणून 'पद टाकीन मी परि दयाघना. तू उभा पाठीशी असशील ना' अशा शब्दात प्रार्थना करते. कुठे त्याच्या दर्शनाची आस आहे तर त्याची आठवण रहावी म्हणून उपेक्षाच कर अशी विनवणी. त्याला निराकार स्वरूपात पाहिलंय. 'या नित नूतन विश्वकमळांचा मी चिरतृपित मिलिंद प्रभू मज नाचू दे स्वच्छंद' यामधे रवींद्रनाथांच्या गीतांजलीची छाया दिसते.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

स्वातंत्र्यापूर्वीच्या काळातल्या या कविता आहेत त्यामुळे आजूबाजूला क्रांतीचे, चळवळींचे वारे वाहत असताना कवयित्रीही राष्ट्रभावनेत ओढल्या गेल्या आणि कविवराला, क्रांतीचं शिंग फुंकून स्फूर्तीचं लोणं घरोघरी पोचवणारी कविता ऐकव म्हणतात. गुलामी नष्ट करून निशाण चढवा, स्वत्वाची राखरांगोळी करणारी होळी विझवा, भूवरची द्वेषभावना नाहिशी करण्याचा संकल्प करा इ. पण या कवितांविषयी वि.द. घाटे सल्ला देतात की चार लोक लिहितात म्हणून लिहू नको आणि पुढे त्यांनाही ते पटलेलं आहे. जीवनाची शांत सात्विक घडी बसवायची हाच त्यांचा आदर्श असल्याने दाहक, उपरोधिक, बीभत्स उपदेशपर सूर लावता येत नाहीत. समाजजीवनाच्या शल्यावरच्या कवितेत क्षीणपणा पुढे त्यांना जाणवलाय. मागच्या संग्रहाप्रमाणे इथे तत्त्वज्ञानाची सुभाषितं येतात. 'जया वृद्धि तया क्षय' 'जीवन हे नाटक सखये बाई' पण त्या कविता मनाला भिडत नाहीत.

व्यक्तिगत जीवनात स्थैर्य आल्यावर, आत्मविश्वास लाभल्यावर आणि प्रेमाच्या अनुभूतीनंतर स्वत:चा सूर सहज लाभलेली टवटवीत कविता, मीलन, प्रतीक्षा, विरह, समर्पण साऱ्या भावावस्थांना कवळणारी आणि कवयित्रीच्या इच्छेप्रमाणे मनाच्या तळापासून आलेला भावनिक प्रत्यय अभिव्यक्त करणारी कविता भेटते. १९४९ साली 'छाया' हा संग्रह आला आणि या संग्रहाला मी प्रस्तावना लिहिणार नाही म्हणत वि.द. घाट्यांनी कवितांविषयी व्यक्त केलेले मत जे पत्ररूपाने पाठवले तीच या संग्रहाची प्रस्तावना झाली. 'संसार' नंतरच्या ५-६ वर्षातल्या या कवितांच्या प्रगतीबद्दल समाधान व्यक्त केले आहे. रम्य शब्दजाल आणि कल्पनाजालातून बाहेर पडून विचारांची प्रगल्भता, सौंदर्य आणि भावनांची सूक्ष्मता आणि खोली या दिशेने प्रवास सुरू झाला आहे. त्यांना संजीवनींच्या कविता वाचताना 'दाल' सरोवर आठवते. शांत दालमधे आवेग, खळखळाट नसतो. मधूनच झुळूक येऊन खळबळ पुन्हा शांत. तशीच वादळे कवयित्रीच्या शांत सागरावर उठतात. अस्वस्थ करतात. पण अनुराधाबाईंना दालशी साम्य कवितेतल्या नितळ पारदर्शित्वामुळे वाटते. घाट्यांनी कवयित्रीला आधुनिक नार्सिसस म्हटले आहे. तो आपल्या पाण्यातल्या प्रतिबिंबावर खूप तशा संजीवनीबाई आपल्या अंतरंगात डोकावत भावानुभवांना, भाववृत्तींना कवितेत शब्दांकित करत आहेत आणि ही अंतर्मनाचा शोध घेण्याची वृत्ती आणि शक्ती अधिक वृद्धिंगत व्हावयास हवी होती असेही त्यांना वाटून गेले आहे.

'सुंदरतेच्या दावित लीला चल रंगू प्रतिभासंसारी' असा जाताजाता उल्लेख मागच्या संग्रहात आला होता, पण इथे कवितेविषयी स्पष्ट उच्चार. काव्य हे मत्प्रिय जीवनधन आहे आणि त्यापुढे ऐहिक सुखसंपदा फिकी वाटते. 'किती पाहिले, किती सहिले, काय जाणिले, या जीवाने नोंद तयाची केली कवनी आजवरी भोळ्या भावाने' आणि त्यामुळेच काव्य तिला श्वासाइतके गरजेचे झाले आहे. लौकिकाच्या झळाळीने, आधि व्याधींनी प्रतिभेच्या कला झुरणीला लागल्याची खंत आहे आणि म्हणूनच त्या खुलण्यासाठी तिला दिव्य तेजाची गरज आहे. ती रूसली तर मनोविहंग मुका होतो याची खंत आहे. तिने मनाभोवती स्वप्नजडित अलका उभारावी ही आस आहे. कवीच्या विश्वात कशाला उणेपण नसतं म्हणून अमृताची रूची जहराला आण ही विनवणी. मात्र आता कवयित्रीला काव्याविषयी अधिक भान आल्याने 'माझ्या प्रतिभे ! सात वाल्मिके ! होई विश्वरूपिणी' अशी प्रार्थना आहे.

सौंदर्यवादी कवींच्या परंपरेत संजीवनीबाई मोडतात. याची प्रचीती या संग्रहापासून 'सुंदरचे सखी' या



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कवितेतून स्पष्टपणे येते. आपले शोभामय हात गळ्यात टाकून या सखीने कवयित्रीला ळळा लावलाय. कोलाहलात वावरून गेल्यावर ती तिला दिङमंडलात नेते. संगीतात रमवते. या सुंदरतेपायीच जीवनलय लागावी अशी तिची अपेक्षा आहे.

'संसार' मधली प्रीतीची धुंदी ओसरून स्थिरावलेले भावविश्व आता अधिक सजगपणे स्वत:चे आणि भोवतालचे जग पाहते. प्रेयसीपेक्षा स्थिरावलेली संसारी स्त्री अधिक भेटते. खूप दिवसांनी साजण घरी येणार म्हणून उडालेली धांदल 'प्रतीक्षा' त नेमकेपणाने येते. त्याला 'ठेव सख्या मजवर विश्वास, तुजसाठी मी धरियेली संसाराची कास' म्हणत त्याला अखेरपर्यंत सांथ देण्याचं वचन देते. त्याचे कणखर हात तिचा अभिमान फुलवतात. त्याच्या कर्तृत्वाने नवीन घरात गृहप्रवेश होतो. कधी सहचरीला भेट काय द्यावी असा त्याला प्रश्न पडतो तेव्हा स्मृती ज्योतींच्या तेजात सतत अंतरात विलसत रहा म्हणते आणि म्हणूनच 'संसाराविषयी असार नच हा जीवित्वाचे यातच वसते सार' असे तिला वाटून जाते. क्वचित् पुरुषाच्या भावना व्यक्त करणारी कविता येते. अशी एक कविता प्रेयसीला शालू, शेले, अलंकार न देऊ शकणारा पण तिला प्रसन्न ठेऊ शकणारा प्रियकर भेटवते. अशी प्रसन्न गृहिणी मग अभिमानाने 'गृहिणी येथ मी, हे माझे घर' असे म्हणते. येणाऱ्या मुशाफिराला उन्हउन्हित घास देऊन त्याच्याशी हितगूज करून त्याचं दुखः दूर करण्याचा प्रयत्न आहे. मात्र या गृहिणीलाही कधीतरी आपली कोणी विचारपूस करावी, दमलीस म्हणावे, गुणांचे कौतुक करावे, हसावे बरोबर अश्रूही ढाळावे अशी इच्छा आहे.

कुणी वेडा पीर गीत ऐकून प्रेयसी येईल म्हणून गातच राहिलाय तर कुणी 'जनात झाले जनासारखे मनातले कधीमधी' म्हणत सावरायचा प्रयत्न करतो. कुणी एखादी त्याच्यापासून दूर एकटीच प्रासादात उभी तर दुसरी ज्या प्रेमाने नागवले त्यावर फिर्याद करायला कवितेलाच साद घालते आहे. पूर्वीचे नाते विसरून वहिणींचे नाते मानायला विनवणी करणारी स्त्रीही भेटते.

भारताला स्वातंत्र्य मिळाले असल्याने देशप्रेमाच्या, जयजयकाराच्या, गांधीहत्या, फाळणीवेळचे हत्याकांड, सामाजिक विषमता, मूल्यांचा ऱ्हास इ. च्या कविता त्यांची शब्दरचना योग्य असूनही त्या भिडण्यासाठी त्यामागची प्रेरणा कमी पडते की काय असे वाटते.

उमरखय्यामच्या रुबायांचा अनुवाद इथे आहे. एकाकीपणाचे दु:ख, पित्याची स्मृती, मातेच आगमन, स्नेहमयी मैत्रीण कवितेचे विषय झालेत. मानसाचा वारू, अलगूज याही कविता लक्षणीय वाटतात. ज्या कवितेचं साऱ्यांनीच कौतुक केलं आहे, अशा कविता 'एक सानशी कळशी.' संध्याकाळी पाणी भरणाऱ्या मुग्धेचं शब्दचित्र सुंदर रेखाटलंय. तिच्या मोहक हालचाली, धाप टाकणं, घाम टिपणं आणि कितीतरी वेळ हे चाललयं.

'किती वेळ हे असे कळेना तुझे ओढणे चालायचे,
सांग कधी तव सुभग करांनी तृपितांना जळ लाभायचे ?'

असं अचूक जागी संपल्याने शब्दचित्रात अधिक सौंदर्य जाणवतंय. पण हे नुसते मुग्धेचे चित्रण नसून ते कवयित्रीच्या अंतर्मनाचे चित्रही होऊ शकते असं अनुराधाबाईंना वाटतं. आपल्या अंतरंगाचा तळ तिला अजून सापडला नाहीवे. असे कवितेला सूचक अर्थाचे, संमिश्र अनुभूतीचे आणि संपन्न प्रतिमेचे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

नवेच परिमाण लाभते आहे.

१९५७ मधे 'चित्रा' संग्रह प्रकाशित झाला. चित्रविचित्र भावाशय आणि अभिव्यक्तीचे समाधान हा संग्रह देतो. 'संसार' मधल्या धुंद प्रेमगीतानंतर काही निवडक कविता वगळता 'छाया' मध्ये बऱ्याचशा कविता सपाट, सरधोपट वाटत होत्या पण 'चित्रा' मधे मात्र काहीशी कात टाकून नवी अंगकांती ल्यायलेली दिसते. हा बदल आजूबाजूच्या परिस्थितीचे भान येऊन जाणीवपूर्वक जिद्दीने घडविला असावा. 'गीत नव्याने' ही पहिली कविताच हे सांगते. नव्याने गीत गायचे तर रचनेसाठी कल्पनेला नवा उजाळा, वृत्तींना नवा फुलोरा, भावनांना नवा उमाळा आणि शब्दांना नवा प्राण हवा. 'श्रवणावरती आण अनावर नव्या युगाचा नवीन गौरव' असे भान मराठी कवितेत झालेल्या क्रांतिकारक बदलांमुळे आले असावे. कवितेच्या प्रांतात टिकायचे असेल तर पहिला बहर ओसरल्यावर 'नव्या' ची मागणी करावीशी वाटली असेल. मात्र त्यामुळे यापूर्वी व्यक्त न झालेले अनुभव यातल्या नेमकेपणाने आणि नाट्यपूर्णतेने आकार घेऊ लागले. अनुभवांची संमिश्रता कवयित्रीच्या मनात रूप घेऊ लागली. कधी नव्या पारदर्शक प्रतिमा येऊ लागल्या ज्यामुळे अर्थाची वलयं निर्माण करण्याचं सामर्थ्य आलं. काव्यातली कृत्रिमता, सजावट जाऊन साधेपणाने जीवनातले अनुभव येऊ लागले.

आता परमेशाची जाणीव गिरीकंदर, वृक्षराजी, काळरात्र, धूलिपटल या सर्वाआडून होते आहे. त्याचं स्मरण सुखात रमताना असावं म्हणूनच ती म्हणते 'ओघळणाऱ्या स्मृतीस माझ्या तुझी खुणेची गाठ असावी'.

प्रेमकवितेत अधिक विविध रंग दिसतात. आता या वेळपर्यंत प्रेमातली धुंदी तसेच अतृप्तीचे सलही अनुभवले होते आणि तेच कवितेतून उमटलेले दिसतात.

घरात भिंतीवर टांगलेल्या चंदनपुतळीकडे पाहताना सहसंवेदन सुरू झाले. जननांतरीचे ऋणानुबंध जाणवले आहेत. दोघींच्यातलं साम्य 'मी संसारी, ती फलकावरी बंदिस्त तशा निःसंग, उन्मन' अशा शब्दात कविता टिपते. त्याच्या संयमित प्रीतीने अपेक्षांचा अंतर्पट दूर सरकत नसला, माझे-तुझे सारे विषम वेल्हाळ असले, आपला वास्तवाच्या वाळवंटी वास असला तरी प्रीतधाग्याने स्वप्नपुष्पांचा हार गुंफला आहे आणि तोही जेव्हा तिच्या रागासाठी कोमल बनतो, तिचे भाव कोमेजताच आसवे शिंपतो. थोडक्यात स्वतःला विसरून तिला जगवतोय हे पाहून तिला भरून येतं आणि ती विचारते 'माझे मागील जन्माचे कारे फेडितोस ऋण ?' प्रीतीखातर अमृताहूनही मधुर बनावे ही स्थिर भावना असल्याने शीतोष्ण झरे अनुभवावे लागले तरी अधरी सुंदरतेची गीतेच आहेत आणि पानोपानी तृप्तीची कथाच आहे आणि आयुष्याच्या संध्याकाळी सुरकुत्यांची दाटी झाली असली तरी आपण निरंतर एकमेकांसाठी आहोत. नको ताटातुटी ही अपेक्षा आहे.

दोघातलं नातं बदलल्याने हिला प्रश्न पडतोय की मी पूर्वीचीच आहे का ? मनाचं विवर हुळत्या गीतरवांनी नाहतं आहे. 'उपेक्षाच नेसण्या प्रीतीसतीला' म्हणताना प्रेयसीच्या व्यथित, विव्हळ मनाचे दर्शन घडते.

इथली वात्सल्याची कविता भुरभुरणाऱ्या केसांचा, हास्याच्या वर्णनावर न थांबता मातेला हरवून टाकणाऱ्या सुंदर पातळीवर पोचते आहे.

'माझेपण मजला कुठले या फुलात मी लपलेली,
लेपण्यात सार सुखाचे ज्याखातर मी टपलेली'



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

वेगवेगळ्या टप्प्यावरचे स्त्रीजीवन आपल्याला इथे भेटते. 'ही आशेची कळी' मधे परकरी गोजिऱ्या मुलीचे चित्रण हृद्य आहे. तिला पहाताना कवयित्रीला वाटतं 'अजून नाही मानवतेची सरली सुखसंपदा' जीवन सौंदर्याने नटलेलं आहे, व्यापलेलं आहे या जीवनासक्त वृत्तीचं दर्शन आणि मानवतेची पूजा करण्याची भावना जाणवते. कधी सख्यांसह नाचगाण्यात तल्लीन होणारी गायिका भेटते आणि 'या गडे हासुया या गडे नाचु या' असं जनमानसात पुढे रुजलेलं गाणं देते. स्त्रीत्वाची, स्वत्वाची जाणीव, तेजस्वी वृत्ती दर्शविणारी कविता 'स्त्री माझे नाव असे', स्त्री केवळ साधी गृहिणी नाहीये तर कलावती, शिक्षक, सेवक, कांता असणारी ती म्हणते, 'संस्कृति मी जणू समूर्त स्त्री माझे नाव असे'. हे जसे बदलत्या काळाचे, बदलत्या अविष्काराचे भान आहे. तसेच स्त्री आणि संस्कृती अभेद म्हणताना टागोरांच्या स्त्रीविषयक दृष्टीकोनाशी जुळणारेही आहे. 'या वळणावर' मधे तीन टप्प्यावरची स्त्री नेमकेपणाने पुढे आली आहे. रसरसणारी गीत गाणारी, ती वेगळी, नंतर क्षणाक्षणाला खंडित प्रीतिस्वर उमटवणारी दुसरी आणि गतकाळाचे तांडव विसरून डोळ्यांना भविष्यवेलीवरचा मोहर दाखवणारी, चिरंतनाला अनुसरणारी तिसरी. कोणत्याही समंजस संसारी स्त्रीचे चित्र रेखाटणारी ही कविता आहे.

कवितेत निसर्ग स्वतंत्रपणे क्वचित येतो, पण तो तिला प्रेरणा देणारा नक्कीच आहे. पाखरांचे पंख लेवून, चांदणे सेवून एका सुरात अनंताचा छंद तिला गावासा वाटतो आहे. 'मौन' मध्ये दोघांच्या मनात बोलायचे खूप आहे, पण मुक्याने वाहणारं पाणी, मुके वृक्ष, मुके वारे, मुके नभ, डोंगर, भुंगे, काळोख यामुळे ते दोघेही आहेत. 'क्षितीजावरती' मध्ये द्विधा मनस्थितीत प्रश्नांच्या कात्रीत सापडलेली ती कधी उषा तर कधी संध्या होऊन राहते.

'माहेरची फुलवात, सासरचे नीरांजन, प्रकाशाला आमंत्रण' म्हणताना माहेरच्या कौतुकाबरोबर सासरविषयीचा जिव्हाळाही व्यक्त करते.

'सुट्टी' मध्ये मुलांच्या आठवणींने कासावीस होणारे दोघेजण अगदी साधेपणाने रेखाटले असले तरी मुलांचं गावी जाणं त्या दोघांना किती रितेपण आणतं याचा अनुभव देऊन जातं.

कवयित्रीची वृत्ती काल आणि उद्याला ओलांडून आज होऊन येणारी असल्याने त्या शक्तीच्या बळावर त्या जीवघेण्या कामनेच्या आणि विश्वव्यापी वेदनेच्या, असह्य तृष्णेच्या पलीकडे पोचल्या आहेत. यातून मुक्त होऊन सौंदर्य शोधणारे त्यांचे मन तृप्त आहे आणि तेच 'आज मी भानात नाही' या कवितेतून सुंदर साकार झालंय. भाव अचूक टिपणारे शब्द, त्यातून साधलेली लय यांच्या मिलाफाने हे अवीट गोडीचं गीत साकार झालंय. पुष्कळ भोगल्यावर जीवाचे स्वतःच्या अंतर्मनाशी, जीवनाशी जे सख्य जुळले त्याचीच प्रचीती यातून येते.

चित्रानंतर जवळजवळ १४ वर्षांनी १९७१ मध्ये 'चंद्रफूल' हा संग्रह प्रसिद्ध झाला. कडव्यांच्या इमारतीतून जवळजवळ सुटका झालेली आहे. गीत, भावकाव्य वेगळे याची जाण या संग्रहात स्पष्ट दिसते. कवितांचे विषय ढोबळ न राहता एखादी भाववृत्ती, एखादा क्षण, एखादी आठवण पकडण्याकडे कल दिसतो. ज्यांच्यात काही अबोधही व्यक्त होऊ पाहते अशा रचनांना स्वगच्या आधाराची कल्पनाही मनात नसते. अनुभवाला शोधत जाताना सापडलेले आकार वाचूनच जाणून घ्यायचे असतात.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

या संग्रहापूर्वीच समीक्षक कवितेबद्दल बोलू लागले होते. सांसारिक गीते लिहितात, गृहजीवनातल्या प्रणयाची, भक्तिवात्सल्याची चित्रे काढण्यात रमलेल्या आहेत असे बोलले जायचे. 'छाया' पर्यंत हे खरे होते हे त्यांनाही मान्य होते. 'चित्रा' त बदलाच्या दिशेने सुरू झालेला प्रवास 'चंद्रफूल'मध्ये निश्चित दिसतो. अर्थात बदल हा मर्यादित स्वरूपातच जाणून घ्यायला हवा. त्यांची प्रतिभा विश्वरूपिणी होऊ शकलेली नाही हे निश्चित.

त्यांची कविता दुःखापासून दूर असाही आक्षेप घेतला जायचा. प्रथम ती तशी होती आणि नंतरही जिथे दुःख प्रगट झाले तेव्हा सुन्न करून टाकू शकले नाही. याला कारण तिची मनोवृत्तीच आहे. काळोखाच्या तटी उभी असताना तिच्या दारी प्रकाशपाहुणा आलेला असल्याने हे घडले आहे. या संग्रहातल्या अनेक कवितातून हाच स्वर ऐकू येतो.

'अवघ्या असारात सार इतकेच ध्यानात असू द्या
तनभाव उल्हसित, वृत्ती निर्भर असू द्या
प्रश्न सुंदराचा आहे उत्तर सुंदर असू द्या'

असं आयुष्यात प्रश्न आणि उत्तर सुंदर बनल्यावर वादळाच्या येण्याजाण्याची तिला तमा नाहीये. व्रण बुजल्या काळजांचे तोंड तिला उसवायचे नाहीये. स्वर्गधारेच्या संगमाशी हा स्वप्नदर्शी विहंग असल्याने जळास्थळाच्या सीमेपुढली उन्मनी हवा प्राशून क्षितीजावरच्या तारका केसात माळल्या आहेत, नभःसराच्या दळात पोळल्या व्यथा क्षाळल्या आहेत आणि स्वर्गभूमीच्या शिखरावर अमृतवल्ली रोवल्याने लयप्रलयाची भीती उरलेली नाही. ती सूरशब्दरसरूपमत्त झाली आहे. अर्थात याकरता तळी दाटलेलं पृष्ठावर आणून, कंठात कोंडलेलं मोकळं करून, अस्मिता घासून चंदनाचा गंध द्यावा लागतो आणि मनाला मुग्धता द्यायला शब्द विसरावे लागतात. अंतरीच्या दीपपात्री नवस्वप्नाला लावून वेडावाकलेला मार्ग पुन्हा रेखून घ्यावा लागतो आणि मग सारं असणंच होऊन जातं एक सुगंधी मुलाखत.

एका सुवर्णक्षणाला जग प्रेमाकार झाले आणि मग प्रेम आदी, अंती, अवतीभोवती असं सर्वस्वाच्या ठायी प्रेम मोहरला आले अशी 'चंद्रफूल' मधली पहिलीच कविता प्रेमावरचा गाढ विश्वास प्रगट करते.

आपल्या कवितेबद्दल कवयित्री म्हणते की या आहेत पायखुणा माझ्या व्यथांच्या ज्यांच्यात माझ्या सर्वस्वाच्या कथा आहेत. शतरंगाचे तांडव मांडव रसगंध ओतत. ती कवितेत अजून ठाम उभी आहे. केवळ स्वतःच्या नाही कवीजातीच्या काव्याचं मर्म आपल्या हाती देते.

'मर्त्य आमुच्या हाती आम्ही धरिला आहे अमरदिवा
कणाकणावर नवी काजळी दीपोत्सवही नित्य नवा'

या अमरदिव्याची कांती तिन्ही भुवनांना प्रकाशमान करणारी आहे. कवीचा व्यवहार सुंदर शब्दात व्यक्त झालेला पाहताना केशवसुतांची आठवण झाल्याशिवाय रहात नाही. मात्र कवितेने तेच तेच आणि तसेच सांगू नये असेच हिला वाटते आहे.

संजीवनीबाई स्वतंत्र निसर्गचित्रे क्वचित्‌च रेखाटतात. पण इथली 'पारिजात थरथरला' निसर्गचित्रणाचा सुंदर नमुना म्हणून सांगता येईल. 'देह तयाचा क्षणभर झाला सोनपऱ्यांचा झोला' 'नजर कळ्यांची विस्मित



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

झाली ओढूनि त्यांनी अंगी धरला गंधकेशरी शेला' या ओळी, तसंच 'अपुरा अंचल' मधल्या 'निळसर हसऱ्या मेघमुखावर अवयव झाले चंद्रचांदण्या' या ओळी आनंद देऊन जातात. 'पारिजात थरथरला' तसं पाहिलं तर निसर्गाच्या पार्श्वभूमीवर केलेलं आत्मचिंतनच वाटतं.

वाढत्या वयाचा उल्लेख काही कवितांतून येतो. पर्णरूप कल्किसम जीवाचे असणे जीर्ण मनाला पर्युत्सुक करते. आता पायांना वेग नाही आणि कामनेचे पंख मिटून कबूतर बसले आहे.

छोट्या ४ ओळींच्या कविता संग्रहात प्रथमच भेटतात. कवयित्रीची प्रयोगशील वृत्ती सुचवतात आणि अर्करूपाने आशय हातात देतात. 'दान देणार असशील तर ते स्वप्नांच दे आई !, सत्याची भाकर मला पचणार नाही ग नाही' हे उत्तम जमलेल्या चौफुल्याचं उदाहरण म्हणून सांगता येईल.

आता कवयित्रीचे लक्ष नंतरच्या पिढीकडे पण वळले आहे. कुणा एखादीला 'धर्गीमधलं नवं पाखरू आभाळ झेपून जाईल' म्हणत धीर देते. तर जीवन विस्कटून गेलेलीला कोमेजून न जाता तुला फुलण्यासाठीचं वेदनेनं जन्म दिला आहे म्हणत सांत्वन आणि पुन्हा आयुष्याला उभारी देते. कोवळ्या वयातल्या, कोवळ्या स्वरातल्या आपुलकीनं केलेल्या चौकशीनं, तिच्या हसण्या-वहरण्यानं नायिकेच्या एकाकी मनात तीच श्रावण वनलीय.

सहजीवनाच्या कवितात त्याने आपले म्हणणे ऐकावे म्हणून शिणणारी स्त्री दिसते. कधी 'मी माझी' असं तिला वजावून सांगावंसं वाटतं, कधी चिरेबंदी वाड्यात अडकून पडल्यासारखी भांववली आहे. नवख्या आभाळात वाट चुकले तर खूण करशील का? असा प्रश्नही विचारते. आयुष्यात काही क्षण येऊन गेलेल्याला मला तुझे गंधगाणे गायचेच नव्हते म्हणून मुकाट्याने वावरत होते. चुकले तेवढे डोळेच फक्त तुझे होते म्हणते.

'मी दिवाणी' हा संग्रह १९८१ मध्ये आला. यातल्या 'मातृका' या पहिल्याच कवितेत 'शब्द स्वर जाहले गीत गर्भात वे, मातृका मीच मज मिरविते आजला' अशा शब्दात गर्भवतीला वाटणारा आनंद अन् अभिमान कवितेच्या जन्माने ही वाटतो आहे म्हणून सांगते. हाच अभिमान 'अमुची रत्ने शब्दांची, ललित लयींची छंदाची' म्हणतानाही वाटतो. कवितेच्या पसाऱ्यात अजून रंगून जायला होतंय म्हणूनच ती म्हणते 'खोटुल्या खेळात जन्म सरो आला नाही ढळलेला शब्दरंग ! आनंदाच्या वा व्यथेच्या कथांना शब्दांची अंगडी टोपडी केल्यावर, इतका काव्यप्रपंच केल्यावरही वाटतंय की जिच्या दिव्याची मी देखभाल केली ती कविता किती निराळी.

'विझून गेले भान पुसटल्या ध्यासाच्या साऊल्या, त्याच क्षणातून उमलूनी आल्या हरिकुसुमांच्या कळ्या' अशी परमेशाचं वेगळचं भान करून देणारी सुंदर कविता इथे भेटते. हा सखा सांत्वनाचा शब्द द्यायला, प्राक्तनाची संगती लावून द्यायला आहे आणि या सोयऱ्यामुळेच जिणं महापर्वणी झाल्याची अनुभूती येते आहे.

संजीवनींच्या व्यक्तिमत्त्वाची आणि कवितेची ही गंमत आहे की, मध्यान्हीचा सूर्य वर असला तरी शैशवातलं गंधओलं गीत अजून कानावर आहे. स्वप्न विरून गेलं तरी अजून पापणीशी आहे. तिची पहाट अजून तशीच आहे. आयुष्यात निराशेचे क्षण भेटले असणारच पण त्याकडे अलिप्तपणे पाहणारं मन





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

लाभलंय. 'निबंधने सदा अशी जुळायची, तुटायची पद्मपात्रे प्रीतिच्या अलिप्त मी असायची'

'मी' चा शोध इथे अधिक कवितात दिसतो. मी, माझे, मला याचा शाप लाभलेली ती स्वतःला ययातीची आवृत्ती म्हणवते.

मी तुझा सासरा म्हणणाऱ्या संसाराला तू देणारा नाही तर आसरा घेणारा आहेस म्हणून ठणकावते. संसारातल्या लोभस नात्यांचा, कधी पतिपुत्र यांच्याविषयीचा अभिमान पुष्कळच साध्यासरळपणे पुढे येतो. प्रश्न विचारणाऱ्यांना व्यथा, घाव, करुणा, प्रीती, नीती सारं अनुभवलंय म्हणून सांगते. संसाराच्या सुरुवातीला जे हासले त्यांच्या हसण्याने धुंद नयनात जागृती आली.

'चंद्रफूल' पेक्षा इथे पुन्हा प्रेमकविता अधिक भेटतात. समर्पणशील प्रेयसी कल्पनावल्लीला झुला बांधून घे म्हणते आहे. स्वप्नवत जगणं जमल्यामुळे आपली प्रीत तिला जगावेगळी वाटते आहे आणि म्हणूनच ती सखीजवळ कबुली देते की, हे मन चंचल तरीही निश्चल, प्राणप्रियाच्या ठायी. तो अनिर्बंध, श्रांत होतो तेव्हा ती छायाघन होऊन बरसते. आता फिरून तारा समेवर जुळून आल्या आहेत.

कधी सख्यांसह शैशवातले आंबटगोड क्षण आठवावेसे वाटतात तर कधी कविता रसिकांशी संवाद करते अन् चरित्र लिहा म्हणणाऱ्यांना कवितेशप्पथ एवढं ऐका. चरित्र वगैरे लिहिण्याचं नावच काढू नका.

तान्ह्या बाळाला बघून जसं परिपूर्ण वाटतं तसं मुलं मोठी झाल्यावरही त्यांच्या तू आमची आमच्यासाठी म्हणण्याने तिला परिपूर्ण वाटतं.

ज्या गीतगायनात रसिकांची दाद मिळवली तेसुद्धा आता नकोसं झालंय. कारण आता मौनाची कोर उगवते आहे. आयुष्याच्या संध्याकाळी रसिकांना केलेली ही विनवणी आहे. आयुष्यात सौंदर्य शोधत जावं हेच तिचं सांगणं असल्याने 'या मैफलीत कोणी राहू नका उदास' सारखं भावगर्भ गीत कवयित्री लिहून जाते.

'मी दिवाणी' तल्या कवितांचा विचार केला तर मागच्या संग्रहापेक्षा फार वेगळं काही मांडलंय असं वाटत नाही. विकासाचा टप्पा गाठला होता. तिथेच त्या आहेत. कदाचित आता उतरणीवर वेगळी अपेक्षा करणही चूक आहे.

'आत्मीय' हा शेवटचा ९४ सालातला संग्रह. अरुणा ढेरे यांनी प्रस्तावनेत जो प्रश्न उपस्थित केला आहे तो मलाही पडला आहे आणि माझ्यानंतरच्या पिढ्यांना तर तो नक्कीच पडेल. इतकं तप्त, स्वप्नसदृश जगणं कसं काय जमलं असेल ! आजच्या विशीतल्यांना तर ते अशक्यच वाटेल. संजीवनी पुरस्कारासाठी महाविद्यालयीन विद्यार्थिनींच्या कवितास्पर्धेतल्या कविता ऐकताना जाणवलं की प्रेमकवितेला बहुसंख्य विद्यार्थिनींनी स्थान दिलं नव्हतं. कवितेचं संवेदन बदलत आहे याचं हे काहीसं प्रातिनिधिक स्वरूप मानायला हरकत नाही.

'मी दिवाणी' नंतरचा म्हणजे वयाच्या उतरणीवरचा हा संग्रह असल्याची प्रचीती ठायीठायी येते. तरीही अजून शब्दांची जादू आहे. नादाचे वेड आहे. मुक्तछंदाचा वापर मागच्या काही संग्रहापासूनच त्या करायला लागल्या आहेत.

कणिकांची मितभाषी रीत कदाचित आवडल्याने इथेही चौफुला नावाने ४ ओळीच्या वेगवेगळ्या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

विषयांच्या कवितांचा गट आपल्यापुढे येतो. यातही कवयित्रीच्या स्थायी भावावरचे चौफुले आहेतच.

'प्रेम असते ज्याचे नाव, सारे जगच त्याचे गाव,
त्याचे पाऊल जिथे पडते, तिथे नेहमी सुखच फुलते.'

* * *

'गळताना फुलण्याचे वेड मला, तुटताना गळण्याचे वेड मला,
मिटलेले नेत्र खुळे उघडुनिया, स्वप्नासम विरण्याचे वेड मला'

इतर कवितांमधे परमेश्वराच्या ध्यासाच्या कविता अधिक आहेत. त्याच्या कृपेनेच पाऊल डगमगताना आधार मिळाला, शब्द स्वर लाभला, इतकंच काय पण प्रेमसुखाचं संचितही त्यानेच पदरी बांधलं आहे. आता सख्या सावळ्याची माझी सलगी घडू दे ही विनवणी आहे.

मागच्या प्रेमगीतासारखंच एक गोड गाणं इथेही नादलयींनी, शब्दांनी भारून टाकणारं आहे 'असावे असे गुंफूनी हात हाती, झुलाव्या सभोती अशा गंधराती'.

पण अशी एकाद दुसरी कविता सोडली तर इतरत्र आता टपोरल्या भावकळ्या गंगेच्या शांत जळात अर्पायच्या आहेत. निरोपाच्या क्षणालाही अक्षरांनी साथ द्यावी आणि निरोपाचा क्षण मणीमोत्यांनी सजावा आणि प्रीतभरल्या पंखांनी रावा दिगंत उडावा ही इच्छा आहे. अजून तिच्या आतल्या आंधारवाटा तेजाला तहानल्या आहेत. आता प्रत्यक्षात पेंगुळली तरी अक्षरात जागी असलेली ती वडीलकीच्या पडद्याआड असलेली लहानगी आहे. तिला वाटतंय सांजवेळ झाली असं सारखं त्यानं म्हणू नये उदासपणे.

आयुष्यभर ज्या स्वप्नाचं दान हिला लाभलं ते स्वप्न कसे मिटवायचे तिला कळत नाही.

'हे स्वप्नप्रस्थ सोडून, वाटते वनांतरी जावे,
राणीव अशी मायावी, गंगेत विसर्जुन यावे !'

त्या म्हणतात, 'न कळे कशी मला पडत गेली प्रकाशाचीच भूल' कवयित्री अंधार दिसलाच नाही. उमलण्याचे कोडेच ती उलगडत राहिली. पण आता मात्र थोडे काही उमगले आहे. हे सगळं त्यांच्या पूर्वीच्या कवितेपेक्षा वेगळं आहे. स्वप्नांना दूर सारून स्वत:चा शोध घेण्याचा प्रयत्न काही कवितांत दिसतो.

या सर्व संग्रहांच्या वाटचालीत संजीवनींचा एक पैलू बाजूला राहिलाय, तो म्हणजे बाल-कविता. 'वरं का गं आई' 'हसू बाई हसू' या बालगीत संग्रहांना राज्यपुरस्कार मिळाले आहेत. बाल साहित्य निर्मितीबद्दल बालकुमार साहित्य संमेलनातर्फे पुरस्कार (१९९२) मिळाला आहे. मुलांचे भावविश्व फुलवण्यात त्या कुशल आहेत. मोठ्या माणसांचं अनुकरण करणारी लहान मुलं आणि लहान मुलांच्या दृष्टीला दिसणारं मोठ्यांचं जग त्या सहज व्यक्त करतात. लहान मुलांच्या विश्वातील कुतूहल, स्वप्नमयता, रूसवा फुगवा, निरागसता, स्नेह यांचं नेमकं रेखाटन त्या करतात.

एका मुलाखतीत त्या म्हणतात, 'मी वत्सल गीत लिहीत होते. गात होते, पण त्यांना बालगीत म्हणता येणार नाही. मुलं बालक मंदिरात जायला लागल्यावर त्यांच्या शिक्षणपद्धतीकडे वळले आणि हसत खेळत मुलांचं सामान्य ज्ञान वाढवायचं, त्यांची मन फुलवायची या गोष्टी पाहून मला नवं काही सुचायला लागलं. साधी छोटेखानी रंजक बालगीतं मी लिहायला लागले. उदा. आकड्याचं गाणं. 'एक, दोन, तीन, चार ।



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जिकडे तिकडे हिरवेगार' इ. मुल मोठी झाल्यावर त्यांच्या आवडी निवडी, कल्पना कळायला लागल्या आणि मग जाणत्या वयाच्या मुलांसाठी गीतं लिहिली. माझ्या आजूबाजूला जे कवी-कवयित्री बालकाव्य लिहीत होते. तेही पहात होते. अनुकरण नाही, पण नव्याचा संस्कार माझ्यावर लवकर होतो. त्यामुळेच 'वरं का गं आई' 'हसूं बाई हसूं' पुस्तकांत कल्पनाप्रधान भावूक मनाच्या मुलामुलींचं चित्रण सहज करता आलं. उगीच शब्दाला शब्द जुळवून बालगीत निर्माण होत नाही.'

'तू आहेस बेबी, मी आहे आई, वरं का गं आई, हे विसरायचं नाही' ही त्यांची खूप लोकप्रिय झालेली कविता लहानांनाच काय पण मोठ्यांनासुद्धा आवडते. ढग आले तेव्हा लहानग्याला प्रश्न पडतो त्यांना उन्हाळ्यात का कोंडून ठेवलं होतं. काहीतरी दे ना म्हणत मुलं भुणभुण लावतात. तिचचं गाण झालं. 'आई तुला दाखवू का', 'नको बाई रुसू', 'शहाणा' याही कविता मान्यता पावल्या आहेत. काही गीत केवळ नादनिदर्शक शब्दांची तर काहीत खेळाचं वर्णन, कधी संस्काराचा भाग तर कधी त्या त्या गोष्टी कल्पना यांचा परिचय करून देणं. उदा. रंगांची गाणी, वारांची ओळख करून देणारं सात पाहुणे. खऱ्याखुऱ्या बालसाहित्याचं दुर्भिक्ष्य असताना संजीवनीबाईंच्या साहित्याने केलेलं योगदान मोलाचं आहे.

संजीवनीबाईंच्या समग्र कवितेचा आस्वाद घेताना त्यांच्याच पिढीतल्या पद्मा गोळे आणि इंदिरा संत यांची आठवण अपरिहार्यपणे येते. या तिघींनीही मनात आले तेच गायले आहे. तिघीही पांढरपेशा मध्यमवर्गातल्या कवयित्री आहेत. त्यामुळे त्यांच्या कवितेतले वातावरणही त्याच संस्कृतीचे द्योतक आहे. सफल प्रीतीचं चित्रण हा तिघींनी केलंय. तिघींचेही प्रेमविवाह झालेले आहेत. त्यामुळे प्रेमसाफल्याचा प्रत्यक्ष अनुभव तिघींनाही आहे. कवितेबद्दल नैसर्गिक प्रेम तिघींच्यात आहे. संजीवनी-पद्मा एकाच शाळेतल्या पण इंदिराबाई दोघींच्या मैत्रिण होत्या. कवितेवरचं प्रेम तिघींनीही बोलून दाखवलं आहे आणि सगळ्यांचाच स्थूलाकडून सूक्ष्माकडे प्रवास आहे. मराठी कवितेची निष्ठेने त्यांनी उपासना केली आणि त्यांना स्वतःचे स्थान मराठीत लाभले आहे. आत्मनिष्ठेमुळे तिघींचीही कविता पसंतीस उतरली आहे. तिघी स्त्रीचं विश्वच प्राधान्याने उलगडवतात. संजीवनीबाईंनीच तिघींमध्ये गेय कवितेची वाट चोखळली आहे आणि कविसंमेलनातून कविता गायली आहे. कोशात राहिल्याचा आरोप तिघींवर केला जातो. त्यांच्या त्यांच्या कुवतीनुसार तिघींनी नव्याचे वारे अंगावर घेतले आहे. रा. श्री. जोग म्हणतात त्यांना भीषण वास्तव्य भेडसावत नाही आणि सत्, सुंदर यावरच्या श्रद्धेला धक्का लागलेला नाही. मानवतेचा उच्चार यांच्या कवितेत क्वचितच दिसतो. परिस्थितीला प्रतिक्रिया वैयक्तिक असतात. पण हे आक्षेप मला एकांगी वाटतात. प्रत्येकीने आपापल्या पद्धतीने राष्ट्रीय भावनेचा, सामाजिक भावनेचा अविष्कार केलेला आहे. आता ती गर्जा जयजयकारच्या तोडीची नसेलही कदाचित. प्रेमकविता बरोबर वत्सलभावाची गीते तिघींनीही लिहिली आहेत. आज तिघीही हयात नाहीत. आता त्यांची कविता बदलण्याची शक्यता नाही पण आज माहीत असलेल्या तिघींच्याही कविता जनमानसात रुजल्या आहेत. स्थिरावल्या आहेत. आक्षेपकांच्या आक्षेपापलिकडचं प्रेम त्यांना लाभलेलं आहे. अन् ते स्थान तसंच राहील.

◇ ◇

माधवी पटवर्धन

ब्लॉक नं. ३, वासवी सोसायटी, सदाशिव पेठ. पुणे ४११ ०३०.










# कादंबरीकार वि. वा. हडप



डॉ.स्वाती सुहास कर्वे

'कादंवरी' हा वाचकप्रिय वाङ्मयप्रकार आहे. त्यामध्ये 'ऐतिहासिक कादंवरी' हा कादंवरी - लेखनाचा तरीही स्वतंत्र लेखन प्रकार आहे. सामाजिक कादंवरीप्रमाणेच ऐतिहासिक कादंवरीही वाचकांना आवडत असते. ऐतिहासिक कादंवरीचा स्वतंत्र वाचकवर्गही आहे. मराठी कादंवरीच्या मोठ्या प्रवाहामध्ये मराठी ऐतिहासिक कादंवरीचाही प्रारंभापासून आजपर्यंत अखंड प्रवाह आहे. ऐतिहासिक कादंवरीकारांची एक फळीच निर्माण झालेली आहे. 'मोचनगड' या पहिल्या मराठी ऐतिहासिक कादंवरीचे लेखक रा. भि. गुंजिकर यांच्यापासून ते 'पानिपत'कार विश्वास पाटील यांच्यापर्यंत ऐतिहासिक कादंवरीकारांच्या अनेक पिढ्या वाचकांना ऐतिहासिक कादंवरीद्वारे जीवनदर्शन घडवीत आहेत.

रा. भि. गुंजिकर, नागेश वापट, हरिभाऊ आपटे, नाथमाधव, साधुदास यांच्या यादीत आणखीन एक नाव सन्मानाने घ्यावे लागते. ते ऐतिहासिक कादंवरीकार कै. वि. वा. हडप यांचे.

हरिभाऊ आपटे यांच्यानंतर म्हणजे साधारण १९२० नंतर १९६० पर्यंतच्या काळात नाथमाधव, साधुदास आणि वि. वा. हडप हे तीन महत्वाचे ऐतिहासिक कादंवरीकार आहेत.

यंदाचे वर्ष कै. वि. वा. हडप यांचे जन्मशताब्दि वर्ष आहे. त्या निमित्ताने त्यांच्या ऐतिहासिक कादंवरीक्षेत्रातील कामगिरीचा चिकित्सक विचार केला पाहिजे.

वि. वा. हडपांनी उदंड लेखन केले आहे. त्यांच्या लेखनात जसे सातत्य होते, तसे वैविध्यही होते. २५ सामाजिक कादंवऱ्या, २२ लघुकादंवऱ्या, २ कथासंग्रह, ४ नाटके त्यांनी लिहिली आहेत. त्या वरोवरच 'कादंवरीमय पेशवाई' ही २२ भागांची कादंवरीमाला आणि 'कादंवरीमय आंग्लशाही' ही सहा भागांची कादंवरीमाला हडपांनी लिहिली आहे.

१९१७ साली हडपांची पहिली कादंवरी प्रसिद्ध झाली होती. 'झाकली मूठ' या पहिल्या





**वि.वा.हडप**
**जन्मशताब्दी वर्ष**

**जन्म :** २२ सप्टेंवर, १९०१.

**निधन :** १२ मार्च, १९६०.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



कादंबरीपासून हडपांच्या लेखनाने जो वेग घेतला, तो शेवटपर्यंत कायम होता.

वि. वा. हडप यांनी सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या असल्या तरी त्यांना खरी लोकप्रियता व प्रसिद्धी ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून मिळाली. म्हणून हडपांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या संदर्भात सदर लेखामध्ये विचार करण्याचे मी ठरविलेआहे.

ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून त्यांच्या कर्तृत्वाचा विचार करण्यापूर्वी मराठी ऐतिहासिक कादंबरीचा थोडक्यात आढावा घेणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे ज्या काळात हडपांचे लेखन झाले आहे, त्या काळातील सामाजिक परिस्थितीही समजावून घेतली पाहिजे. एवढेच नव्हे तर, वाङ्मयीन परिस्थितीचा आणि स्थितिगतीचा विचार करूनच हडपांच्या ऐतिहासिक कादंबरीच्या विचाराकडे वळणे योग्य होईल.

१९ व्या शतकाच्या प्रारंभी घडून आलेल्या राजकीय सत्तांतरानंतरचा काळ वैचारिक मंथनाचा होता. विकसित आधुनिक स्थितीकडे होणाऱ्या संक्रमणाचा काळ होता. पूर्वदिव्याची ओढ मनात घुमत असतानाही समाजमन कात टाकीत होते. पारंपारिक कल्पना, सामाजिक समजुती, राजकीय जाणिवा या मधून समाजमन घुसळून निघत असताना इंग्रजी वाङ्मयाच्या परिचयातून 'कादंबरी' या कथात्म वाङ्मयप्रकाराशी परिचय झाला होता. समाजजीवनाच्या संघर्षाचे आणि व्यक्तिमनाचे चित्रण करणारा 'कादंबरी' व गद्य लेखनप्रकार अनेकांना भावला होता. बाबा पद्मनजी यांची 'यमुना पर्यटन' ही मराठीतील पहिली सामाजिक कादंबरी हे एक 'वाङ्मयीन-रोपण' (लिटररी प्लॅन्टेशन) होते.

यमुना पर्यटनाच्या नंतर दहा वर्षांनी गुंजिकरांची 'मोचनगड' (१८६७) ही ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध झाली होती. 'मोचनगड' ही मराठीतील पहिली ऐतिहासिक कादंबरी होय.

कादंबरी या लेखन-प्रकाराविषयीच्या जाणिवा मर्यादित असल्याने ऐतिहासिक कादंबरीचे वेगळेपण इतिहास आणि कादंबरी यांचा होणारा संकर या विषयीचे भान आलेले नव्हतेच. त्याविषयी भान लेखकांना असायला हवे होते. अशी अपेक्षाही करणे शक्य नव्हते. तरीही 'मोचनगड' बद्दल असे म्हणता येते की, ऐतिहासिक कादंबरीचा एक संकरित नमुना गुंजिकरांनी तयार केला होता. शिवाजीराजांच्या विजापूर स्वारीची ऐतिहासिक घटना घेतली होती. 'मोचनगड' नावाचा काल्पनिक गडही उभा केला होता आणि त्या आधारे कादंबरीचा पट चित्रित केला होता. 'मोचनगड' नंतर त्या धर्तीची ऐतिहासिक कादंबरी वेगाने पुढे येताना दिसत नाही. गुंजिकर ते हरिभाऊ आपटे या काळामध्ये इंग्रजीतील हिस्टॉरिकल नॉव्हेल (Historical Novel) च्या धर्तीवर मराठीमध्ये ऐतिहासिक कादंबरी लेखनाचे काही प्रयत्न झाले होते. 'जुनावाडा' (१८०९), हंबीरराव-पुतळाबाई (१८७६) या विष्णु जनार्दन पटवर्धन यांच्या कादंबऱ्या. नागेश विनायक बापट यांच्या 'पहिले बाजीराव पेशवे' (१८७९), छत्रपती संभाजी (१८८४), 'पानिपतची मोहीम' (१८९७) यासारख्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या होत्या. परंतु या कादंबऱ्यांना ऐतिहासिक कादंबरी लेखनाचे प्रयत्न असेच केवळ म्हणता येते. ऐतिहासिक कादंबरी लेखनाचा आदर्श नमुना या लेखनातून सिद्ध झाला नव्हता. इतिहासाच्या वेष्टनातील रंजनपर कादंबरी असेच या कादंबऱ्यांचे स्वरूप होते.

'ऐतिहासिक कादंबरी लेखन' हा स्वतंत्र बाज



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आहे. या प्रकारच्या लेखनासाठी स्वतंत्र दृष्टिकोनाची आवश्यकता आहे. इतिहासापेक्षा कादंबरीतून होणारे जीवनदर्शन अधिक महत्त्वाचे असते, ही जाणीव निर्माण झाली नव्हती. हरिभाऊ आपट्यांपर्यंत मराठी ऐतिहासिक कादंबरी काहीशी चाचपडत स्वतःचा रस्ता शोधीत येत होती.

त्यामुळेच हरिभाऊ आपटे यांचे वाङ्मयीन कर्तृत्व ही 'वाङ्मयीन घटना' - (लिटररी इव्हेंट) होती, असे म्हणता येते. हरिभाऊ पूर्वकाळातील वैचारिक मंथन, सामाजिक, राजकीय परिवर्तने यांचे वाङ्मयरूपी फलित १९ व्या शतकाच्या अखेरीला प्रकट होत होते. चिपळुणकरांचे निबंध, केशवसुतांची कविता आणि हरिभाऊ आपटे यांची कादंबरी ही वाङ्मयीन फलिते आहेत. चिपळूणकर, आपटे आणि केशवसुत यांनी केलेली वाङ्मयीन निर्मिती परंपरा आणि नवता यांच्या नैसर्गिक नात्यातून घडलेली असली तरी मधले बरेचसे अंतर तोडून अधिक कलात्मक उंचीवर प्रगल्भतेवर जाणारी होती.

पूर्व परंपरा खंडीत करून त्यांनी नवे संकेत निर्माण केले होते. वाङ्मयीन नमुने (मॉडेल्स) घडवले होते. लेखनामध्ये जीवनदर्शनाची ताकद निर्माण केली होती. या सर्वापेक्षा महत्त्वाचे म्हणजे त्यांच्या निर्मितीचे अनुकूल असे बाह्य परिणाम झाले होते. वाङ्मयीन बाह्य परिणामांच्या संदर्भात हरिभाऊ आपटे यांचे कर्तृत्व अधिक महत्त्वाचे ठरते.

केशवसुतांनी ज्या प्रमाणे आधुनिक मराठी कवितेचा जन्म घडवला. विष्णुशास्त्री चिपळुणकरांनी निबंधाचा घाट तयार केला. आप्पासाहेब किर्लोस्कर यांच्या 'संगीत सौभद्र' या नाटकाने मराठी संगीत नाटकाचा आकृतिबंध तयार केला. त्याप्रमाणेच हरिभाऊ आपटे यांच्या कादंबरी लेखनाने कथात्म साहित्यातील एका वाङ्मय प्रकाराचा प्रवाह जोरकसपणे वहाता करून दिला होता. कथाआणि कादंबरी यांना स्वतंत्र ताकद मिळवून दिली होती. त्यातूनच 'कादंबरी' या लेखन-प्रकाराला विलक्षण वाचकप्रियता प्राप्त झाली होती. कादंबरी लेखनाची एक लाटच उसळली होती. तत्कालीन सामाजिक गरजेप्रमाणे सामाजिक उद्बोधन, जनजागृती इत्यादी सहेतुकतेचे धागे लेखनात मिसळून गेले असले, तरी समकालीन जीवनाचे किंवा गतकालीन जीवनाचे वाङ्मयीन दर्शन घडवणारे एक माध्यम त्यांनी सर्वासमोर ठेवले होते.

या काळातील विविधतापूर्ण अशा कादंबरीमालांची निर्मिती, त्यामधील संख्यात्मक वाढ हे हरिभाऊ आपटे यांच्या मराठी कादंबरीच्या क्षेत्रातील कर्तृत्वाचे महत्त्वाचे बाह्य परिणाम होते.

आपल्या लेखनाच्या उत्तरकाळात हरिभाऊ आपटे ऐतिहासिक कादंबरी लेखनाकडे वळाले होते. सूर्योदय, गड आला पण सिंह गेला, उषःकाल, मध्यान्ह इ. ऐतिहासिक कादंबऱ्या हरिभाऊ आपटे यांनी लिहिल्या. परंतु हरिभाऊंच्या 'वज्राघात' या कादंबरीने ऐतिहासिक कादंबरी लेखनाचा एक आदर्शच उभा केला होता. ऐतिहासिक कादंबरीच्या रचनेत इतिहास मदत कशी करतो ? इतिहास आणि कल्पित यांचे एकत्रीकरण कसे आवश्यक असते ? ऐतिहासिक कादंबरीतून इतिहास जाणून घ्यायचा नसून गतकाळातील एक जीवनानुभव जाणून घ्यायचा असतो. इतिहासाची मदत किती घ्यायची याविषयी कलात्मक प्रमाणही त्यांनी जणू सांगितले होते.

रामदेवराव राजाच्या जीवनातील शोकनाट्य, त्याचे व्यक्तिगत जीवन आणि ऐतिहासिक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पराभवाची शोकांतिका यांचा सुंदर मिलाफ म्हणजे 'वज्राघात' ही ऐतिहासिक कादंबरी म्हणता येते. कादंबरी ही जीवनाची कलात्मक अनुभुती असते. हे वज्राघातने दाखवून दिले होते. तरीही असे दिसून येते, की वा. म. जोशी, ना. सी. फडके, श्री. व्यं केतकर यांच्या प्रयत्नातून सामाजिक कादंबरी ज्या वेगाने प्रवास करीत पुढे सरकत होती, तसा वेग ऐतिहासिक कादंबरीचा दिसून येत नाही. नाथमाधव, साधुदास, वि. वा. हडप ही नावे घेत आपण पुढे सरकतो. परंतु अतिशय ताकदीने ऐतिहासिक जीवनाचा धांडोळा घेऊन त्यातील जीवन संघर्षाचे चित्रण करणारी कादंबरीकारांची पिढी पुढे आली नाही. चिंतामणराव वैद्य यांच्या 'दुर्दैवी रंगू' (१९१४) या ऐतिहासिक कादंबरीचा उल्लेख मात्र अपवाद म्हणूनच करावा लागतो. पेशव्यांच्या इतिहासातील पानिपतची लढाई, त्यातील पराभव ही महत्त्वाची ऐतिहासिक घटना निवडून, 'रंगू' या काल्पनिक विधवा स्त्रीचे संघर्षमय जीवन त्या आधारे चित्रित केले होते. इतिहास आणि कल्पित यांचा सुयोग्य मेळ असणारी कलात्मक ऐतिहासिक कादंबरी म्हणून 'दुर्दैवी रंगू' या कलाकृतीचा निर्देश करता येतो. ऐतिहासिक कादंबरीच्या संदर्भातील विवक्षित परिस्थिती विचारात घेतच वि. वा. हडप यांच्या कर्तृत्वाचा विचार करावा लागतो.

ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून हडपांच्या कर्तृत्वाचा विचार करण्यापूर्वी ऐतिहासिक स्वरूपाच्या लेखनाविषयी विचार करावासा वाटतो.

कोणत्याही भाषेतील साहित्यामध्ये आपल्याला ऐतिहासिक स्वरूपाचे लेखन दिसते. हे लेखन एका विशिष्ट मन:प्रवृत्तीतून होत असते. ही मन:प्रवृत्ती माणसाच्या मनाचा धर्मच असतो. याचे कारण वर्तमान, भूत आणि भविष्य या तीन काळांशी आपण मनाने आणि जीवनाने वांधलेलो असतो.

भूतकाळातून आपण वर्तमानात उतरत असतो. भूतकाळाची दोरी धरूनच वर्तमान जीवन आकाराला येत असते. वर्तमानात असणारी स्थिती पुढील भविष्यकाळाची गती निश्चित करीत असतात. उद्याच्या भविष्याची स्वप्ने नेहेमीच वर्तमानाच्या खांद्यावर उभी असतात आणि वर्तमान भूतकाळाच्या पायावर पाय ठेऊन उभे असते.

हे कोणत्याही काळात घडत असतेच. आपल्या मनात भूतकाळाची जाणीव असते. इतिहासाची पाने नेहेमीच मनात फडफडत असतात. त्याविषयी अभिमान असतो, तशीच ओढही असते. पूर्व दिव्याचा वेध घेण्यात मन पुन्हा पुन्हा गुंतत असते. विवक्षित काळात ही जाणीव पुन्हा तीव्र होते. परिस्थितीतून कालसंगत अशा नवीन प्रेरणा मिळतात. नवीन पुढावा (लुस्ट) मिळतो आणि ऐतिहासिक स्वरूपाचे लेखन काळाच्या ओघात जोरकसपणे निर्माण होते. या अनावर प्रेरणांना तत्कालीन वाङ्मयीन जाणीवेचा आधार मिळतो. एक आकृतिवंध मिळतो आणि त्यातून ऐतिहासिक लेखन आकाराला येते.

मनातील ऐतिहासिक जाणिवांना मिळणारी प्रेरणा वर्तमानातील ताण-तणावांतून मिळते आणि कलावंतांची मन:प्रवृत्ती प्रस्फुरित होते. विशिष्ट देशकाल परिस्थितीच्या संदर्भात तिचे प्रयोजन आणि स्वरूप निश्चित होत असते. या प्रमाणेच तत्कालीन एकूणच मराठी साहित्यात समाजप्रबोधन, जनजागृती, राष्ट्रवादाची जाणीव निर्माण करणे इ. ज्या प्रेरणा होत्या, त्याच ऐतिहासिक कादंबरी लेखनामागे होत्या. हेतू सर्वांचे समानच होते. स्वाभिमान, स्वधर्माभिमान आणि स्वदेशाभिमान



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

याची जाणीव वाचकांच्या मनामध्ये निर्माण करणे, पारतंत्र्याविरुद्ध पेटून उठण्यासाठी स्वातंत्र्याची प्रेरणा देणे होय.

या प्रेरणांनी भारावलेल्या काळात नाथमाधव, साधुदास आणि वि. वा. हडप यांचे लेखन जन्माला आले आहे. ऐतिहासिक कादंबरीचे वाङ्मयीन रूप आणि कलात्मक अपेक्षा या विपयीच्या तात्विक चर्चेला बगल देऊन हडपांच्याकडे वळणे योग्य वाटते.

हडपांची ऐतिहासिक कादंबरी त्यांच्या सामाजिक कादंबरीच्या हातात हात घालूनच जन्माला आली आहे. हडपांचा काळ हा पुन्हा सामाजिक संक्रमणाचा काळ होता. टिळक युगाची अखेर होत होती. गांधीयुगाची सुरुवात झालेली होती. साम्यवाद, मार्क्सवाद या नवीन विचारप्रवाहांशी परिचय होत होता. गांधीजींचे विचार, तत्त्वज्ञान, राजकारण, समाजकारण, खादी निठा, ग्रामोद्धार, अस्पृश्योद्धार या विपयीच्या विचारांनी समाजामध्ये नवे मंथन आकाराला येत होते. या विचारांचा प्रभाव खूप खोलवर आणि दूरवर झालेला होता. स्वातंत्र्याची चळवळ नवा जोर घेत होती. इतिहासाविपयीचे नवे आकर्पण वाटत होते. गतकाळातील पराक्रमाची उजळणी करावीशी वाटत होती. या सर्वांचे परिणाम हडपांच्या मनावर झाले आहेत. त्यामुळे हडपांची निर्मितीप्रक्रिया एकाच वेळी दोन पातळ्यांवर कार्यरत झालेली दिसते.

समकालीन जीवन वास्तवाला सामाजिक कादंबरीच्या निमित्ताने हडप भिडताना दिसतात. त्याचवेळी ऐतिहासिक कादंबरीच्या रूपाने गतकाळाचा वेध घेताना दिसतात. 'सौंदर्याची बाग', 'वहकलेली तरुणी', 'वाकडे पाऊल', 'पारिजातकाची फुले' या सामाजिक कादंबऱ्यांची निर्मिती एकीकडे होत होती, तेव्हाच दुसरीकडे ऐतिहासिक कादंबरी निर्माण होत होती. एकाच वेळी दोन वेगवेगळ्या विपयांवर अनुभूती कार्यरत ठेवण्याचे कसब हडपांमध्ये काहीसे अपवादात्मक होते. हडपांचे ऐतिहासिक कादंबरी लेखन कादंबरीमाला स्वरूपाचे दिसते. शिवशाही, पेशवाई आणि आंग्लशाही इतिहासातील ही तीन पर्वे आहेत. नाथमाधवांनी शिवशाहीचा कादंबरीरूपाने परामर्श घेतला होता. हडपांनी 'कादंबरीमय पेशवाई' आणि 'कादंबरीमय आंग्लशाही' या पहिली २० आणि नंतरची ६ भागांची कादंबरीमाला त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाच्या दुसऱ्या टप्प्यावर लिहिल्या आहेत. १९१७ ते १९५० हा साधारण हडपांच्या लेखनाचा काळ आहे. १९५० नंतर १९५८-५९ च्या ग्रंथसूचीमध्ये हडपांच्या नावावर 'सूर्यास्त' (१९५६) व 'रामदास' (१९५८) अशा दोन कादंबऱ्या दिसतात. परंतु तेव्हा निर्मिती क्षीण झालेली दिसते. १९२० ते १९५० हा त्यांच्या निर्मितीचा खरा बहरीचा - फुलावरचा काळ होता आणि या काळात हडपांनी कादंबरीमालांचे लेखन वेगाने केलेले दिसते. निर्मितीचा वेग आणि सातत्य कायम ठेवण्यात हडपांना यश मिळाले होते.

हडपांनी कादंबरीरूपाने जो इतिहास विचारात घेतला, तो कोणता आहे, हे बघितले तर तो इतिहासकाळ संघर्षपूर्ण आहे.

मराठ्यांच्या इतिहासात राजकीय दृष्टीने अनेक चढउतार झाले. दीर्घकाळच्या यवनीसत्तेशी संघर्ष करीत शिवाजीराजांनी स्वराज्य निर्माण केले. परंतु त्यांच्या मृत्यूनंतर मराठीसत्ता अस्थिरतेत सापडली. औरंगजेबाच्या मृत्युनंतर शाहू महाराजांची सुटका झाली. परंतु ताराबाई विरूद्ध शाहू महाराज असा संघर्ष उभा राहिला. या संघर्पाच्या काळात बाळाजी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

विश्वनाथ यांचा उदय होताना दिसतो. पराक्रम, धैर्य, मुत्सद्दीपणा, धोरण आणि निष्ठा इ. गुणांच्या जोरावर बाळाजी विश्वनाथ यांनी सातारा येथे शाहू महाराजांना स्थैर्य आणि सत्ता मिळवण्यामध्ये मदत केली. शाहू महाराजांचा विश्वास संपादन केला. तेव्हा 'पेशवाई' ही संकल्पना निर्माण झाली. मराठी सत्ता पुन्हा आपल्या पायांवर खंबीरपणे उभी राहिली. मराठ्यांच्या इतिहासातील एक नवे पर्व सुरू झाले. बाळाजी विश्वनाथ ते पेशवाईचा अस्त हा काळ राजकारण, पराक्रम, लढाया, शह-प्रतिशह, वैमनस्य, गृहकलह, विभिन्न प्रकृतीची माणसे यांनी परिपूर्ण आहे. उष्ण जीवन संघर्षाने व्याप्त आहे. रोमहर्षक आहे, वेधक आहे. वर्तमानातील स्वातंत्र्यसंग्राम पेटलेला असताना हडप एकीकडे पेशवाईतील संघर्षमय काळाचा कादंबरीमाला रूपाने वेध घेण्याचा प्रयत्न करतात. त्यातून २० भागांची कादंबरीमाला त्यांनी लिहिली आहे.

'पेशवाईचे पुण्यवचन', 'पेशवाईची प्राणप्रतिष्ठा', 'पेशवाईचा ध्रुवतारा ढळला', 'पेशवाईचा पुनर्जन्म' अशी त्यांची नावे आहेत. बाळाजी विश्वनाथांचा काळ, ताराबाईंची सत्तालालसा, ताराबाई-शाहू महाराजांमधील वैर इत्यादी गोष्टी पुनर्वैभव, पुनर्जन्म,... यातून व्यक्त होतात. काही कादंबऱ्या बाजीरावाच्या पराक्रमी जीवनावर आधारित आहेत.

'पेशवाईचे मन्वंतर', 'पुनर्विकास', 'मध्यान्ह' इत्यादी सात कादंबऱ्या नानासाहेब पेशव्यांना समोर ठेवून लिहिल्या आहेत. माधवराव पेशवे यांच्या जीवनावर दोन कादंबऱ्या आहेत.

पेशवाईतील रोमहर्षक घटना, व्यक्तिमत्वे, नाट्यपूर्णता यांनी हडपांना सदर लेखनाला प्रेरणा दिलेली दिसते.

पेशवाईप्रमाणेच गांधीयुगाचा काळही हडपांना महत्त्वाचा वाटतो. हा काळ हडपांचा समकालीन काळ आहे. परंतु राजकारण, गांधीजींच्या विचारांचा समाजजीवनावरील प्रभाव या दृष्टीने हडपांना हा काळ ऐतिहासिक महत्त्व असणारा वाटतो. या दृष्टिकोनातून हडपांनी कादंबरीमय आंग्लशाहीचे लेखन केले आहे. दर तीन महिन्यांनी एक कादंबरी प्रसिद्ध होत होती. साधारण १९२० ते १९४८ गांधीजींच्या वधापर्यंत महत्त्वाच्या घटना समोर ठेवून - 'भारत माते ऊठ', 'भारतमाता वनवासी', 'भारतमाता की जय', 'भारतमातेचे दिव्य' अशा सहा कादंबऱ्या आहेत. Saga पद्धतीने सदर कादंबरीमाला लिहिण्याचा प्रयत्न हडपांनी प्रायोगिक भूमिकेतून केला आहे.

हडपांनी कादंबरीमालेचा आकृतिबंध का स्वीकारला असावा, याचा विचार केला पाहिजे.

पेशवाईचा विचार केला तर असे दिसते की हा काळ प्रदीर्घ आहे. व्यामिश्र आहे. एका कादंबरीमध्ये हा पट मांडता येणार नाही, याची हडपांना जाणीव होतीच. काळाचे टप्पे पाडून हडप स्वतःची सोयच बघत होते. इतिहासकथन आणि कादंबरीलेखन यामधील अंतर हडप जसे जाणून होते, तसेच ते स्वतःच्या मर्यादाही जाणून होते. महाकादंबरीचा घाट समोर ठेवून विविध पदरी कथानक विणत जाणे, मोठा पट उभा करणे आणि व्यापक भान त्यातून अंती देणे, ही गोष्ट अवघड आणि जिकिरीची आहे, हे हडपांनी जाणले होते. त्यामुळे मोठी बहुपेडी कादंबरी लिहिण्याचा प्रपंच हडप कुठेच मांडत नाहीत. काही घटना व काळाचा टप्पा स्वीकारून कादंबरी उभी करतात.

स्वतःची कलात्मक कुवत, कादंबरीचा प्रकृतीधर्म, Saga ची खंडात्मक असणारी रचनापद्धती यांचा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

साकल्याने विचार करूनच हडप कादंबरीमालेकडे अपरिहार्यपणे वळालेले दिसतात.

Saga चे खरे रूप त्यांना 'कादंबरीमय आंग्लशाही' मध्ये अपेक्षित आहे.

Saga चा अर्थ शब्दकोशामध्ये एका कुटुंबाविषयी, एका छोट्यासमाजाविषयी लिहिलेली कादंबरी - A Series of novel about a family असा दिला आहे.

एका घरातील तीन किंवा चार पिढ्या समोर ठेवून त्या माध्यमातून बदलते वातावरणाचे प्रश्न आणि समाजजीवन चित्रित करीत Saga ची रचना करता आली असती.

परंतु इथेही एक सलग विश्व उभे करावे लागले असते. खंडशः त्याचा विचार करणे, त्यामध्ये सूसुत्रता राखणे हडपांना अवघडच वाटले असावे. त्यामुळे प्रत्येक विभाग त्यांनी स्वतंत्रपणे उभा केला आहे. स्थळ, काळ, वातावरण, प्रश्न वेगवेगळा घेतला आहे. लघुकादंबरी वाटावी, इतकाच या कादंबऱ्यांचा आवाका आहे. सहा भागांमध्ये मिळून एक सम्यक् चित्र उभे राहणे आवश्यक होते. तसे चित्र समोर दिसत नाही. त्या काळातील प्रवृत्ती, विचारधारा, वैचारिक संघर्ष, स्वातंत्र्यप्राप्तीपाठी गांधीवादाची होणारी पिछेहाट, कम्युनिझमचा उदय हे सर्व समजते; परंतु त्या काळातील जीवनाचे भान येत नाही. समाजजीवनातील ताण कळत नाहीत. जनमानसातील गांधीजी विषयीचा आदर समजतो. लेखकाचे भारावून जाणेही समजते. परंतु महत्त्वाच्या कालखंडातील भारतीय समाजजीवनाचे संक्रमण उभे राहात नाही. कुठलीही व्यक्तिमने जिवंत होत नाहीत.

कादंबरीची रचना बघता हडपांवर हरिभाऊ आपटे यांच्या रचना पद्धतीचा प्रभाव दिसून येतो. प्रत्येक भागामध्ये दोन-तीन पदरी कथानक हडप विणतात. परंतु त्यांचा मेळ हडपांना घालता येत नाही. एखाद्या ठिकाणी ते गरजेपेक्षा जास्त गुंतून पडतात. त्यामुळे सर्व पदर संवादी स्वरूपात विणत नेणे, त्यातून घाटदार कथानक उभे राहणे, हे घडून येत नाही. वैचारिक चर्चा निबंधाचे रूप घेते. कोणतीही व्यक्ति कोणत्याही व्यक्तीशी राजकीय विषयांवर प्रदीर्घ चर्चा करीत राहते. शेवटच्या भागात नायिका तिच्या घरातील नोकर सोमनाथ बरोबर पत्री सरकार, सामान्यांवर होणारे अन्याय इ. राजकीय विषयांवर चर्चा करते. 'कादंबरीमय आंग्लशाही' तील हा शेवटचा भाग स्वातंत्र्यप्राप्तीचा काळ समोर ठेवून उभा केला आहे. स्वातंत्र्य मिळते. सत्तेसाठी अनेक व्यक्ती पुढे सरसावतात. सत्तेची हाव निर्माण होते. कम्युनिझम पुढे सरसावतो. एका संघर्षातून दुसऱ्या संघर्षाकडे वाटचाल सुरू होते. या काळाचे भान सदर कादंबरीतून येत नाही. नायिका आणि जयंत यांच्या व्यक्तिगत कहाणीतच कादंबरी घुटमळत राहते. फकिरा, वनमाळी, अहिल्या यांचे प्रकरणही प्रारंभी बराच वेळ घेते. मुख्य विषयाशी उपकथानकाचे धागे जुळून येत नाहीत. व्यक्तिगत कथानकातून प्रस्फुरित होणारा सामाजिक आशय व्यक्तीकडून समष्टीकडे नेत व्यापक सामाजिक भान देत असतो. हेच कलाकृतीचे कलात्मक यश असते. हे हडपांना साधत नाही.

एखादा विषय निवडला. काळाचा टप्पा निश्चित केला की विशिष्ट अवकाशाचा आशयप्रदेश निर्माण होतो. त्याचे आदिअंत ठरतात. केंद्र निर्माण होते. त्या दिशेने कथानकाची उभारणी होताना टोकदारपण प्राप्त होतो. विविध पदरांना घेत कलाकृतीतून येणारे भान व्यापक होत जाते. ही प्रक्रिया हडपांच्या कादंबरीमालेमध्ये घडून येत नाही. Saga ची रचना



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

करताना हडपांच्या मनामध्ये जे हेतू होते. ते पूर्ण होत नाहीत. तत्कालीन घटनांची फोडणी देऊन, गांधीवादाचा मसाला टाकून उभी केलेली ती सामाजिक कादंबरीच होते. 'पारिजातकाची फुले' या सामाजिक कादंबरीमध्ये हडपांनी स्पृश्य-अस्पृश्यतेचा प्रश्न घेतला आहे. एका घरातील दोन पिढ्यांमध्ये असणारा विचारांचा फरक, अस्पृश्य समाजाला येणारे नवे भान, त्यांचा विरोध, अस्पृश्यता न मानणारी नवी पिढी यांचे चित्रण हडप करतात. तशी रचना कादंबरीमालांमधील कादंबरीमध्ये आहे. हडपांच्या कोणत्याच कादंबरीत अनुभवविश्व आकाराला येत नाही. त्याचा पट उलगडत नाही. कादंबरी कथन होते. घडत नाही. मग ती कादंबरी सामाजिक असो की राजकीय, या निष्कर्षावर यावेच लागते.

'कादंबरीमय पेशवाई' मध्ये याहून काही वेगळे घडताना दिसत नाही. या कादंबरीमालेची विभागणी हडपांनी पेशवाईतील घटना आणि व्यक्ती यांना समोर ठेवून केली आहे. प्रत्येक विभागाला हडपांनी विवेचक प्रस्तावना लिहिली आहे.

ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून लेखकाजवळ काही विवक्षित जाणिवा असणे अतिशय आवश्यक असते. इतिहासकालीन जीवनसंघर्षाचे भान, व्यक्तिरेखांमधील परस्परसंबंध त्यातून आकाराला येणारे जीवन, याविषयी अतिशय सूक्ष्म जाण लेखकाला असेल तर ऐतिहासिक माहितीच्या आधारे कल्पिताची जोड देऊन एक अनुभवविश्व उभे करता येते. माहितीच्या पलीकडे जाऊन व्यक्तिमनाचे आकलन करून घेण्याची सूक्ष्मता लेखक जेवढी दाखवेल तेवढे कलाकृतीचे कलात्मक यश वाढत जाते. ऐतिहासिक कादंबरीच्या वाचनाने होणारा परिणाम, येणारे भान इतिहासाच्या जाणिवेचे नसून जीवनाच्या जाणिवेचे असले पाहिजे. त्यासाठी कल्पित आणि ऐतिहासिक सत्य परस्परांमध्ये दूध-साखरे प्रमाणे विरघळून गेले पाहिजे. कल्पितही संभवनीयतेच्या निकषांवर उभे राहिले पाहिजे. कल्पित आणि सत्य यांचे मिश्रण नको, संयुग हवे.

इतिहासाची माहिती गोळा करणे, त्या माहितीचे सूक्ष्म वाचन करून चौकट उभी करणे हे पहिले काम आहे. हा टप्पा पूर्ण केला की, कादंबरीकाराचे कलावंताचे काम सुरू होते. प्राप्त ज्ञानाचा कलात्मक उपयोग करून घेण्याचे सामर्थ्य ऐतिहासिक स्वरूपाचे लेखन करणाऱ्या कलावंताजवळ असणे आवश्यक असते. या दृष्टीने विचार करताना हडपांना कादंबरीमय 'पेशवाई' मध्ये कितपत यश मिळाले आहे, हे तपासले पाहिजे.

बाळाजी विश्वनाथ ते शेवटचा दुसरा बाजीराव या पेशवाईच्या कर्तृत्व काळामध्ये एका कुटुंबातील तीन ते चार पिढ्या गुंतल्या आहेत. यामध्ये कर्तृत्व आहे, बुद्धिमत्ता आहे, पराक्रम आहे, राजकारण आहे, यश आहे, विजय आहेत, पराभव आहे, प्रेम आहे, मत्सरही आहे. या सगळ्याचे भान ही कादंबरीमाला देते का ? वाचनाने वाचक प्रभावित होतो का ? भारावून जातो का ? तर याचे उत्तर नाही' असेच द्यावे लागते.

परिणामाची दाट साय मनावर धरणे, हे त्या कलाकृतीचे कलात्मक यश असते. हा अनुभव कोणत्याही कादंबरीच्या वाचनाने येत नाही. हे हडपांमधील कादंबरीचे अपयश आहे, असे म्हणावेसे वाटते.

ऐतिहासिक काळाचा, व्यक्तिमनाचा तसेच नातेसंबंधांचा वेध घेण्यात हडपांची संवेदनक्षमता कमी पडते. निर्मितीमधील सजगता कमी पडते.

ऐतिहासिक कादंबरीतील पहिला टप्पा म्हणजे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

इतिहासाची माहिती, संदर्भ गोळा करणे ही पूर्वतयारी हडपांची परिपूर्ण आहे. मराठ्यांचा इतिहास, रियासती यांचे त्यांनी सूक्ष्मवाचन केले आहे. कादंबरीमध्ये जागोजाग विविध संदर्भ दिले आहे. संशोधनपर लेखनात असतात, त्या प्रकारच्या विस्तृत तळटीपा हडपांनी दिल्या आहेत. सरदेसाईंच्या रियासती, राजवाडेकृत इतिहास यामधील हे संदर्भ आहेत.

नमुन्यादाखल एक संदर्भ बघता येईल. कोल्हापूरच्या राजवंशामध्ये वारसावरून जे राजकारण चालू होते, त्याविषयी हडप सविस्तर संदर्भ देताना लिहितात, 'कोल्हापूर छत्रपतींच्या राजवंशात अशा भानगडी प्रथमपासून फार ! जणू वंशाला तसा परमेश्वरी शापच होता ! ताराबाईंचा मुलगा शिवाजी हा कैदेत असतानाच देवी येऊन मरण पावला. त्यानंतरची ही घालमेल आहे. काही इतिहासकारांच्या मते राजाराम हा भवानीबाईंचा पुत्र. परंतु ताराबाईंनी दिलेली हकिगत पुढीलप्रमाणे आहे - 'शिवाजीराजे यांसी संतान, पार्वतीबाई यांस दोन पुत्र जाहले. पैकी पहिला क्रमला, दुसरा पुत्र त्यास देवी सगर्भ होती. त्यानंतर चिरंजीवास देवी येऊन कालवशे समाप्त झाले. समागमे पार्वतीबाईंनी सहगमन केले. पुत्र देवीच्या स्वाधीन केला. तो अद्याप तिच्यापाशी सुखरूप आहे. भवानीबाई पोटसी होती. ती प्रसुत झाली. पुत्र झाला. तो संभाजीराजे व राजसबाईंनी कपटाने मारला. कपटी उभयता चिरंजीवांचा वित्तेक होऊन शाहूपाशी रहावे लागले. देवी व मूल समावेत होती. (राजवाडे खंड ८ वा, लेखांक १६९). पेशवाईचा दसरा पृ. १२९.

कादंबरी वाचनाच्या ओघात कांटा टोचल्याप्रमाणे हे संदर्भ टोचतात. हडपांचे वाचन त्यातून समजते. परंतु या माहितीचा कलात्मक उपयोग करून घेता आलेला नाही.

उपकथानकाचे धागे, कल्पिताचा सहभाग त्यांना मध्यवर्ती विषयामध्ये एकरूप करून घेता आला नाही. उदा. 'पेशवाईचा दरारा' या कादंबरीचा विचार करता येईल. बाळाजी विश्वनाथानंतर बाजीरावांनी जबाबदारी कशी पेलली, आपल्या कर्तृत्वाने दरारा कसा निर्माण केला, हा मध्यवर्ती विषय आहे. या दिशेने कादंबरी झेपावली पाहिजे. तसे होत नाही. 'चतुरा' ही काल्पनिक दासी, तिचे जीवन, तिचे कौशल्य हडपांनी उपकथानकाप्रमाणे घेतले आहे. कादंबरीतील अर्धा भाग ही 'चतुराच' व्यापून टाकते. उपकथानकाच्या रुळावरून गाडी एकदा धावायला लागली की मुख्य कथानक मागेच पडते. कथानकामध्ये ओघ निर्माण होत नाही. चतुरा प्रकरण बांडगुळाप्रमाणेच वाढताना दिसते. प्रत्येक कादंबरीच्या शेवटी हडप परिस्थिती निबंधलेखनाप्रमाणे लिहून समारोप करतात. कोणतीही घटना, प्रसंग यापाशी कथानक पोचलेले दिसत नाही. ऐतिहासिक घटनांचा प्रसंग निर्मितीसाठी उपयोग करून घेऊन परिणामकारक प्रसंग निर्माण करण्यात हडपांची कल्पनाशक्ती आणि अंत:शक्ती नेहेमीच कामी पडते.

'पेशवाईचा ध्रुवतारा ढळला' या कादंबरी मध्ये एक महत्त्वाचा प्रसंग आहे. यवनांच्या कैदीतील शाहुमहाराजांच्या काही स्त्रियांची सुटका करायची असते. बाळाजी विश्वनाथ या मोहिमेवर जातात. त्यांच्या मृत्यूची अफवा पसरते. प्रत्यक्षात बाळाजीपंत गानू यांनी बाळाजी विश्वनाथांना वाचवलेले असते. बाळाजी विश्वनाथांचा वेष करून गानूच पालखीतून जातात. लढाईत मारले जातात. ही ऐतिहासिक महत्त्वाची घटना नाट्यपूर्ण, संघर्षपूर्ण आहे. उत्तम प्रसंग यातून निर्माण करता



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आला असता. परंतु हडप एखादा उत्कर्षाचा प्रसंग निर्माण करीत नाहीत. ही घटना निवेदनातून सांगतात. 'वज्राघात' कादंबरीमध्ये तालिकोटच्या लढाईचा हरिभाऊंनी जसा कलात्मक उपयोग करून घेतला आहे. तसा सदर घटनेचा उपयोग हडपांनी केला नाही. त्यांच्यातील निवेदनच अधिक प्रभावी होते. त्यामुळे ऐतिहासिक घटना, प्रसंग यांचे दृश्यात्मक भान वाचकांना येत नाही.

सातारा, कोल्हापूर येथील राजकारण, स्त्रियांमधील तिरकस नाती, वारसाच्या संदर्भातील राजकारण, शाहू व ताराबाई यांच्यातील संघर्ष, कट-प्रतिशह, बाळाजी विश्वनाथ आणि श्रीपतीराव यांच्यातील वैमनस्य यांचे चित्र हडप उत्तम उभे करतात. सातारा, कोल्हापूरमधील राजकीय पट, त्यांनी उत्तम उभा केला आहे. त्यातून इतिहासकालीन परिस्थिती समजते. जीवन समजत नाही. पेशवाईचा उदय, विकास, प्रभाव आणि शेवटची उतरती कळा या प्रवासाची जाणीव मनात आकाराला येत नाही.

मराठ्यांच्या इतिहासातील एक महत्त्वाचा काळ कादंबरीरूपाने उभा करणे, हे काम सोपे व साधे नव्हे. हडप ते आव्हान स्वीकारतात. यथाशक्ती प्रयत्न करतात. ऐतिहासिक कादंबरीच्या दृष्टीने प्रतिकूल असणाऱ्या परिस्थितीमध्ये हडपांनी जे श्रम घेऊन लेखन केले आहे, त्याचे श्रेय त्यांना दिलेच पाहिजे. दर तीन महिन्यांनी एक कादंबरी पूर्ण करणे, यामध्ये सातत्य त्यांनी राखले होते. इतिहासाचा त्यांच्यावर जो प्रभाव होता, त्याचे हे उदाहरण आहे.

या विवेचनातून हडपांच्या ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून असणाऱ्या मर्यादा मी ज्या मांडल्या त्या नव्याने मांडल्या आहेत, असे नाही. अनेक समीक्षकांनी वेळोवेळी त्या मांडल्या आहेत. मला या मर्यादा ज्याप्रमाणे जाणवल्या त्याप्रमाणे मी स्पष्ट केल्या आहेत.

हडपांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने त्यांच्या कर्तृत्वाचा विचार करताना हडपांच्या मर्यादा मान्य करूनही त्यांच्या कार्याचे मोल जे आहे, त्यासंबंधीही विचार केलाच पाहिजे. नाहीतर हडपांवर अन्याय केल्यासारखे होईल.

कादंबरीची रचना, मांडणी, भाषा या बाबतीत हडप नवीन काही देत नाहीत. प्रकरणशः कथानकाची मांडणी, प्रत्येक प्रकरणाला स्वतंत्र शीर्षक ही पद्धतच त्यांनी स्वीकारली आहे. भाषा ओघवती आहे. तरी काही वेळा कृत्रिम अलंकारिकतेच्या आहारी जाते. रुपकात्मक भाषेचे फुलोरे दिसतात. कादंबरीचा जो घाट हडपांपर्यंत चालत आला होता, तो जशाच्या तसा त्यांनी स्वीकारला आणि वापरला. कोणतेही बदल हडपांनी केले नाहीत. ते बदल तसे होणारही नव्हते. याचे कारण हडप हे लोकप्रिय स्तरावरचे लेखक आहेत.

कोणतीही कलात्मक निर्मिती ही तीन स्तरावर होत असते. प्रायोगिक, जाणीवपूर्वक आणि लोकप्रिय. हे तीन स्तर आहेत. प्रायोगिक स्तर हा नेहमी नवी वळणे, नव्या वाटा शोधीत असतो. रचनेचे प्रयोग करीत असतो. या प्रयोगांतून सिद्ध होणारे घाट जाणीवपूर्वक स्तर स्वीकारतो. घोटवून अधिक ठळक करतो. परिचित करतो. लोकप्रिय स्तर हा नवा घाट स्वीकारतो आणि त्याचा विस्तार करतो. सर्व सामान्यांपर्यंत सदर आकृतिबंध नेऊन पोचवीत असतो. लोकप्रियनिर्मितीचा हा स्तर सातत्य आणि विस्तार या दृष्टीने महत्त्वाचा असतो. नेमके याच स्तरावर हडपांनी काम केले आहे.

'मोचनगड' आदी कादंबऱ्यांनी ऐतिहासिक कादंबरीचा घाट घडवला होता. हरिभाऊ आपटे यांनी हा घाट परिश्रमपूर्वक ठाकठीक करून दिला



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

होता. कादंबरीला स्थैर्य मिळवून दिले होते. यापुढे विस्ताराचा जो कालखंड होता, त्या काळात नाथमाधव, साधुदास आणि वि. वा. हडप पुढे येताना दिसतात. या विस्ताराच्या काळातील वाङ्मयीन निर्मिती विपुल असते. परंतु उच्च अभिरूचीची जोपासना होत नाही. वाचकप्रियता निर्माण होते. वाहतेपण, सातत्य टिकून राहते. हे कार्य या फळीवर होते. नाथमाधव, हडप, साधुदास यांनी ऐतिहासिक कादंबरीचा प्रवाह सातत्याने पुढे नेण्याचे वाङ्मयीन कार्य केले आहे.

१९६० नंतर मराठी कादंबरीच्या क्षेत्रात ऐतिहासिक कादंबरीला नवीन लुस्ट, पुढावा पुन्हा मिळतो. 'स्वामी' या रणजित देसाई यांच्या कादंबरीने ऐतिहासिक कादंबरी जोरकसपणे पुढे येते. रणजित देसाई, ना. सं. इनामदार, कॅप्टन वेल्वलकर आदी लेखकांची नवी पिढी पुढे येताना दिसते. परंतु या ठिकाणी ऐतिहासिक कादंबरी जुनी कात टाकून नवे रूप धारण करताना दिसते.

स्वातंत्र्यप्राप्ती झालेली असल्याने ऐतिहासिक लेखनामागील प्रेरणा बदलून गेल्या होत्या. राष्ट्रवादी जाणीव, स्वातंत्र्याचा उद्‌घोष पूर्वी असल्याने कादंबरीतून इतिहास कथन होत असे. त्या ऐवजी इतिहासाचा, ऐतिहासिक घटनांचा अन्वयार्थ लावण्याची प्रेरणा मिळाली. महत्त्वाच्या ऐतिहासिक व्यक्तिरेखा, त्यांची मानसिक घडण, व्यक्तिव्यक्तीतील नातेसंबंधांची उकल यांना प्राधान्य मिळू लागले. वाचकांनाही कादंबरीरूपी इतिहास नको होता. इतिहासाच्या पानांमध्ये जन्माला आलेले जीवन हवे होते. म्हणूनच 'स्वामी' मध्ये रमा-माधवाच्या भावपूर्ण प्रेम जीवनाला महत्त्व मिळते. राऊंच्या मनाचा शोध घेतला जातो. त्रिंबकजी डेंगळे हा कादंबरीचा नायक होता. हिंदू तेवढे चांगले, सर्व मुसलमान वाईट अशी काळी-पांढरी व्यक्तिचित्रणे होत नाहीत. ना. सं. इनामदार औरंगजेबाच्या जीवनावर 'शहेनशहा' कादंबरी लिहितात. इतिहासाच्या दृष्टीने खलनायक असणाऱ्या बादशहाला नायक बनवतात. घटनांच्या मदतीने औरंगजेबाच्या व्यक्तिमत्त्वावर नवीन प्रकाश टाकतात. ऐतिहासिक कादंबरी संबंधी जुने संकेत बदलून नवी मूल्ये, नवे दृष्टिकोन निर्माण झाल्याचे 'शहेनशहा' हे उत्तम उदाहरण आहे.

या १९६० नंतरच्या कालखंडापर्यंत मराठी ऐतिहासिक कादंबरीचा धागा पोचवण्याचे कार्य हडपांनी केले आहे. ती जबाबदारी हडपांनी चोख बजावली, याचे श्रेय त्यांना मोकळेपणे दिले पाहिजे.

कोणत्याही लेखनप्रकाराचे अस्तित्त्व टिकून राहण्यासाठी प्रायोगिक स्तराइतकेच महत्त्व लोकप्रिय स्तराला आहे. प्रायोगिकतेकडूनअनेक नव्या कल्पना झिरपत लोकप्रियतेपर्यंत पोचतात. त्यांचा प्रसार होतो. त्यातूनच एकूण अभिरूची प्रगल्भतेकडे झेपावत जाते. परंतु या प्रक्रियेत काही दरम्यानचा काळ जातो. तो अपरिहार्यपणे स्वीकारावा लागतो. तसेच या काळातील कलावंत आणि त्यांनी केलेली निर्मितीही स्वीकारावी लागते. त्यांच्या निर्मितीमधील वैगुण्य मान्य करूनही स्वीकारावी लागते.

'मराठी कादंबरीचा इतिहास' या ग्रंथात डॉ.चंद्रकांत बांदिवडेकर यांनी हडपांच्या वाङ्मयीन कर्तृत्वावर निष्कर्षवजा भाष्य करताना म्हटले आहे, 'पण नाथमाधव काय किंवा हडप काय, दोघांनी हरिभाऊंप्रमाणे विपुल जिवंत पात्रांची सृष्टी तर राहोच, पण एखादे कायमचे स्मरणात कोरले जाईल, असे पात्र निर्माण केले काय, किंवा हृदयाला भिडतील, पुन्हा पुन्हा वाचावेसे वाटतील, असे काही



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मर्मस्पर्शी प्रसंग तरी चित्रित केले काय, याचे उत्तर समाधानकारक होकारार्थी देता येत नाही आणि म्हणूनच त्यांनी केलेल्या ऐतिहासिक अनुवोधावद्दल कृतज्ञता व्यक्त करूनही त्यांच्या कादंवऱ्या काळाच्या ओघात टिकून रहाव्यात व आज वाचाव्याशा वाटाव्यात, असे काहीच त्यांनी निर्माण केले नाही. असा द:खद निष्कर्ष काढणे भाग आहे.' (मराठी कादंवरीचा इतिहास : डॉ.चंद्रकांत वांदिवडेकर - पृ.१०५)

डॉ.वांदिवडेकरांनी जो निष्कर्ष काढला आहे, तो मान्य करूनही असे म्हणावेसे वाटते, की काळाच्या ओघात 'ऐतिहासिक कादंवरी' हा कादंवरी लेखनाचा प्रकार वि. वा. हडप यांनी टिकवून धरला. या कादंवरीचा वाचकवर्ग निर्माण केला. ऐतिहासिक कादंवरी वाचनाची आवड त्यांनी कायम टेवली. ऐतिहासिक कादंवरीचा हाच वाचकवर्ग वाढलेल्या संख्यात्मक प्रमाणात १९६० नंतर मराठी ऐतिहासिक कादंवरीला मिळाला आणि १९६० नंतर मराठी ऐतिहासिक कादंवरीचे नवे पीक फोफावले. हे ऐतिहासिक सत्य वि. वा. हडप यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वातून घडून आले आहे, हेच हडपांचे मोटेपण आहे.

◇ ◇

डॉ. स्वाती कर्वे
१४१४, कसवा पेठ, शनिवार वाड्यासमोर,
पुणे ४११ ०११. फोन : ४४४५६९५.

## श्रद्धांजली

१ एप्रिल, २००० ते ३० जून, २००० या कालावधीत
खालील मान्यवर व्यक्तींचे दु:खद निधन झाले.

सुप्रसिद्ध कवयित्री संजीवनी मराठे (१ एप्रिल २०००)
भाषाशास्त्रज्ञ आणि कथालेखक नरेश कवडी (६ एप्रिल २०००)
स. प. महाविद्यालयाचे प्राचार्य ह. श्री. साने (९ एप्रिल २०००)
ज्येष्ठ संस्कृत पंडित श्री. भा. वर्णेकर (१० एप्रिल २०००)
कविवर्य ना. घ. देशपांडे (१० मे २०००)
सुप्रसिद्ध एकपात्री विनोदी कलाकार मधुकर टिल्लू (१ जून २०००)
विडंबन काव्य व चारोळीकार पंडित सप्रे (३ जून २०००)
मुलांचे 'नाना' सुप्रसिद्ध वालसाहित्यकार गोपीनाथ तळवलकर (७ जून २०००)
महाराष्ट्राचे लाडके व्यक्तिमत्त्व पु. ल. देशपांडें (१२ जून २०००)
सुरस प्रकाशन, पंढरपूर चे श्री. नवजीवनभाई व्होरा (१५जून २०००)
नाटककार श्यामकांत गोखले (२४ जून २०००)
चरित्रलेखनाची विशिष्ट लय साधलेले डॉ. द. न. गोखले (२७ जून २०००)
ऐतिहासिक कादंवरीकार कॅप्टन वासुदेव बेलवलकर (२९ जून २०००).







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# साहित्यिक श्री.ज.जोशी

◇

डॉ.स्नेहसुधा कुलकर्णी

साहित्यिक श्री. ज. जोशी हा विषय पीएच.डी. पदवीच्या अभ्यासासाठी निवडण्यामागे माझी विशिष्ट भूमिका होती. आपल्या आवडत्या विषयात संशोधन करावे असे प्रत्येक अभ्यासकाला वाटते. त्या दृष्टीने विचार करता श्री. ज. जोशी हे साहित्यिक म्हणून मला प्रिय आहेतच, पण त्यांचे साहित्य हाच विषय करण्यामागे आणखीही अनेक कारणे होती. श्री. ज. हे स्वातंत्र्योत्तर काळातील मराठीतील एक प्रमुख लोकप्रिय लेखक होते. १९३८ ते १९८८ अशी पन्नास वर्षे त्यांनी मराठीत वाङ्मय लेखन केले. त्यांच्या लेखनात विविधताही भरपूर आहे. लघुकथा, कादंबरी, ललितलेख या तीनही गद्य वाङ्मय प्रकारात त्यांनी विपुल लेखन केले. याखेरीज काही परकीय गाजलेल्या कादंबऱ्यांचे अनुवादही त्यांनी मराठीत केले. समीक्षकांनी त्यांना प्रथम दर्जाचे लेखक म्हणून मान्यता दिली नाही; तरीही 'श्रीजं' नी जे जे लिहिले ते ते वाचकांना आवडले मग ती कादंबरी असो, कथा असो वा ललितगद्य असो. अगदी मृत्यूपर्यंत म्हणजे १३ जानेवारी १९८९ पर्यंत दैनिक 'सकाळ' सारख्या पुण्यातील दर्जेदार वृत्तपत्रात त्यांचे 'भरती-ओहोटी' हे सदर दर गुरुवारी प्रकाशित होत होते. म्हणूनच 'श्रीजं' च्या समग्र वाङ्मयाचा अभ्यास करून त्यांनी मराठी वाङ्मयास केलेले योगदान तपासून पाहावे अशी इच्छा होती. 'एका लेखकाचा अभ्यास' या प्रवर्गाखाली संशोधन करून आणि एकाच वेळी सोयीनुसार विविध संशोधन पद्धतीचा अवलंब करून मी हा प्रबंध सिद्ध केला. यासाठी मार्गदर्शक - डॉ. दत्तात्रय दि. पुंडे हे होते.

या प्रबंधाची मांडणी मी तीन विभागात केली आहे.

१) श्री. ज. जोशी यांचे चरित्र आणि व्यक्तिमत्त्व.

२) 'श्री.जं' चे साहित्य - यामध्ये त्यांचे कथा, कादंबरी व ललितलेख वाङ्मय तसेच अनुवादित साहित्याचा सविस्तर विचार केला आहे.

३) समारोप, निरीक्षणे व निष्कर्ष तसेच सूची विभाग.

प्रबंधाची एकूण सात प्रकरणे असून संक्षेपाने त्याचे स्वरूप असे :

**प्रकरण १ ले : प्रास्ताविक : शोध निबंधाचे प्रयोजन**

भारतास स्वातंत्र्य मिळाले त्यापूर्वीचा काही काळ म्हणजे १९२६ ते १९४० हा काळ लघुकथेच्या विकासाचा एक महत्त्वपूर्ण टप्पा मानला जातो. या काळात प्रा. ना. सी. फडके यांचा रंजक सौंदर्यवाद आणि वि. स. खांडेकर यांचा स्वप्नाळू ध्येयवाद यामुळे मराठी कथाप्रांतात मोठीच चलविचल माजली होती. हरिभाऊ आपटे यांचा



**जन्म : १ ऑगस्ट, १९१५.**
**निधन : १३ जानेवारी, १९८९.**



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# परिचय

**डॉ.सौ. स्नेहसुधा अरुण कुलकर्णी** (एम.ए.पीएच.डी.)

**व्यवसाय -** प्रकाशन (नीहारा प्रकाशन, पुणे)

**वास्तव्य -** सुपार्श्वनाथ हौ.सोसायटी, पाल्वी, मार्केट यार्ड, पुणे ४११ ०३७.

मराठी हा स्पेशल विपय घेऊन वी.ए.(१९६८), एम.ए. (१९७९), इंग्रजी हा स्पेशल विपय घेऊन वी.ए. (१९७३), एम.ए. (१९७६), प्री.पीएच.डी. कोर्स (१९८८), वी.एड. (१९७२), हिंदी राष्ट्रभापा प्रवीण.

**प्रकाशित पुस्तके -**

**कादंबऱ्या :** १) हेराम हेकृष्ण २) उद्ध्वस्त ३) क्षण मोहाचा ४) सखे गवसली प्रीत ५) जिंकूनी अजिंक्य मी ६) पतिव्रता ७) दास वासनेचा ८) अधांतरी ९) प्रवास १०) उजेडाची ओढ. 'उजेडाची ओढ' या कादंवरीवर डॉ.सदा कराडे यांनी इंडियन लिटरेचर १९८८ मध्ये 'वेगळ्या वळणाची उल्लेखनीव कादंवरी' असा अभिप्राय देऊन १९८८ मधील लेखिकांच्या तीन कादंवऱ्यांमध्ये तिचा समावेश केला आहे.

**कथासंग्रह :** १) दुःखाची जात २) हे असेच व्हायचे होते ३) अनुत्तरित ४) आकांक्षा.

**काव्यसंग्रह :** १) स्नेहमयी २) आत्मभान.

**कुमार वाङ्मय :** १) निवडक पंचतंत्र २) डॉ.वावासाहेव आंवेडकर ३) लांव केसांची राजकन्या ४) विचित्र वरदान ५) एक होता राजा ६) क्रांतिवीर वा. व. फडके.

**संपादन -** १) क्रां.वासुदेव वळवंत स्मारक समिती शताब्दी स्मरणिका (१९८४)

२) डॉ. रा. शं. वाळिंवे अमृत महोत्सव गौरव ग्रंथ - सहभागी संपादक.

३) प्रा. म. ना. अदवंत गौरविका 'मनाली' - सहसंपादक.

४) सन्मार्गमित्र दिवाळी अंक १९९४ - सहभागी संपादक.

५) 'नीहार' दिवाळी वार्पिकाचे गेली २४ वर्पे सातत्याने संपादन.

६) 'काव्यशिल्प' रौप्यमहोत्सवी काव्यसंग्रहाचे सहसंपादन (१९९७).

७) 'महाराष्ट्र' या पां. र. अंविके यांच्या १९६८ च्या दिवाळी अंकाचे विद्यार्थी दशेत असताना संपादन.

**पुरस्कार -** १) १९७५ मध्ये जागतिक महिला वर्पानिमित्त ज्योत्स्ना देवधर यांच्या अध्यक्षतेखाली कऱ्हाड येथे झालेल्या साहित्य संमेलनात आयत्या वेळच्या कथापूर्ती स्पर्धेत कथेस द्वितीय पारितोपिक मिळाले.

२) त्याच वर्पी नाशिक येथे मालतीवाई वेडेकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कवयित्री संमेलनात कवितेस प्रथम पारितोपिक मिळाले.

३) १९८५ मध्ये देशस्थ ऋग्वेदी व्राह्मण संस्थेतर्फे 'कादंवरीकार' म्हणून मानपत्र देण्यात आले.

४) १९९२ मध्ये 'कै.मनीपा पिंगळे' हिच्या स्मरणार्थ देशस्थ ऋग्वेदी व्राह्मण सभेतर्फे कथालेखिका म्हणून पुरस्कार (रु.५००/- व मानपत्र).

५) १९९६ मध्ये पुण्याच्या 'कल्पना वुक डिलर्स' या प्रकाशनातर्फे 'हे असेच व्हायचे होते' हा कथासंग्रह प्रकाशित झाला. त्यास दि. १३ जानेवारी १९७७ रोजी पुणे नगरवाचन मंदिरातर्फे साहित्यिक 'श्री.ज.जोशी' पुरस्कार मिळाला.

६) दि. १५ ऑगस्ट ९९ रोजी तळेगाव दाभाडे (पुणे) येथील श्रावणधारा खुल्या कविता लेखन स्पर्धेत 'पाऊस' या कवितेस द्वितीय क्रमांकाचे पारितोपिक प्राप्त.







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



बोधवाद वा सुधारणावाद मागे पडला होता. मात्र लघुकथेच्या तंत्रमंत्राची आणि तिच्या संस्कार परिणामांची चर्चा सतत होत होती. एकूणच हे लघुकथेचे 'चांगले दिवस' होते. फडके - खांडेकर, वामनराव चोरघडे, कुसुमावती देशपांडे इत्यादींच्या कथा वाचून त्यापासून प्रेरणा घेऊन लेखन करणारे अनेक लेखक वाकाळात उदयास आले. 'श्री.ज.' हे त्यापैकीच एक होत.

'श्री.जं.' च्या नावावर सव्वीस कथासंग्रह, अकरा कादंबऱ्या, आठ कादंबऱ्यांचे मराठी अनुवाद, पाच ललितलेख संग्रह एवढी विपुल साहित्यसंपदा असून 'ऐलमा-पैलमा' या कादंबरीच्या तीन खंडाचे सहलेखन, साजणी' या ना. ह. आपटे यांच्या कादंबरीचे संक्षिप्तीकरणही त्यांनी केले आहे. 'पांढरपेशा मध्यमवर्गाचे प्रतिनिधी' अशी 'श्री.जं.' ची एक लख्ख प्रतिमा मराठी वाचकांसमोर होती. आपल्या कथा व लेख यामधून त्यांनी पांढरपेशा मध्यमवर्गाच्या समस्या प्रामुख्याने हाताळल्या आहेत.

श्री.जं. च्या 'आनंदी गोपाळ' व 'रघुनाथाची बखर' या दोन्ही चरित्रात्मक कादंबऱ्यांवर उलट सुलट चर्चा होतानाच या कादंबऱ्यांनी मराठीत आधुनिक चरित्रात्मक कादंबरी आकारास आली, तिचे निकष प्रस्थापित झाले असे मानण्यात येते. 'चरित्रात्मक कादंबरी' या वाङ्मय प्रकारालाच त्यांनी नवे परिमाण मिळवून दिले आहे.

**प्रकरण २ रे :**

१) लेखकाचे चरित्र आणि त्याचे लेखन याविषयीचा विचार करण्यासंबंधी समीक्षकांचे दोन वर्ग आहेत. लेखकाच्या व्यक्तिमत्वाचे प्रतिबिंब त्याच्या लेखनात अपरिहार्यपणे उमटलेले असते म्हणून लेखकाच्या लेखनकृतीचा अभ्यास करताना त्याच्या चरित्राचा अभ्यास करून त्याच्या लेखनाविषयी निष्कर्ष काढावा असे काही समीक्षक मानतात तर लेखकाचे चरित्र व त्याचे लेखन यांचा काही संबंध नसतो त्यामुळे असा संबंध न तपासता त्याच्या लेखनाचा आस्वाद घ्यावा; समीक्षा करावी असे मानणारा समीक्षकांचा दुसरा पक्ष आहे. या दोन्ही मतांचा चिकित्सक परामर्श घेऊन श्री.जं. चे लौकिक व्यक्तिमत्त्व त्यांच्या लेखनास कितपत पूरक ठरले, याचा शोध घेतला आहे.

२) चरित्रात्मक समीक्षा पद्धती म्हणजे काय ?

३) श्री.जं. चे स्वभाव विशेष, कौटुंबिक पार्श्वभूमी व आयुष्यातील ठळक घटना.

४) श्री.जं.च्या आयुष्यात आलेल्या व त्यांच्या व्यक्तिमत्वावर आणि पर्यायाने त्यांच्या लेखनावर प्रभाव टाकणाऱ्या व्यक्ती.

५) लेखनामागील प्रेरणा.

६) वैचारिक दृष्टिकोन.


**स्नेहवर्धनची जुलै-ऑगस्ट मधील नवीन प्रकाशने**

**मराठी शुद्धलेखन नियमावली** - डॉ.स्नेहल तावरे
**शुद्ध शब्दकोश (आवृत्ती तिसरी)** - डॉ.स्नेहल तावरे
**आदित्याची झाडे** - डॉ. प्र. न. जोशी
**आनंदाची अक्षरे** - डॉ.विजया संगवई
**काव्यदीपिका** - डॉ.अण्णासाहेब अडसोड
**स्त्रीचा आत्मशोध** - (सं.)डॉ.मृणालिनी शहा
**युवतींसाठी करिअर मार्गदर्शन** - डॉ.सुषमा केसकर
**युवराज** - प्रिया पै
**वळण** - श्री.बजरंग शेलार
**खजिना बालगीतांचा** - सौ.मीना वैद्य
**बालकवींच्या बालकथा** - बालकवी

संपूर्ण सूची मागवा

स्नेहवर्धन प्रकाशन

८६३, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०. दूरभाष : ४४७२५४९.




अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

**प्रकरण ३ रे : कथाकार श्री. ज. जोशी**

या प्रकरणातील प्रमुख मुद्दे असे :

१) 'श्री.जं.' च्या लेखनाचा प्रारंभ कथालेखनाने झाला. कौटुंबिक कथालेखक म्हणून ते वाचकप्रिय ठरले. 'कथाकार श्री.ज.' हीच त्यांची प्रतिमा जनमानसात होती. या पार्श्वभूमीवर त्यांच्या कथालेखनाची वैशिष्ट्ये तपासून पहाणे.

२) १९२६ ते १९४५ हा कालखंड मराठी वाङ्मयात 'लघुकथा कालखंड' म्हणून ओळखला जातो. लघुकथेच्या आत्यंतिक उत्कर्षाचा असा हा काळ होता. याच काळात 'श्री.जं.' नी कथा लेखनास प्रारंभ केला. त्यानंतर नवकथेच्या वहराच्या काळात म्हणजे १९४५ ते १९६० या कालखंडातच 'श्री.जं.' ची कथाही वहरास आली. 'सुलभा' हा त्यांचा कथासंग्रह १९५९ मध्ये प्रकाशित झाला. या संग्रहामुळे श्री.जं. चे स्थान मराठी वाङ्मयात कथालेखक म्हणून निश्चित झाले.

३) कोणत्याही लेखकाचे साहित्य हे तो ज्या काळात लिहितो त्या काळाचे अपत्य असते. समाजाच्या तत्कालीन स्थितीगतीचे चित्रण त्या साहित्यात अटळपणे आलेले असते. म्हणून 'श्री.जं.' नी आपल्या कथांमध्ये ज्या सामाजिक समस्या हाताळल्या आहेत - उदा.: प्रौढ कुमारिकांच्या विवाहाचा प्रश्न, निम्नमध्यमवर्गीय कुटुंबांना भेडसावणारा राहत्या जागेचा प्रश्न, निष्क्रीय पतीमुळे होणारी स्त्रीची कुचंवणा, प्रौढ व कुरुप कुमारिकांच्या विवाहाचा प्रश्न, वेकारी, वृद्धापकाळातील एकटेपण इत्यादींचा अभ्यासपूर्ण मागोवा घेऊन स्वातंत्र्योत्तर काळातील मध्यमवर्गीय समाजाचे श्री.जं. च्या कथांमध्ये आलेले चित्रण हे किती वस्तुनिठपणे झाले आहे याचा त्यांच्या कथांमधील अनुभवविश्वाच्या अनुरोधाने चिकित्सक परामर्श घेतला आहे.

४) कथालेखक म्हणून श्री.जं. चे यश आणि अपयश यांचा निश्चित आलेख काढण्याचा प्रयत्न केला आहे.

**प्रकरण ४ थे : कादंवरीकार श्री. ज. जोशी**

अभ्यासाच्या सोयीसाठी श्री.जं. च्या कादंवऱ्यांची वेगवेगळ्या पोटविभागात विभागणी केली आहे.

१) चरित्रात्मक कादंवरी : अ) आनंदी गोपाळ व) रघुनाथाची वखर.

२) सामाजिक कादंवरी : एकूण संख्या १२ (यात्रा, धुमकेतू, काचपात्र, समिधा इत्यादी)

३) अनुवादित कादंवऱ्या : इंग्रजी व हिंदी कादंवऱ्यांचे मराठी अनुवाद - एकूण आठ.

४) सहलेखन : 'ऐलमा-पैलमा' खंड १, २, ३ यांचे डॉ.म. वि. गोखले यांचेसह केलेले लेखन.

५) संक्षितीकरण : 'साजणी' या ना. ह. आपटे यांच्या शाहिरी जीवनावरील कादंवरीचे संक्षितीकरण.

**प्रकरण ५ वे : श्री. जं. चे ललितलेखन**

१) श्री. जं. चे पाच ललितलेखसंग्रह व फुटकळ लेख - पुणेरी, जोशीपुराण, सुचलं लिहिलं, भरती ओहोटी आणि माझ्या साहित्याचा वॅलन्सशीट. या पाच लेखसंग्रहात श्री.जं. चे १४० लेख समाविष्ट आहेत. या लेखांचे विपयानुसार वर्गीकरण केले आहे.

'श्री.जं.' च्या ललितलेखांमध्ये केवळ पुणे शहरातील स्थित्यंतराचे चित्रण नाही तर स्थूलमानाने १९३० ते १९८५ या पन्नास वर्षाच्या कालखंडात महाराष्ट्रातील मध्यमवर्गीय माणसाचे वदलेले जीवनमान, त्यांच्या आचार-विचारात झालेले वदल यांचा वारकाव्यानिशी दिलेला तपशील आहे. या काळातील मराठी साहित्य, संस्कृती, वक्ते इ. ची माहिती या लेखांमध्ये मिळते. स्वातंत्र्य लढा, भारताची फाळणी, स्वातंत्र्यप्राप्ती, स्वातंत्र्योत्तर काळात वदललेली समाजाची नैतिकमूल्ये,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

विज्ञानाचा वाढता प्रसार, औद्योगिकीकरण, शहरातील वाढती लोकसंख्या, सामाजिक सुधारणा यांचा मागोवा 'श्री.जं.' नी आपल्या लेखांमधून घेतला आहे. या लेखांचा चिकित्सक अभ्यास करताना प्रथमतः 'ललितगद्य' या वाङ्मय प्रकाराचे गेल्या शंभर वर्षात बदललेले स्वरूप आणि आजचे स्वरूप याचा अभ्यासपूर्ण परामर्श घेतला आहे.

ललितगद्याची तात्विक बाजू - ललितगद्य या साहित्य प्रकाराची लक्षणे, वैशिष्ट्ये, त्यातून व्यक्त होणाऱ्या अनुभवांचे स्वरूप, वृत्तपत्रीय ललितगद्याचा तात्विक विचार केला आहे.

श्री.जं.च्या ललितलेखांमधील अनुभवविश्व व विषयाच्या अनुषंगाने वर्गीकरण, उदा.: आत्मपर, व्यक्तीविषयक, स्थलवर्णनपर, समाजजीवनाचे चित्रण करणारे इत्यादी.

**प्रकरण ६ वे : 'श्री.जं.' चे संकीर्ण साहित्य**

१) सहलेखन - 'ऐलमा-पैलमा' या कादंबरीच्या तीन खंडांचे डॉ. म. वि. गोखले यांचेसह केलेले लेखन.

२) संक्षिप्तीकरण - ना. ह. आपटे यांच्या 'साजणी' चे संक्षिप्तीकरण.

३) किशोरांसाठी लिहिलेल्या संपूर्ण श्रीकृष्ण कथा.

**प्रकरण ७ वे : समारोप**

साहित्यिक श्री.ज. जोशी यांच्या साहित्याचा अभ्यास 'एका लेखकाचा अभ्यास' या संशोधन प्रवर्गामध्ये केलेला आहे. सहा प्रकरणांमध्ये एकेका वाङ्मयप्रकारांचा, तसेच श्री. जं. च्या व्यक्तिमत्वाचा स्वतंत्र विचार केला असून समारोपात त्यांच्या एकूण साहित्याचा एकत्रित विचार मांडला आहे.

**निरीक्षणे व निष्कर्ष**

कादंबरी वा ललितगद्य या वाङ्मय प्रकारांपेक्षा 'श्री.जं.' ना कथालेखनात विशेष रुची होती. त्यांची कथा मध्यमवर्गीय जीवनाला सन्मुख असून या जीवनावरेवरच आपली गती राखून होती.

नवनवीन कथाबीजांचा शोध घेणारी त्यांची प्रतिभा अखेरपर्यंत सतेज होती.

श्री. जं. चे कथालेखन मराठी कथेच्या समृद्धीत भर घालणारे, सशक्त व दमदार आहे.

कुसुमावती देशपांडे यांच्यापाशी थबकलेली मराठी कादंबरीची समीक्षा 'आनंदी गोपाळ' मुळे चलित झाली.

'श्री.जं.' सारखे लोकप्रिय स्तरावरचे लेखव साहित्याचा प्रवाह वाहता ठेवतात व नवनवी वाचकांना साहित्यप्रवाहाकडे खेचून घेतात. पण 'श्री.जं.' चे साहित्य यापेक्षा वरच्या दर्जाचे आहे. त्यांच्या साहित्याला एक गंभीर आणि कलाहेतुगर्भ दर्जा आहे.

◇ ◇

डॉ.सौ.स्नेहसुधा अरुण कुलकर्णी
(एम.ए.पीएच.डी.)
सुपार्श्वनाथ हौ.सोसायटी, पाल्वी, मार्केट यार्ड,
पुणे ४११ ०३७.

##  स्वागत 

**ज्ञानेश्वर चिंतन :** डॉ. उषा मा. देशमुख, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२०.
**मराठीतील कथा रूपे :** प्रा. रा. ग. जाधव, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७०.
**तुकाराम कथा आणि व्यथा :** पानघाटे वा. कृ., पृष्ठे ४०.
**स्वातंत्र्यवीर सावरकर :** सुधाकर देशपांडे, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ३२.
**ऐतिहासिक कथा :** चित्रा हरी वझे, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ३२.
**पिंड :** नारायण शिरसाळे, वीणा प्रकाशन, जळगाव. पृष्ठे १००.
**जात :** नारायण शिरसाळे, वीणा प्रकाशन, जळगाव. पृष्ठे ७६.



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





## स्वागत

**मी एक दर्शन बिंदू :** आसावरी काकडे यांचेकडून ग्रंथालयास सप्रेम भेट.
**दोन हजार साल :** नाना भाऊ माळी यांचेकडून सप्रेम भेट.
**गावसकर - तेंडुलकर :** अरुण वेलसरे यांचेकडून सप्रेम भेट.
**आंबडेकरवादी मराठी साहित्य :** डॉ. यशवंत मनोहर, भीमराव प्रकाशन, नागपूर. पृष्ठे २५०.
**शोकात्म विश्वरूपदर्शन :** स. य. गाडगीळ, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे ३२०.
**माझी स्वरयात्रा :** राम फाटक, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४२.
**वाकडी वाट :** एन्. एम्. आव्हाड, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९४.
**युगांतर :** राजीव साने, राजहंस प्रकाशन, पुणे. पृष्ठे २६०.
**ढगाची तहान :** श्री. राम गुंदेकर, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १३.
**डायलिसिस :** डॉ. मदनराव काळे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे १६३.
**घर-शिवार :** संपादन-डॉ. चंद्रकुमार नलगे, साकेत प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे २६७.
**नाही चिरा नाही पणती :** य. दि. फडके, श्रीविद्या प्रकाशन, पुणे. पृष्ठे २६२.
**दोस्तवंदी :** नयना आचार्य, नीहार प्रकाशन, पुणे. पृष्ठे ५६.
**धुमकेतू :** मीना वांगीकर, नीहार प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२८.
**उलटापालट :** माधव पु. लेले, नीहार प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९९.
**युगंधर :** शिवाजी सावंत, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे. पृष्ठे ९७६.
**कहाणी हैद्रावाद लढ्याची :** नरेंद्र चपलगावकर, देशमुख आणि कं., पुणे. पृष्ठे ८५.
**निसर्ग सुक्त :** डॉ. सुनील रेड्डी, देशमुख आणि कं., पुणे. पृष्ठे ३२४.
**तेलगु साहित्य परिचय :** मूळ लेखक व रचना-कै.भालचंद्र आपटे शास्त्री, मराठी साहित्य परिषद, हैद्रावाद, संपादन-द. पं. जोशी. पृष्ठे २५६.
**कर्तृत्वाचा महामेरु :** कै. के. व्ही. लक्ष्मणराव (चरित्र व वाङ्मय), मराठी साहित्य परिषद, हैद्रावाद, संपादन-द.पं.जोशी. पृष्ठे २५२.
**पंचधारा :** संकलन-मीना मनसवदार (टिळक), मराठी साहित्य परिषद, हैद्रावाद. पृष्ठे १०४.
**वधस्तंभ :** डॉ.अरुण गद्रे, देशमुख आणि कं., पुणे. पृष्ठे २७८.
**वास्तुऋण :** प्रकाश पाटक, देशमुख आणि कं., पुणे. पृष्ठे ४३२.
**डेबु :** विठ्ठल भिकाजी वाघ, देशमुख आणि कं., पुणे. पृष्ठे ३०५.
**अक्षरांचा श्रमकेला :** विलास सारंग, मौज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १९४.
**चरित्रचिंतन :** द. न. गोखले, मौज प्रकाशन, मुंबई. पृष्ठे १४५.
**आरोग्यं सकल संपदा :** ज्योत्स्ना ढवळे, विनायक बावुराव ढवळे प्रकाशन, पुणे. पृष्ठे ८७.
**साहित्य सम्राट न. चि. केळकर वाङ्मयीन अभ्यास :** डॉ.पंडित आवळीकर, अक्षय प्रकाशन, पुणे.
**आत्मजा :** मृणालिनी प्रभू, अश्वमेध प्रकाशन, डोंबिवली. पृष्ठे ८०.
**मस्तमस्त कोडी :** अशोक करुडे, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे १६.
**सत्याचा पुजारी :** धो. वे. जोशी, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे २५.
**साहसी गंपू :** सुनंदा चौधरी, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे २४.
**चतुर म्हातारा :** ज्ञानदेव चौधरी, ओंकार प्रकाशन, नांदेड. पृष्ठे २४.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# कुमारांचा कल्पवृक्ष !



डॉ.लीला दीक्षित

उभं आयुष्य मुलांशी नातं जोडता जोडता कुमारांचा कल्पवृक्ष असलेले गोपीनाथ तळवलकर प्रभूशी नाते जोडून अनंतात विलीन झाले. गोपीनाथ तळवलकर या लांबलचक नावापेक्षा उभा महाराष्ट्र त्यांना 'मुलांचे नाना' या नावानेच ओळखतो. मनात एक विचार आला, स्वर्गामधे परमेश्वराने साहित्य संमेलनाची तर योजना केली नाही ना ! साहित्य क्षेत्रातील अनेक थोर मंडळी गेल्या दोन तीन महिन्यात ही चिरंतनाची वाट चालून गेली आहेत. कविवर्य ना. घ. देशपांडे, श्रेष्ठ पत्रकार आणि लेखक वि. स. वाळिंबे, कवयित्री संजीवनी मराठे, मधुकर टिल्लू, महाराष्ट्राचे दैवत असलेले पु. ल. आणि गोपीनाथ तळवलकर. आणखीही काही श्रेष्ठ साहित्यिक इतक्या छोट्या कालावधीत जाण्याचे दुसरे काय कारण असावे ! एवढं मात्र खरं ही सारी माणसे साहित्यविश्वात रमणाऱ्या साऱ्या रसिकांना पोरकं करून गेली !

गोपीनाथ तळवलकरांचा म्हणजे नानांचा आणि माझा संबंध गेल्या चाळीस वर्षांचा तरी आहे. गेली तीन वर्षे तर आमचे वास्तव्यही फार निकटचे झाले होते. कधी तरी ते फोन करून एखादे पुस्तक मागवून घेत. कै. श्री. ग. य. दीक्षितांनी कृष्णमूर्तींचे भाषांतरित केलेले एक पुस्तक त्यांना द्यायला गेले होते. ही नानांची शेवटची भेट. आमच्या पिढीला समर्पित आयुष्य जगणाऱ्या अनेक माणसांनी प्रेरणा दिली, त्यामध्ये नाना होते. त्यांनी आपलं उभं आयुष्य खास करून मुलांच्या कामासाठी अर्पित केलं होतं.

आनंद आणि नाना हा जणु द्वंद्व समास. 'आनंद' हे मुलांचे मासिक. कै. वा. ग. आपटे यांनी १५ ऑगस्ट १९०६ ला आनंदचा पहिला अंक काढला. 'आनंद' पेक्षा नाना फक्त एक वर्षाने लहान होते. त्यामुळे आनंदची आणि नानांची वाटचाल जणु बरोबरच झाली. १९२८ साली नानांनी आनंद मासिकाच्या संपादनाची धुरा उचलली. प्रथम दोन वर्षे ते उपसंपादक होते. १९३० साली श्री. वा. गो. आपटे गेले आणि नंतर अडीच तपे त्यांनी 'आनंद' सांभाळला.

तो पारतंत्र्याचा काळ होता. देशभक्ती हा त्याकाळी ध्येयवादी माणसांचा 'वसा' च होता. ध्येयवादी तरुण पिढी तयार करायची असेल तर उत्तम संस्कार करता येईल असे माध्यम महत्त्वाचे होते. आनंद सुरू झाला तो या प्रेरणेतून. कै. वा. गो. आपटे यांनी लावलेल्या आणि नानांनी अत्यंत कष्टाने आणि आत्मीयतेने जोपासलेल्या या चिमुकल्या रोपट्याचा महावृक्ष झाला आहे. गेली ९४ वर्षे एखाद्या अंकाचा अपवाद वगळता अविरतपणे चालू असलेले 'आनंद' हेच एकमेव मराठी मासिक असेल.

एखादे बालमासिक असे अविरत चालवणे ही साधी गोष्ट नाही. नानांच्या जवळ एक दृष्टी होती. मुलांच्या मानसिकतेचे नेमके मर्म त्यांनी जाणले होते. मुलांना जे आवडते ते तर त्यांनी दिलेच पण मुलांची वाचनक्षमता त्यांनी जोपासली. मुलांचे केवळ मनोरंजन करून भागण्यासारखे नाही. मनोरंजनाबरोबर मुलांची बौद्धिक, भावनिक आणि मानसिक क्षमताही वाढायला हवी हे त्यांनी जाणले. त्यामुळे रंजक गोष्टी, वेधक कोडी आणि छान छान कविता याजबरोबर आनंदमधे इतिहास, भूगोल, विज्ञान, भारतीय संस्कृती, विविध कला, क्रीडा या विषयावर जाणकार लेखकांकडून त्यांनी लेखन करवून घेतले. कै. पु. म. लाड, राम गणेश



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

गडकरी, कै. का. न. केळकर, कै. प्र. के अत्रे, कवी गिरिश, यशवंत, कविवर्य भा. रा. तांबे, नां. शं. नवरे, भा. रा. भागवत, गोविंद तळवलकर, ग. ह. पाटील अशा नामवंतांनी 'आनंद' साठी लिहिले.

विज्ञानविषयक जाण मुलांच्यामधे वाढली पाहिजे या दृष्टीने 'आनंद' मधे एक सदर असे. मुले प्रश्न विचारीत, पुढील अंकात या प्रश्नाची उत्तरे योग्य व्यक्तींचे सहकार्याने आनंदमधे प्रसिद्ध होत. 'सागच चमत्कार' ही पहिली विज्ञान कादंबरी नानांनी क्रमशः लिहिली ती आनंदमधूनच. १९२३ मधे 'साखर कारखाना' या नावाचा विस्तृत लेख आनंदमधून नानांनी प्रसिद्ध केला. आनंदच्या वाटचालीत विमान-विशेषांक, तोफा विशेषांकही निघाले. काळावरोवर मुलांचे ज्ञान सजग राहिले पाहिजे याची नानांना सतत आस्था होती.

त्या काळात नाना जणु 'आनंदमय' झाले होते. जे जे उत्तम असेल, ते ते मुलांपर्यंत पोहचले पाहिजे असा नानांच्या मनी सतत ध्यास होता. पारतंत्र्याच्या त्या झपाटलेल्या काळात देशभक्तांची चरित्रे नानांनी आनंदमधून मुलांपुढे ठेवली. १९३४ सालची गोष्ट. नेताजी सुभाषचंद्र वोस पुण्यात आले होते. कै. न. वि. गाडगीळांकडे ते उतरले होते. नानांना वातमी कळली. त्यांनी सुभाषवावूंची भेट घेतली आणि 'आनंद' च्या मुलांसाठी सुभाषवावूंचा संदेश आणि स्वाक्षरी मिळवली आणि अंकात छापली. मुले इतकी खूप झाली की पत्रांचा पाऊस पडला. दादाभाई नौरोजी, प्रफुल्लचंद्र रॉय यांचे असेच आशीर्वाद त्यांनी मुलांसाठी मिळवले.

'आंतरभारती' ची कल्पना आता खूपच विकसित झालेली आहे. संपर्क माध्यमांनी आता 'विश्वभारती' हे स्वप्न निर्माण झालंय. परंतु त्या काळात विशेष संपर्क साधने नव्हतीच. साठ-पासष्ट वर्षापूर्वी नानांनी स्वातंत्र्यपूर्वकाळात हे आंतरभारतीचे स्वप्न मुलांच्या मनात उतरवले. १९३० मधे आनंदमधे एक पान हिंदी सुरू झाले. मुलांना राष्ट्रभाषेचा परिचय व्हायला हवा ही त्यामागे कल्पना होतीच. केवळ 'हिंदी' शी आनंदची मुले परिचित राहून पुरेसे नाही. चौदा (त्या काळात) भाषांचा आपला विराट देश. इतर भाषातील जे जे उत्कृष्ट आहे ते मुलांपर्यंत पोहचले पाहिजे. नानांच्या डोक्यात कल्पना यायचा अवकाश ! आनंदमधे एक नवीन सदर सुरू झाले -'मधाचे पोळे' - भारतीय भाषांमधील उत्तम ग्रंथांचा परिचय किंवा उत्तम असा अनुवाद मुले या सदरातून वाचू लागली.

आर्थिक विकट परिस्थितीमधून आनंदने जिद्दीने वाटचाल केली. अवघ्या पाचशे रुपयांच्या भांडवलावर कै. वा. गो. आपटे यांनी हे रोप लावले. छापखाना काढला. पण 'आनंद' दोन वर्षाचा वाळ असतानाच वा. गो. गेले. त्यामुळे आनंदला वाढवणे, घडवणे, समृद्ध करणे आणि भक्कम आर्थिक पायावर उभे करणे हे काम तसे सोपे नव्हते. नानांनी ते जिद्दीने केले. आज दोन हजार सालात शिक्षणाचा प्रचंड प्रसार झालेला असताना मुलांचे अंक खपत नाहीत हे रडगाणे आपण गात असतो. त्या पार्श्वभूमीवर पन्नास वर्षापूर्वी 'आनंद' चा खप पाच सहा हजार होता हे किती विलक्षण ! एवढंच नाही तर 'आनंद' च्या काही प्रती लंडन आणि मॉरिशस येथील मुलांसाठी जात होत्या.

नानांचे मुलांसाठी कर्तृत्व नोंदवताना आणखी एका माध्यमाचा उल्लेख करायलाच हवा. पुण्याला आकाशवाणी केंद्र सुरू झाले. १९५६ ते १९६९ या काळात नानांनी 'वालोद्यान' विभागाचे प्रमुख म्हणून



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

काम पाहिले. मुलांचा कार्यक्रम अत्यंत जागरूकतेने आणि जबाबदारीने सादर करायला हवा असे नानांना वाटे. त्यात रंजकता हवी, विविधता हवी, बौद्धिक खाद्य हवे आणि भावनिक पोषणही हवे. आकाशवाणी हे श्राव्य माध्यम पण या श्राव्य माध्यमाने एकेकाळी मुलांना अक्षरशः वेड लावले होते. मुलांचे कुतुहलाचे विषय त्यांनी जाणले. आपल्या सहकाऱ्यांजवळ चर्चा करून कार्यक्रम सर्वांगसुंदर कसा होईल यासाठी त्यांनी कार्यक्रमांची आखणी केली. पशु, पक्षी, प्राणी, झाडे, सागर, आकाश, चंद्र, सूर्य हे निसर्गासंबंधित विषय बालोद्यानमधे आले. जास्तीत जास्त विज्ञानाचा स्पर्श करून त्यांनी मुलांपुढे निसर्ग उलगडला. तसेच त्याच्या लोभस सौंदर्याचा आस्वाद कसा घ्यावा, निसर्गाला जपावे कसे हेही मुलांच्या मनात रुजवले. निसर्गाबरोबर इतिहास, भूगोल, सामान्यज्ञान, आपली संस्कृती, रामायण, महाभारत हे विषयही नाटुकल्यांचे रूपाने मुलांपुढे मांडले. मला आठवते बालोद्यानचे विशिष्ट संगीत सुरू झाली की आम्ही मुले घराघरातून चिडीचूप व्हायचे. मुले रेडिओभोवती गोळा व्हायची. 'हरबा' च्या भूमिकेत नेमिनाथ उपाध्ये मुलांना थेट खेडेगावात नेऊन ठेवायचे. सुधा सोमण आणि नंतर सई परांजपे यांचे सहकार्यही नानांना लाभले.

मुलांचा प्रत्यक्ष सहभाग या कार्यक्रमात असायचा. बालसंस्था, शाळाही या कार्यक्रमात पुढे सहभागी होऊ लागल्या. जास्तीत जास्त मुलांच्या कलागुणांना वाव मिळायला हवा हा नानांचा ध्यास होता. आमच्या पिढीच्या मंडळींना आजही बालोद्यानचे कार्यक्रम आठवतात, इतके ते रंजक आणि विविधतेने नटलेले होते.

नानांची जीवनदृष्टी ही भारतीय आध्यात्मपरंपरेतून जोपासलेली होती. ज्ञानेश्वरीतील सौंदर्यविश्व, टिळकदर्शन, बुद्धायन, गृहरत्ने, आशियाचे धर्मदीप, बुद्धदेव, स्वातंत्र्यसुक्ते. कै. वा. गो. आपटे चरित्र या त्यांच्या पुस्तकावरून त्यांच्या ज्ञानाच्या कक्षा किती बहुअंगी होत्या हे सहज लक्षात येते. परंतु नानांनी विपुल लेखन केले ते मुलांसाठीच. नानांचे मुलांवर किती प्रेम होते. आपली मुले सुसंस्कारी, विवेकी, विचारी, बुद्धिमान व्हावीत असे सतत त्यांना वाटत राही. याच सततच्या विचारामधून नानांनी मुलांसाठी केलेल्या एका प्रकल्पाचा उल्लेख करायला हवा. 'ज्ञानेश्वरी' म्हणजे कठीण अध्यात्मिक ग्रंथ ! आपल्या तो काय कामाचा ! म्हणून मी मी म्हणणारे साहित्यिकही ज्ञानेश्वरीला हात लावीत नाही. परंतु नानांची अध्यात्माची साधी सुंदर व्याख्या होती. त्यांना ९० वर्षे पूर्ण झाली तेव्हा 'आनंद' साठी मी त्यांची खास मुलाखत घेतली. तेव्हा त्यांना 'आध्यात्म' म्हणजे नेमके काय म्हणून विचारले. नानांनी चार सुंदर शब्दात म्हटलं, 'आध्यात्म म्हणजे जीवन जगण्याचा सुंदर मार्ग.' हा मार्ग मुलांना दाखवायलाच हवा, म्हणून त्यांनी साध्या सोप्या भाषेत मुलांसाठी 'बालबोध ज्ञानेश्वरी' लिहिली हे किती लोकांना माहीत आहे ?

सामान्यातील सामान्याचे नानांच्या घरी स्वागत होते. ते ज्ञानाने खूप मोठे होते. परंतु त्यांचा खरा आनंद मुलांच्यामधे होता. मुलांच्या सहवासात, मुलांसाठी काही करण्यात, लिहिण्यात त्यांना जीवनाचे साफल्य आहे असे वाटे. नाना नेहमी म्हणत 'ज्ञानाने माणूस मोठा होतो हे खरे परंतु त्याला जीवनाचे पुस्तक वाचता आले पाहिजे. त्याने तो मोठा होतो. स्वतः मोठे होताना दुसऱ्याला मोठे करायला मदत करण्यात खरी माणूसकी आहे.' गोपीनाथ तळवलकर या नावाचा लेखक मोठा होताच. पण 'मुलांचे नाना' म्हणून ते जास्त मोठे होते.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

१९७१ साली त्यांनी टागोर व्याख्यानमाला गुंफली. १९४१ मधे खानदेश साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. ग्वाल्हेर येथे झालेल्या साहित्य संमेलनाचा अध्यक्षपदाचा सन्मानही त्यांना लाभला. अनेक पुस्तकांना पुरस्कार लाभले. दोन वर्षापूर्वीच वयाच्या त्र्याण्णवाव्या वर्षी साहित्य संस्कृती मंडळाने जीवन गौरववृत्ती प्रदान करून त्यांना सन्मानित केले. परंतु जनमानसात या लेखकाचा ठसा उमटला तो 'मुलांचे नाना' या नावानेच. महाराष्ट्र साहित्य परिषदेचाही विशेष पुरस्कार त्यांना लाभला.

मुलांचे मन सुसंस्कारी प्रगल्भ, सुंदर बनविण्याचा अक्षरवारसा त्यांनी आयुष्यभर सांभाळला. चंदाराणी, सारसबाग, दुर्वांकूर, गणपतीबाप्पा मोरया अशी कितीतरी पुस्तके आमच्या आजही स्मरणात आहेत. आजच्या पिढीचे कितीतरी नामांकित लेखक आम्ही लहानपणी 'आनंद' वाचीत होतो असे अभिमानाने सांगतात. आमच्या पिढीच्या मनावर आमच्या या नानांनी संस्काराची, प्रगल्भतेची उमटवलेली कालमुद्रा पुसता येणार नाही. नर्मदा तटीच्या या सरस्वतीपुत्राचे जाणे आमच्या पिढीच्या माणसांना चटका लावून जाते. कारण आमचे 'मूलपण' नानांनी जोपसले आहे. कुमारांचा हा कल्पवृक्ष मुलांसाठी आयुष्यभर फुलत राहिला ! त्यांच्या स्मृतीला आमच्या पिढीची ही अक्षरफुले वाहताना मन कातर आहे आणि तृप्तही आहे !

◇ ◇

डॉ. लीला दीक्षित

'ध्रुव', ४९/२, सहजानंद सोसायटी, कोथरूड, पुणे ४११ ०२९. फोन : ५३८१७३३.

---


## गुंतवणुकीचे दोन पर्याय

फसवा फायदा+अनिश्चितता | योग्य फायदा + निश्चिंतता

निर्णय तुमच्या हाती..

कॉसमॉसच्या सहजसाध्य अन् फायदेशीर योजनांबरोबरच आहे, कॉसमॉसची ९० वर्षांची अविरत विश्वासाची परंपरा ! तुमच्या गरजा ध्यानात घेऊनच कॉसमॉसनं अनेकविध योजनांची आखणी केली.
३० नॉनस्टॉप,
कॅश सर्टिफिकेट, मुदत ठेव,
स्टॉकइन्व्हेस्ट,
सहज ठेव, उद्दिष्टपूर्ती,
किशोर गौरव,
कॉस्मो सुविधा,
संजीवनी, 
अशा विविध योजनांचा लाभ असंख्य खातेदार विश्वासाने घेत आहेत.
चला तर, या कॉसमॉस ठेव योजनांचा लाभ घेण्यासाठी आमच्या कोणत्याही शाखेच्या स्वागत कक्षाशी संपर्क साधा.

कॉसमॉस बँक

दि कॉसमॉस को-ऑप. बँक लि.

देवी हाईटस, २६९ / २७०, शनिवार पेठ, पुणे - ३०. फोन : ४४५५११४, ४४५५८६७.

e-mail : cosmospn@giaspn01.vsnl.net.in
Visit us at www.cosmosbank.com




अनुक्रमणिका






# काव्यानंद



## अरविंद भुजबळ

कविता ही कवीच्या जगण्या - भोगण्याच्या आणि समाजमन न्याहाळण्याच्या प्रक्रियेतून निर्माण होत असते. मात्र प्रतिभेच्या उत्खननाची योग्य सम साधल्याशिवाय उत्कृट कवितेची निर्मिती होत नसते. कविता एकांतात भोगावी की, लोकांतात उपभोगावी या सारखे प्रश्न अनुत्तरित असले तरी पुस्तक प्रकाशनानंतर कविता एकांतामधून लोकांतात मिसळण्याची प्रक्रिया सुरू होते. 'स्वान्त सुखाय' अशी कवितेच्या निर्मिती मागील कवीची भूमिका असेल तर कवितासंग्रह प्रकाशनाचे प्रयोजन कशासाठी आणि कुणासाठी ?

म. सा. पत्रिकेसाठी आलेल्या कवितासंग्रहातील चांगुलपणाच्या नवख्या खुणा शोधताना अनेक कवींच्या कवितासंग्रहाचा काव्यानंद सहजपणाची वेगळी अनुभूती देऊन जातो. अशा नव्या पिढीतील कवितांची धिटाई अंतर्मुख करणारी आहे. असे लक्षवेधी कवितासंग्रह पुढीलप्रमाणे -

### 'मोहरलेले क्षण'

अतिशय आकर्षक आणि देखण्या रूपामध्ये प्रकाशित झालेला कवी राजीव वर्वे यांचा 'मोहरलेला क्षण' हा कवितासंग्रह पुस्तक बांधणीच्या प्रक्रियेचे वेगळेपण दर्शविणारा आहे. मीलनातील आनंदोत्सवी मनाला अवचित पडलेले विभ्रमी प्रश्न आणि जीवन संघर्षाच्या अनेक भावछटातून ही कविता उलगडत जाते.

अनेक  दिवसांची रात्र
एकच झाली
तो वस्त्रांना टाके घालत राहिला
रात्रीच्या प्रहरानंतर पहाट झालीच नाही
हात मात्र रक्ताळले सुयांमुळे

या सारख्या रचना एकसंघ आशयानुभूतीचे वेगळे दर्शन घडवतात. कवीची समाजमन न्याहाळण्याची वृत्ती त्याच्या कवितेतून प्रगल्भतेची ग्वाही देते. या संग्रहाच्या प्रस्तावनेतून डॉ.गंगाधर महाम्बरे यांनी 'अबोध मनाच्या चिंतनातून निर्माण झालेले हे मोहरलेले क्षण' असा अभिप्राय व्यक्त केला आहे. तो या कवितेच्या अंतरंगाशी जवळीक साधणारा आहे हे कविता वाचताना जाणवते.

तुरुंग, पिंजरा आणि मूठ
कायमची बंद कधीच करता येत नाही
किंवा
समुद्राच्या लाटा वादळल्या
तर वारा कदाचित प्रलय थांबवेल
पण आधारानेच घाव घातला तर ?

या सारखे जीवन संघर्षातील प्रश्न कवीला अस्वस्थ करून जातात. या कवितांना शीर्षक नाही तरीही प्रत्येक पानावरील आशयानुरूप रंगीत रेखाटने हीच या कवितांची बोलकी शीर्षके आहेत. दीपक संकपाळ यांची मांडणी - सजावटही आकर्षक आहे.

मग देवाला जीवन देणाऱ्याला
कोणी जन्माला घातलं ?
त्याला जन्माला घालणाऱ्याचा
परत जनक !...

असा प्रश्नांचा गुंतवळाही कधी कधी विचार प्रवृत्त करून जातो. जीवनाचा शोध घेताना टिपलेले हे मोहरक्षण वाचनीय आहेत यात शंकाच नाही.

मोहरलेले क्षण : कवी राजीव वर्वे
सुयोग प्रकाशन, पुणे. मूल्य : रु.दोनशे फक्त.



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



## 'पार्थिव अपार्थिव'
### जन्मभोगाची कविता

'निर्मितीचे प्रदेश' या काव्यसंग्रहानंतर प्रकाशित झालेला कवी प्रकाश खरात यांचा 'पार्थिव अपार्थिव' हा दुसरा कवितासंग्रह. उदंड काव्य निर्मितीच्या सांप्रतकाळामध्ये वृत्ती - गांभीर्याने कवितेकडे बघणारे कवी प्रकाश खरात यांची कवितेतील महानगरी जाणीव प्रत्ययास येते. आंबेडकरी चळवळीचा व बुद्ध विचारांचा या कवितेवर गहिरा संस्कार असला तरी जीवनाविषयीची, समाज मूल्यांची सखोल जाणीव इथे निर्देशित होते तर अल्पाक्षरीतील पृथगात्मकता क्रांतीसूचक असल्याची ग्वाही ही कविता देते.

विनाशाच्या व्यग्रतेने तिने घडलेली पार्थिव धून उद्धाराचा उजेड स्पर्शताना कवी एकाकीपणाचा पोत विसर्जित करीत जातो आणि आठवतो आयुष्य नावाच्या दुःख पर्वावर पार्थिव अपार्थिव कवितेच्या बोलपणाचे ठसे -

मी नाहीय सुरक्षित
घरात वा ऑफीसात
म्हणवत नाही उजेडाला उजेड
उपरं प्रतिबिंब घेऊन वावरतोय

वर्तमान जगण्यातली असुरक्षितता, प्रचंड ताणतणाव, मरगळ, मूल्यऱ्हास यातूनही कवीला कवितेचाच आधार वाटतो आहे.

नाममात्र उल्हास सोबतीला घेऊन
प्रवास करतोय
प्रवास असा उफराटा की,
जन्मही हाती लागू नये
किंवा
धरतीच्या वेदनेवर शुभ्र फुले टपटपतायेत
वारा वाहतोय निरागसपणे
विषारी दातांशिवाय आयुष्य जन्मतंय
आणि मृत्यूचा होतोय सन्मान

यासारख्या रचनांमधील मृत्यू जाणिवा प्रखरपणे मांडणारी पार्थिव अपार्थिव मधील कविता वैश्विकतेकडे सहजपणे झेपावते. वैफल्यदिंडी, व्रीद हरवलेली रात्र, सूर्य, ओली अस्मिता, संवेदनांचा ध्वज या सारख्या वेगळेपण दर्शवणाऱ्या संकल्पना या संग्रहात सहजपणाची अनुभूती देतात. कवितेच्या प्रदेशात आशय सौंठवतेचे वेगळे परिमाण देणारी कविता पार्थिव अपार्थिव मधून रसिकांना अंतर्मुख करून जाते. हे या कवितेचे यश आहे. पुढील प्रवासासाठी खरात यांना हार्दिक शुभेच्छा !

पार्थिव अपार्थिव : कवी प्रकाश खरात
प्रकाशिका : विजया खरात,
पृष्ठे : ७५, किंमत : पन्नास रुपये

## 'असण्या-नसण्याच्या अस्तित्व खुणा'

असण्या नसण्याच्या समांतर रेषावरील अस्तित्व खुणांचे वेगळेपण निर्देशित करणारा प्रमोद मनोहर कोपर्डे यांचा 'तुझ्या असण्या नसण्याच्या कविता' हा संग्रह शब्दालय प्रकाशनाने प्रकाशित केला आहे. कमीतकमी शब्दातील प्रवाही आशय व्यक्त करणाऱ्या या संग्रहातील कविता असून जीवनातील विरहार्त व्याकुळतेची अनुभूती देणाऱ्या कवितांचा हा प्रवास आहे. अल्पाक्षरी स्थायीभाव असलेली कोपर्डे यांची कविता सहजवृत्तीची आहे.

आता आहे मी तुझ्या
अस्तित्वाच्या तळाशी
आहेस तूच माझ्या
असण्याच्या मुळाशी

या असण्या नसण्यातील मूळ संकल्पना सखीची ओढ चित्रित करणारी आहे. असण्यातील अस्तित्व आणि नसण्यातील पोकळी या कवितेत ठायी ठायी अनुभवास येते. तरी एकसंघपणे कवितेत पुनर्प्रत्यय हा काहीसा अपरिहार्य असतो.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

प्रेम, विरह आणि त्या अनुषंगाने येणाऱ्या जाणिवांचे पैलू यात आढळून येतात. स्वतःला शोधत जाताना कवी सखीशी असलेल्या सख्यपणाचे विविधांगी कंगोरे मांडताना म्हणतो,

तुझ्यासाठी जीव
नुस्ताच तुटला
नुस्ताच तळाशी
पाचोळा साटला

* * *

खोलात नाही
थोडीही ओल
फक्त सलती
काळीज कहाणी

या ओळीतील आर्तता खोलवर उतरवताना कवी स्वतःला सावरतोय जिव्हाळ्याने स्वतःला समजावतो आहे.

तुझं असणं नसणं
आता समजून घ्यावं
भरकटलेलं जगणं
जुन्या रस्त्याला न्यावं

या सारखा स्वसंवादीपणा या कवितेत आढळतो आहे.

स्मरण यात्रेच्या वाटेवरील मनाचे कल्लोळ टिपताना रसिकमनाच्या आशयाला कलाटणी देणाऱ्या कविताही यात वाचनीय आहेत.

आयुष्यातील वैशिष्ट्यपूर्ण क्षणांची या संग्रहातील प्रत्येक कविता म्हणजे एक रोजकीर्द आहे. ज्यावर उलगडत जातो ताळेबंद असण्या नसण्याच्या अस्तित्व खुणांचा म्हणूनच कोपर्डे यांच्या या संग्रहातील कविता रसिकांशी थेट संवाद साधतात.

तुझ्या असण्या नसण्याच्या अस्तित्व खुणां :
कवी प्रमोद मनोहर कोपर्डे
शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे : ८०, किंमत : ६० रुपये.

## शरीरावर तणावग्रस्त

## भारदस्त कविता

अनुष्टुभ, कवितारति, अक्षर चळवळ या सारख्या कवितेला वाहिलेल्या नियतकालिकांतून यापूर्वी प्रकाशित झालेल्या कवी मोहन वोरसे यांच्या कविता आता 'शरीरावर तणावग्रस्त' असे भारदस्त नाव असलेल्या कवितासंग्रहाच्या रूपाने एकसंघपणे रसिक भेटीस आलेल्या आहेत. स्त्री-पुरुष नात्याच्या दैहिक देवघेवीतील रासवटीचे आशयसूत्र असलेली कवी वोरसे यांची कविता स्व आणि स्वेतर अनुभूतीचे लक्षणीय चित्रण करणाऱ्या आहेत. कवितेच्या रुढ परंपरेला छेद देऊन कवी दिलीप चित्रे, ढसाळ, नेमाडे यांची कविता धिटाईने रसिकांसमोर आली त्याच परंपरेतील परंतु स्वानुभवाचे सच्चेपण प्रकट करणारी कविता या संग्रहात आढळून येते.

कमीत कमी शब्दांत आशय व्यक्त करण्याचे भान या कवितेने आत्मसात केले आहे. 'लक्षवेध' ही आरंभाची कविता तर पुढे फेर आणि फेरीतील लक्षवेधी तणाव या संग्रहातील कवितांमधून आशयबद्ध होतात. सूक्ष्मातिसूक्ष्म जीवन धाग्याशी भिडलेले हे कविमन या ऐहिक दैहिक प्रवाहातील प्रस्तरारोहन धीटपणे मांडण्याचा प्रयत्न करीत आहे.

संयमाचा गळू फुटल्यानंतर श्लीलतेचे कपडे चढवून नैतिकतेचा शिमगा करणाऱ्या प्रवृत्ती विरुद्ध लढताना हे कविमन स्वस्थ बसत नाही.

'रस्ता' मधील माळाच्या रोखाने पुढे येणारे शहर, तू म्हणजे माझ्या कौलारू घरावरचं तडकलेलं कौल, प्रकृतीच्या कमानीखाली स्वागत करणारा तो सोलीव सुखाचा कातीव साक्षात्कार या सारख्या अंगभूत वेगळेपण दर्शवणाऱ्या संकल्पना या कवितेच्या आशयालाच बळ देऊन जातात.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तो शब्द प्रतिमा फुंकू लागला
अन् निववू लागला
आभाळ कॉफी मध्ये
..........
तो कॉफी ढवळू लागला
आणि आख्खं कॉफी हाऊस त्याच्या भोवती
फिरू लागलं
कॅलीडोस्कोपसारखं
किंवा
मी स्वातंत्र्य मागितलं
आणि तू
घरातला पिंजरा परसात वांधला.

या सारख्या सांकेतिक खूणा जगरहाटी मध्ये वावरताना तणावग्रस्त अंतराला निरुत्तर करून जातात.

पाचर, गुंतवळ, अधिराग्री झरा, तुला वेतताना, ग्रेन्स या सारख्या अनेक कविता अंतर्मुख करून जातात. एकूणच तणावग्रस्त वातावरणात मनमोकळा संवाद साधणाऱ्या या कविता पुन्हा पुन्हा वाचाव्याशा वाटतात.

शरीरावर तणावग्रस्त : कवी मोहन वोरसे
मनमीत प्रकाशन, नासिक, पृष्ठे : ७३, किंमत : ८० रुपये

### वळण वाटेवरील 'तुझ्या कविता'

स्वतःच्या कवितेची वाट शोधताना काहीसे अडखळत काहीसे धीटपणे टाकलेले पाऊल म्हणजे डॉ.प्रमोद पाव्रेकर यांचा 'तुझ्या कविता'. तू आणि मी या स्नेहमयी भावना त्यातील गुंता सोडवताना होणारी मनोवस्थेतील घालमेल मांडण्याचा प्रयत्न डॉ.पाव्रेकर यांनी केला आहे.

प्रेमाच्या विविधांगी आशयाला स्पर्श करणाऱ्या अनेक कविता या संग्रहात आढळतात.

हवं तर असं कर माझा विस्तीर्ण निसर्ग तुला घे !
नाहीतर असं कर तुझं संपूर्ण अस्तित्वच मला दे !

स्वतःने स्वतःची घातलेली समजूत कधी कधी असा टोकाचा विचारही या मनोगतामधून व्यक्त करून जातो तर प्रेम आपुलकी, प्रेम विरह या धाग्यांना गुंफताना या कविता आत्मप्रत्ययाच्या काळोख डोहात उतरतात. विरहाच्या वाटेवरील हृदयस्पर्शी आपुलकीचे चित्रण कवीने सुसंवाद साधताना केले आहे.

तुझ्या आठवांचं आभाळ व्याकुळ
आता पहुडतं क्षितीजावर
अन् वरसत राहतं
या निळ्याशार सागरात
किनारा मात्र कोरडा ठणठणीत
नव्या अंकुराचा लवलेशही नाही
फक्त निवडुंगाचा पहारा
सभोवताली पसरलेला

या सारख्या अस्वस्थ करणाऱ्या ओळीही या संग्रहात येतात, तर आयुष्यविषयी काही वेगळे संवादही चिंतन करावयास भाग पाडतात.

ड्रॉवर मधून कागदांचे ढिग उपसताना
एखादा चिटोरा उसवून टाकतो
संपूर्ण भूतकाळ
भिजत टाकलेल्या कडधान्याला
जसे मोड येतात रात्रीचे, तसे
स्वप्नांचे मोड येतात मेंदूला

मलपृष्ठावरील लेखनातून डॉ. अरुणा ढेरे यांनी या कवितेच्या धाटणीचा परिचय रसिकांना करवून दिला आहे. मुखपृष्ठावरील लक्षणीय संकल्पना स्वतः कवीचीच असल्याने डॉ.पाव्रेकर यांच्या कवितेचा प्रारंभ मुखपृष्ठापासूनच होतो असे म्हणावयास हरकत नाही. छंदोवद्ध कवितेविषयी मात्र कवीला अधिक परिश्रमाची आवश्यकता





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आहे. स्वत:ची वाट स्वत: शोधत जाणारी डॉ.पाव्रेकर यांची कविता 'तुझ्या कविता' मधून पुढे जाताना आशादायक ग्वाही देणारी आहे.

तुझ्या कविता : डॉ.प्रमोद पाव्रेकर

आकाश प्रकाशन, डोंबिवली, पृष्टे : ५८, किंमत : पन्नास रुपये

## 'वासरी'
## समाजजाणिवेचा वेगळा सूर

मराठी कवितेच्या प्रवाहात सॉनेट, हायकू, रुबाई यासारखे परभाषिक काव्यप्रकार रुढ झालेले आहेत तसाच उर्दू-फार्सीतून आलेला गझल प्रकारही मराठीने आत्मसात केला आहे. कविवर्य सुरेश भट यांच्या नंतर गझलकारांची एक पिढीच निर्माण झाली. त्या पिढीचेच प्रतिनिधित्व करणारे गझलकार घन:श्याम धेंडे यांचा 'वासरी' हा गझलसंग्रह नव्या समाजजाणिवांची अभिव्यक्ती घेऊन रसिकभेटीस आला आहे.

'गझल' म्हणजे प्रियकराने प्रेयसीबरोबर एकांतात केलेले हितगुज किंवा गझल म्हणजे स्वत:चा स्वत:शी संवाद अशा अनेक व्याख्या गझल विषयी रुढ आहेत. गझल हा मुळातच छंदोबद्ध काव्यप्रकार असला तरी गझल हे वृत्त नसून वृत्ती आहे. तिचा प्रत्येक शेर (द्विपदी) अभिव्यक्तीचा एक उद्गार असतो. अशा सप्तसुरांचे संमीलन घन:श्याम धेंडे यांच्या 'वासरी' या संग्रहात दिसून येते.

लिहिल्या गझला सुरा सुंदरी वा परिवरी
लिहिली आहे कधी कुणी का भाकरीवरी !

गझलच्या परंपरागत विषयांना बगल देऊन एकूणच प्रदूषित समाजनीती विषयी मानसिकतेच्या विषयांना वाट करून देणाऱ्या या गझल रचना आहेत. यासाठी विविधांगी वहरातील गझल लेखन धेंडे यांच्या प्रगल्भतेची ग्वाही देते.

'आज वृद्धांनी लढावे' लोकहो ही वेळ आली
आणि तरुणांनी वळाव्या फक्त आता सांजवाती

किंवा

देव पितो चोरुनी, शंका मनीही दाटली
काल गेला ग्लास माझा, आज आख्खी वाटली

असा उपहास व्यक्त करणाऱ्या अनेक द्विपदी या संग्रहात आढळतात.

अत्यंत सोप्या भाषेतील रुढ मौखिक शब्दांचा वापर हे धेंडे यांच्या गझलेचे वेगळेपण निर्देशित करते. हे सहजपणाच्या बोलीतून उमटलेले सूर आहेत. तरीही शेरमधील गझलीयत जपताना तिच्यातील चपलता हरवून जाण्याची भीती जाणवते.

जुनेच सारे दिसावयाचे नव्याप्रमाणे
क्षणैक अन् लुकलुकायचे काजव्याप्रमाणे !

या सारख्या काही द्विपदी चिंतनीय आहेत. या संग्रहात काही हज़ल रचनाही आढळतात. मात्र विडंबन उपरोधात्मक पातळीवर त्या सहजपणे भावत नाहीत.

खोट्याच भाषणांचा ज्यांना सराव आहे
देशात आज त्यांना भलताच भाव आहे

......

नेते उदंड झाले, होतील या पुढे ही
नेतृत्व मात्र नाही त्याचा अभाव आहे.

राजकीय स्थितीचे सम्यक दर्शन करणाऱ्या काही द्विपदी विचार करावयास भाग पाडतात. राहूल देशपांडे यांनी मुखपृष्ठ मांडणीचे काम कुशलतेने केले आहे. डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी यांची सखोल प्रस्तावना या संग्रहास लाभलेली असून एकूण रसिकांना या गझलरचना आवडतील असा विश्वास वाटतो.

वासरी : घन:श्याम धेंडे

मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्टे : ५८, किंमत : ६० रुपये



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## प्रेयस रुपाची 'श्यामल' कविता

कवी नरेन्द्र वोडके यांचा 'श्यामल' हा चौथा कवितासंग्रह पुष्प प्रकाशनने प्रकाशित केला आहे. जीवनाच्या विशिष्ट टप्प्यावरील प्रियकर आणि प्रेयसीचा आत्मसंवाद पहिल्या भेटीपासून सुरू होतो. तिच्या निळसर, श्यामल कल्लोळात वुडून जाणारा तो आणि सर्वांशी नीट अंतर राखून वागणारी ती या दोहोंच्या प्रेमाच्या क्षितीजावर एकरुपतेचा उलगडा करणारी श्यामल मधील कविता आहे.

या संग्रहात प्रेम संवंधाच्या अधोरेखित धाग्यांना गुंफणाऱ्या अनेक कविता आहेत. श्यामल या प्रतिमेतील प्रेयस रूप कोवळ्या मनाच्या निरागसतेशी जवळीक साधणारे आहे.

कुठे हा संवाद एका अनाम अधोवदनाचे रूप घेऊन येतो तर कुठे कुठे त्याच्या असण्यानसण्याच्या दीपभासाचे श्यामलपण दर्शवतो.

आपल्या स्पर्शातून निघतात सतारीचे स्वर<br>
आपण हात हातात घेतो<br>
तेव्हा स्वरमंडळाच्या उगमापाशी<br>
झिणझिणत असतो

या सारख्या स्पर्शमयी कल्पना वेधक आहेत. मंतरलेल्या देहभारात होकारातील अदिमता आणि संस्कृतीचे शाश्वत रूपरंग प्रेमातील हुरहूर, व्याकुळता, निराशा अनेकदा अभिव्यक्त होताना दिसते.

'श्यामल' ही त्याला त्याच्या जीवनातील उच्छवासाच्या उजवाती धुमसताना उर्वशीच्या रुपात दिसते, तर कधी मागे पाश अडकलेल्या पिंजऱ्यातील मीलनोत्सुक व्याकुळ पक्षीण दिसते.

जे थेट भक्तीच्या गाभाऱ्यात<br>
शिरू पाहतात<br>
त्यांच्या माथ्यावर प्रकटते<br>
प्रीतीची सोनसळा

भक्ती आणि प्रीती मधील श्रद्धेचे अलौकिक संवादक्षण 'श्यामल' मध्ये प्रत्ययास येतात. वहुतांशी मुक्तछंदातील या कविता आहेत. मात्र त्यातील 'ललित लवंगलता कोमल मलय समीरे !' अशा एखाद्या तरल ओळीचे प्रयोजन सहजपणाच्या अनुभूतीतून की, कवी हट्टातून आहे हे वाचकांनीच ठरवावे.

सच्च्या प्रेमाच्या अहेवपणाची चिरंतन साक्ष देणाऱ्या श्यामल मधील कविता चिंतनीय आणि चिरंतनीय आहेत यात शंकाच नाही.

श्यामल : कवी नरेन्द्र वोडके<br>
पुष्प प्रकाशन लि., पुणे, पृठे : ५४, किंमत : ५० रुपये

## स्वानुभवाच्या कवितांचे 'तोरण'

गृहिणी आणि शिक्षकी पेशातील जीवन जगताना आलेल्या अनुभवांचे शब्दरूप चित्रण करणारा सौ. उषा गंधे यांचा 'तोरण' हा पहिला कवितासंग्रह मानसन्मान प्रकाशनाने प्रकाशित केला आहे. कवयित्री सरिता पदकी यांची सखोल प्रस्तावना लाभलेल्या या काव्यसंचातील कवितांमधून जीवनातील अनेक सुखदुःखाचे क्षण चित्रित होतात. अंतर्मुख करणाऱ्या या कविता स्त्री जीवनाच्या चौकटीशी वांधलेल्या आहेत. समाजातील स्त्री, तिचे जगणे आणि त्यातून होणारी घुसमट यात दिसून येते.

पंखात ताकद आल्यानंतर नभांतरी उडून जाणाऱ्या पाखरांची सांकेतिकता स्त्री जीवनाचे प्रसंगावलोकन या कवितांतून दिसून येते.

एकेका काडीचे<br>
घरटे वांधले<br>
झाडाला टांगले<br>
घरटे कसे झाले ? कळलेच नाही

जीवन जगण्यातील कातरता या रचनांमधून दिसून येते. मनाचा सिक्वेन्स लावून हारजितचा खेळ





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

खेळताना आयुष्य असे डावावर लावून जगण्याशी संघर्ष सुरू ठेवणारे मानवी विचार इथे उद्धृत होतात.

आयुष्याच्या उताराला
हळू हळू उतरत जावे
उतरताना पायामधले
वळ तेवढे जपावे

अशा अभिव्यक्तीच्या संचितखूणा इथे आढळून येतात. मन या विषयावरील अनेक कविता या संग्रहात आहेत. उषा गंधे यांच्या कवितेचे तोरण स्वानुभवाशी प्रामाणिक आहे. हे या कविता वाचताना जाणवते.

तोरण : सौ. उषा गंधे
मानसन्मान प्रकाशन, पुणे, पृष्ठे : ६८, किंमत : ६० रुपये

◇ ◇

अरविंद भुजबळ
मु. पो. वाणेर, ता. हवेली, जि. पुणे ४११ ०४५.

---

## नवे आजीव सभासद

देशमाने अनिल मधुकर, पुणे
पाठक प्रकाश, धुळे
कोळी अशोक कौतिक, सुनसगाव
केळकर अशोक ग., पुणे
धमाले पूजा अरविंद, पिंपरी
खोपकर सानिका, निगडी
अग्निहोत्री उमेश, चिंचवड
पीलाय शिवदास, निगडी
वर्मा स्मिता, आकुर्डी
जाधव प्रदीप, चिंचवड
अग्निहोत्री शाम, चिंचवड
जगताप कमलिनी, पिंपरी
अवघडे विश्वनाथ, पिंपरी
पवार संजय, आकुर्डी
गायकवाड विठ्ठल, चिंचवड
देव सुनील शंकर, आकुर्डी
भुजबळ मिलिंद ज्ञानेश्वर, चाकण
कोरवा अरविंद इ., पुणे
भास्कर बाळकृष्ण लक्ष्मण, पुणे
राजोपाध्ये देवदत्त दिगंबर, विटा
जोगळेकर मिलिंद गोविंद, पुणे
गांजवे नेताजी शामराव, पुणे
मांगुळकर दीपा प्रदीप, मालेगाव
धावडे संगीता महेंद्र, पुणे
शेळके सदाशिव निवृत्ती, मळखांबी
भार्गव अविनाश नारायण, कल्याण
फाटक यति श्रीकांत, कल्याण
वंडाळे देविदास नागनाथराव, नांदेड
गोंड कविता दीपक, पुणे
निर्मळे विजया दशरथ, सांगवी
मराठे राधिका अविनाश, पुणे
वापट सौ.संध्या प्रकाश, पुणे
कवठे रमाकांत धोंडू, किन्हवली
राणे विकास विठ्ठल, किन्हवली
गोंधळी मनोज चंद्रकांत, किन्हवली
जोगळेकर सुषमा प्रभाकर, पुणे
इंगले नंदकुमार शंकरराव, इस्लामपूर
सय्यद अल्लाऊद्दीन स. अमीनोद्दीन, मर्शदपूर
खानापूरकर किरण, लासलगाव
देशमुख सीमा, नाशिक
पाटुकले क्षितीज रमेश, गोकाक
जोशी सुशीला हरी, पुणे
धिवरे श्रीकांत यशवंत, पुणे
सहस्रबुद्धे विश्वास नारायण, पुणे
लांडे अतुल बाजीराव, पुणे
पाटील जयसिंग शंकर, इस्लामपूर
जोशी प्रतिमा हेमचंद्र, पुणे
शेळके नीळकंठ निवृत्ती, पुणे
पारखी प्रकाश विनायक, पुणे
देशपांडे रघुनाथ पांडुरंग, सोलापूर
पेठे मधुकर सदाशिव, मुंबई
भागवत सुजाता वसंत, पुणे
जोशी श्रीराम कृष्णाजी, पुणे
नवले अरुण गजेंद्र, सोलापूर
सावर आल्हाद चंद्रकांत, धुळे
पाठक गणेशराव काशिनाथराव, धुळे
देशपांडे वसंत श्रीपाद, ठाणे
पाटील झेड्. वी., धुळे
देशपांडे सुनंदा उल्हास, ठाणे
देशपांडे पद्मा प्र., ठाणे
फडके विश्वनाथ चिंतामणी, ठाणे
जोशी विनय बाळकृष्ण, पुणे
धर्मपात्रे सुजीत भास्करराव, पुणे
जाधव मनोहर, पुणे
उमराणी शरद, पुणे
एडके माधव शाहू, पुणे
तडस हेमंत गंगाधर, सिंदी (वर्धा)
गवते राजु, पिंपरी (पुणे)
सूर्यवंशी उदर, नवी सांगवी.

◇ ◇



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# ऋणनिर्देश

१) परिषदेच्या आर्थिक स्थितीसंबंधी अंक क्र. २९१-९२ मध्ये केलेल्या आवाहनास प्रतिसाद म्हणून परिषदेच्या अनेक हितचिंतकांनी परिषदेस आर्थिक साहाय्य केले आहे. त्यापैकी श्रीमती शशिकला काकोड्कर यांच्या देणगीचा उल्लेख मागील अंकात केला आहे. येथे अन्य हितचिंतकांची नावे व त्यांनी दिलेली रक्कम यांचा निर्देश करीत आहोत.

| | | |
|---|---|---|
| **डॉ.हे.वि.इनामदार** | **२०००/-** | **पुणे** |
| **श्रीमती मोहिनी जोशी** | **१०००/-** | **कोल्हापूर** |
| **डॉ. चुनेकर सु. रा.** | **३००/-** | **पुणे** |
| **श्रीमती वहिरट जयश्री प्रभाकर** | **३००/-** | **पुणे** |
| **श्री. जोग अ. रा.** | **३००/-** | **पुणे** |
| **श्री. गानू मधू** | **३००/-** | **पुणे** |
| **श्री. पुरंदरे अ. दा.** | **३००/-** | **पुणे** |
| **श्री. गोयदानी वल्लभदास शि.** | **३००/-** | **सोलापूर** |
| **श्री. ओक प्रमोद गणेश** | **३००/-** | **पुणे** |
| **श्री. कामत तुळशीदास य.** | **३००/-** | **गोवा** |
| **श्री. आदाव सुनील शामसुंदर** | **३००/-** | **मुंबई** |

२) थोर संशोधक 'सह्याद्री' कर्ते **के.स.आ.जोगळेकर यांच्या स्मरणार्थ**, त्यांच्या कन्या व मराठीत कला विषयक अनेक पुस्तके लिहिलेल्या **श्रीमती प्रतिभा काळे** यांनी परिषदेस नुक्तीच **रु.१०,०००/-** ची देणगी दिली आहे.

श्रीमती काळे यांचे मन:पूर्वक आभार.

३) स.प.महाविद्यालयाचे भूतपूर्व प्राचार्य डॉ.ह.श्री.साने यांच्या आकस्मिक निधनानंतर, त्यांच्या ग्रंथसंग्रहातील खालील महत्त्वाचे संदर्भ ग्रंथ **श्रीमती ललिता साने** यांनी परिषदेच्या ग्रंथालयास भेट म्हणून दिले आहेत.

| | |
|---|---|
| इंग्रजी शब्दकोश | १ प्रत |
| हिंदी मराठी शब्दकोश | १ प्रत |
| वृहत मराठी हिंदी शब्दकोश | १ प्रत |
| सिंधी मराठी शब्दकोश | १ प्रत |
| उर्दु मराठी शब्दकोश | १ प्रत |
| मराठी व्युत्पत्ती कोश | १ प्रत |

परिषद श्रीमती साने यांची आभारी आहे.

४) मराठीतील सुप्रसिद्ध लेखिका व यावर्षीच्या श्रीमती शांतादेवी शिरोळे पुरस्काराच्या मानकरी **श्रीमती मधुवंती सप्रे** यांनी परिषदेच्या ग्रंथालयास खालील पुस्तके भेट म्हणून दिली आहेत.

१) सुवर्ण पिंपळ, २) शेरी, ३) कल्पद्रुमातळी, ४) समाजऋण, ५) द्रौपदी, ६) हसरी कविता, ७) ऋतुमंजिरी, ८) आत्मजा.

श्रीमती मधुवंती सप्रे यांचे मन:पूर्वक आभार.

५) परिषदेचे एक देणगीदार व ज्यांनी कविवर्य भा.रा.तांबे काव्य-पुरस्कार परिषदेमार्फत सुरू केला आहे ते **श्री.माधव मदाने** यांनी आपल्या बंधूंच्या स्मरणार्थ कविवर्य ना.घ.देशपांडे यांच्या नावाने काव्य पुरस्कार सुरू करण्यासाठी परिषदेस नुकतीच **रु.१५,०००/-** ची देणगी दिली आहे. या देणगीच्या व्याजातून पुढील वर्षापासून रु.१,१००/- चा काव्य पुरस्कार सुरू करण्यात येईल. तथापि, याच वर्षी कै.ना.घ.देशपांडे यांच्या निवडक कवितांच्या गायनाचा विशेष कार्यक्रम आयोजित करण्यात येत आहे.

परिषद श्री.माधव मदाने यांची अतिशय आभारी आहे.

६) मराठीत ६ खंडांचा अभिनव असा **'समाज विज्ञान कोश'** पुण्यातील **समाज विज्ञान मंडळाने** पूर्ण करून ज्ञानक्षेत्रात महत्त्वाची भर घातली आहे. या समाजविज्ञान मंडळाने परिषदेमार्फत लेखकास रु.५,०००/- व प्रकाशकास रु.२,५००/- असे समाजविज्ञान कोष पारितोषिक सुरू करण्यासाठी आवश्यक तो निधी परिषदेकडे सुपूर्त केला आहे. मराठीत सामाजिक जाणिवेतून आणि समाज परिवर्तनासंबंधी प्रकाशित झालेल्या वैचारिक ग्रंथास याच वर्षी १४ नोव्हेंबर २००० रोजी हे पहिले पारितोषिक देण्यात येईल.

हे पारितोषिक ठेवून परिषदेबद्दल आत्मियता व्यक्त करणारे समाज विज्ञान मंडळ व या संस्थेचे अध्यक्ष श्री.स.म.गर्गे यांची परिषद अतिशय आभारी आहे.

(लेखकांनी/प्रकाशकांनी १९९९ मध्ये प्रकाशित झालेले वैचारिक ग्रंथ २ प्रतींमध्ये या पारितोषिकासाठी त्वरित पाठवावेत.)

या सर्व देणगीदारांचे, हितचिंतकांचे व पुरस्कारकर्त्यांचे मन:पूर्वक आभार.

**- कार्याध्यक्ष**





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# कार्यवृत्त

## (दि.१ एप्रिल २००० ते ३० जून २०००)

◇

नंदा सुर्वे

**१० एप्रिल २००० : ज्ञानकोशकार डॉ. केतकर स्मृतिदिन**

सकाळी ८ वाजता कमला नेहरू उद्यानातील डॉ. केतकर यांच्या समाधीस पुष्पांजली वाहण्यात आली.

सायं.६.३० वाजता सुप्रसिद्ध संगणकतज्ज्ञ दीपक शिकारपूर यांचे व्याख्यान झाले. विषय होता - राज्य उद्याचे : संगणकाचे. व्याख्यानानंतर प्रश्नोत्तरांचाही कार्यक्रम झाला.

**१८ एप्रिल २००० : श्रद्धांजली सभा**

कवयित्री संजीवनी मराठे, प्राचार्य ह.श्री. साने, श्री. नरेश कवडी, डॉ. श्री. भा. वर्णेकर आणि प्रभाकर तामणे यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. अध्यक्ष होते श्री.राजेन्द्र वनहट्टी.

**१९ एप्रिल २००० : स. ह. मोडक स्मृतिदिन**

अनुवादित पुस्तकास किंवा ज्येष्ठ अनुवादकास यावेळी रु.२०००/- चे पारितोषिक दिले जाते. यावर्षीचे पारितोषिक विजेते आहेत डॉ. राम म्हैसाळकर (नागपूर). प्राचार्य के. रं. शिरवाडकर यांच्या हस्ते त्यांना त्यांच्या 'रवीन्द्र गीतांजली' या अनुवादित ग्रंथासाठी हे पारितोषिक प्रदान करण्यात आले.

**२९ एप्रिल २००० : प्रा. श्री. के. क्षीरसागर स्मृतिदिन व्याख्यान**

म. सा. परिषद आणि श्री. के. क्षीरसागर स्मृतिसमिती यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या २० व्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. मीरा सुंदरराज यांचे व्याख्यान आयोजित केले होते. व्याख्यानाचा विषय होता 'कविवर्य रवीन्द्रनाथ टागोर आणि श्री. के. क्षी.' कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी डॉ. व. दि. कुलकर्णी होते.

**२० मे २००० : श्रद्धांजली सभा**

थोर कवी ना. घ. देशपांडे आणि ज्येष्ठ प्रकाशक वा. वि. भट आणि जळगावचे प्रा. राजा महाजन यांना या दिवशी श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. सभेच्या अध्यक्षस्थानी होते श्री. रा. पं. नेने.

**२६ मे २००० : वार्षिक ग्रंथपारितोषिक वितरण समारंभ**

परिषदेतर्फे प्रतिवर्षी विविध वाङ्मय प्रकारातील उत्कृष्ट ग्रंथांना पारितोषिके दिली जातात. तसेच मराठी साहित्यात महत्त्वाची भर घातलेल्या ज्येष्ठ ग्रंथकारांचा विशेष पुरस्कार देऊन सन्मान केला जातो.

या वर्षीचा परिषदेच्या ९४ व्या वर्धापनदिनानिमित्त झालेला हा पारितोषिक वितरण समारंभ डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला.

**२७ मे २००० : वर्धापनदिन समारंभ**

प्रदीर्घ आणि दर्जेदार वाङ्मयीन कार्याबद्दल दिले जाणारे 'महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक' सुप्रसिद्ध ज्येष्ठ साहित्यिक डॉ. द. न. गोखले यांना प्रदान करण्यात आले.

तसेच साहित्य संस्थांमधील ज्येष्ठ कार्यकर्त्यांचा गौरव म्हणून दिले जाणारे कै. डॉ.भीमराव कुलकर्णी पारितोषिक यावर्षी सातारा येथील ज्ञानविकास



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

मंडळाचे ज्येष्ठ कार्यकर्ते श्री. वि. ल. चाफेकर यांना प्रदान करण्यात आले. श्री. राजेन्द्र वनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या या समारंभास श्री. रघुनाथराव चितळे हे प्रमुख पाहुणे होते.

**१२ जून २००० : श्रद्धांजली सभा**

ज्येष्ठ साहित्यिक गोपीनाथ तळवळकर यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. सभेच्या अध्यक्षस्थानी डॉ. व. दि. कुलकर्णी होते.

**१६ जून २००० : श्रद्धांजली सभा**

थोर साहित्यिक पु. ल. देशपांडे यांना साहित्य व कला क्षेत्रातील विविध मान्यवरांनी श्रद्धांजली अर्पण केली. श्री. राजेन्द्र वनहट्टी यांच्या अध्यक्षतेखाली ही सभा स. प. महाविद्यालयात घेण्यात आली.

**२१ जून २००० : कै. नाथमाधव स्मृतिदिन**

या निमित्ताने प्रा. व. वा. वोधे यांचे 'माझा लेखन प्रवास' या विषयावर व्याख्यान झाले.

**२२ जून २००० : विशेष ग्रंथचर्चा**

प्रसिद्ध लेखक श्री. गंगाधर गाडगीळ लिखित 'महाराष्ट्राचे प्रश्न : काही पाखंडी विचार' या ग्रंथावर डॉ. वाय्. वी. दामले यांच्या अध्यक्षतेखाली विशेष ग्रंथचर्चा आयोजित करण्यात आली. या चर्चेत डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वसुंधरा गाडगीळ व प्रा. स. ह. देशपांडे यांनी भाग घेतला. चर्चेचे संयोजन प्रा. वाळ गाडगीळ यांनी केले होते.

**२३ जून २००० : कै. का. र. मित्र स्मृतिदिन**

यानिमित्ताने श्री. अरविंद व्यं. गोखले (संपादक, केसरी) यांचे 'कारगिलनंतरचा पाकिस्तान' या विषयावर व्याख्यान झाले. व्याख्यानानंतर प्रश्नोत्तरीही झाली.

**२९ जून २००० : कै. दि. वा. मोकाशी पारितोषिक**

कथा, कादंबरी, प्रवासवर्णन यांपैकी एका साहित्यकृतीस आलटून पालटून देण्यात येणारे हे पारितोषिक या वर्षी पांडुरंग पाटणकर यांना त्यांच्या 'चला राजस्थान' या प्रवासवर्णनपर पुस्तकाला देण्यात आले. परीक्षक म्हणून श्रीमती वासंती घैसास व नन्दा सुर्वे यांनी काम पाहिले.

## शाखा वृत्तांत

**उल्हासनगर शाखा**

दि. १८/६/२००० रोजी महाराष्ट्र भूषण थोर साहित्यिक पु. ल. देशपांडे यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. उल्हासनगर शाखेचे अध्यक्ष शिवराम परब यांनी प्रास्ताविक केले. उपाध्यक्ष डॉ. वाणी, मधुकर भामरे, सुमराव, किरण सोनवणे, प्रकाश माळकर, डॉ. जगदीश पवार यांनी विचार व्यक्त केले.

श्री. दिलीप मालवणकर यांनी समारोप केला. श्री. प्रल्हाद चौधरी यांनी सूत्रसंचालन केले.

**इचलकरंजी शाखा**

या शाखेची १९९९ ते २००० सालची वार्षिक सर्वसाधारण सभा २७ जून २००० रोजी झाली.

त्या सभेत इतिवृत्त वाचून कायम करणे, वार्षिक अहवालास मंजुरी देणे, अंदाजपत्रकास मंजुरी देणे हे विषय ठेवले होते.

**धुळे शाखा**

दिनांक १/४/२००० रोजी कै. कविवर्य विद्याधर वैद्य यांच्या स्मृतिदिनानिमित्त कविवर्य श्री. तुलसी परब (पुणे) यांचे 'विद्याधर वैद्य यांच्या 'खिडकीतल्या कविता' या विषयावर व्याख्यान



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आयोजित करण्यात आले होते. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्राचार्य श्रीमती सुलभा भानगावकर होत्या. प्रा. रविकिरण झोळ यांनी प्रास्ताविक केले. तर श्री. सी. वं. रावळे यांनी संयोजन केले.

दिनांक ८/४/२००० या दिवशी म. सा. प. धुळे व गरूड वाचनालय यांच्या संयुक्त विद्यमाने श्री. अरुण नगराज वोरसे व प्रा. स्नेहल वोरसे यांनी कै. नगराज पोपट वोरसे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ दिलेल्या देणगीतून 'मैत्र जीवाचे' या विषयावर लोकसाहित्याचे व्यासंगी लेखक प्रा.डॉ.प्रभाकर मांडे यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन व संयोजन श्री. जगदीश देवपूरकर व श्री. दत्ता कुलकर्णी यांनी केले.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आयोजित प्राज्ञ परीक्षेसाठी धुळे म.सा.प. तर्फे ९१ विद्यार्थ्यांना बसवण्यात आले होते. गतवर्षीप्रमाणे याही वर्षी या परीक्षेत गुणवत्ता यादीत प्रथम, द्वितीय, तृतीय क्रमांक अनुक्रमे कु.ज्योतिवाला देवीदास पवार, कु. योजना केशव वहाळकर व प्रकाश भगवान जाधव या धुळे शाखेच्या विद्यार्थ्यांनी पटकावले.

या परीक्षेसाठी प्रा. पुं. म. चित्रे, प्रा. आल्हाद भावसार व श्री. मिलिंद दीक्षित यांनी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन केले. जयहिंद महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. के. वी. पाटील यांचे परीक्षेचे वर्ग व परीक्षा केंद्र या संदर्भात मोलाचे सहकार्य लाभले.

**इस्लामपूर शाखा**

दि.३१/३/२००० रोजी या शाखेचे सभासद कै. डॉ. विवेक देशपांडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ श्री. श्याम भुर्के (रिजनल मॅनेजर, बँक ऑफ महाराष्ट्र, कोल्हापूर) यांचे व्याख्यान झाले. डॉ. मधुकर हसमनीस यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला, तर डॉ. मंगल कोकाटे यांनी आभार मानले.

दि. २३/५/२००० : कथाकार कै. डॉ. मधू कुलकर्णी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ प्रसिद्ध साहित्यिक डॉ. वैजनाथ महाजन यांचे 'साहित्यातील स्वानंद' या विषयावर व्याख्यान झाले.

**कल्याण शाखा**

दि.१३/२/२००० या दिवशी कल्याण शाखेचे कार्याध्यक्ष श्री. किरण जोगळेकर यांनी लिहिलेल्या 'भुलभुलैय्या' या कवितासंग्रहाचे प्रकाशन प्रा. राम कापसे यांच्या हस्ते झाले. यावेळी अध्यक्षस्थानी प्रसिद्ध साहित्यिक श्री.वि.आ. बुवा होते.

शाखेचा वर्धापनदिन सोहळा १४, १५, १६ एप्रिल २००० असा आयोजित केला होता. त्याचा तपशील :

१४/४/२००० : या दिवशी 'कथेची जन्मकथा' या विषयावर प्रसिद्ध लेखिका डॉ. विजया वाड यांचे व्याख्यान झाले. तसेच त्यांच्या हस्ते श्री. किरण जोगळेकर लिखित 'वाळाची दुनिया' या कवितासंग्रहाचे प्रकाशन झाले. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. यशवंत धामणकर यांनी केले.

१५/४/२००० : या दिवशी 'मराठी नसे आज ती मायबोली' या विषयावर परिसंवाद आयोजित करण्यात आला. यावेळी लोकसत्ता, ठाणे जिल्हा पुरवणी संपादक श्री. सुधीर जोगळेकर अध्यक्षस्थानी होते. श्री. यशवंत धामणकर यांनी सूत्रसंचालन केले.

१६/४/२००० : या दिवशी निमंत्रितांचे कविसंमेलन आयोजित केले होते. या कार्यक्रमात प्रसिद्ध साहित्यिक श्री. वि. आ. बुवा हे प्रमुख पाहुणे होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. किरण जोगळेकर



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

यांनी केले.

दि.१४/५/२००० रोजी कवी मधुकर देवधर यांच्या 'मधुकलश' या कवितासंग्रहाचे प्रकाशन श्रीमती वैद्य यांच्या हस्ते झाले. त्यांचे 'कविता' या विषयावर व्याख्यान झाले. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन किरण जोगळेकर यांनी केले.

दि.१८/६/२००० या दिवशी लेखक व म.सा.प. कल्याण शाखेचे अध्यक्ष जनार्दन ओक यांच्या 'समर्थ रामदास स्वामी' या कादंबरीचे अंशतः वाचन झाले. यावेळी प्रमुख पाहुणे श्री. विश्वेश महाराज यांनी 'समर्थ रामदास स्वामी' या विषयावर आपले विचार व्यक्त केले. यशवंत धामणकर यांनी सूत्रसंचालन केले.

दि.२४/६/२००० या दिवशी म.सा.प. कल्याण शाखा व सार्वजनिक वाचनालय कल्याण यांच्या संयुक्त विद्यमाने पु.ल.देशपांडे यांच्या निधनानिमित्त शोकसभा आयोजित करण्यात आली. यावेळी वि. आ. बुवा हे अध्यक्षस्थानी होते.





## स्वागत



**स्वरांची स्मरणयात्रा :** अरविंद गजेंद्रगडकर, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे १७६.
**पंख पालन :** निशीगंधा व्यवहारे, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे ५६.
**प्रीत आणि प्रतिमा :** सुलभा हेर्लेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे २१६.
**कस्टमचे दिवस :** श्रीपाद दत्तात्रय गोगटे, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १६०.
**पर्यावरण :** (आकलन आणि आचरण) पल्लवी चाफेकर, सुमेरू प्रकाशन, डोंबिवली. पृष्ठे ९६.
**श्री शिवराम महाराज :** विश्वेश ढवळीकर, वसुधा ढवळीकर, इस्लामपूर. पृष्ठे ३६.
**साने गुरुजींचे निवडक निबंध :** विलास खोले, प्रतिमा प्रकाशन, पुणे. पृष्ठे १९६.
**स्वरानुबंध :** दत्ता मारूलकर, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे १८०.
**नीरू आणि नेहा :** दत्ता मारूलकर, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६४.
**अल्बम् :** मंगला गोडबोले, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे ७२.
**खुणेची जागा :** मंगला गोडबोले, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे १९७.
**दुसरा सूर्यास्त :** शाम फरांदे, उत्कर्ष प्रकाशन, पुणे. पृष्ठे १२०.
**मुक्कामाला फुटले पाय :** जगदीश कदम, निर्मल प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ११२.
**बुडत्याचे पाय खोलात :** जगदीश कदम, निर्मल प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ६२.
**महाप्रस्थान :** अनुवाद अमृता देशमुख, निर्मल प्रकाशन, नांदेड. पृष्ठे ९७.
**वगनाट्य गांवगुंड :** दीपाकांत राक्षे, प्रकाशक - डी.डी.पवार, हडपसर. पृष्ठे ८०.
**नवस :** अरुणा राक्षे, प्रकाशक दीपाकांत राक्षे, हडपसर. पृष्ठे १७४.
**माधवी परत ये :** दीपाकांत राक्षे, दीपा प्रकाशन, हडपसर. पृष्ठे १४४.
**पालापाचोळा :** दीपाकांत राक्षे, दीपा प्रकाशन, हडपसर. पृष्ठे १३६.
**साहित्यसेतू :** ए.ए.देशपांडे, मेहता प्रकाशन, पुणे. पृष्ठे १४२.
**मराठी ग्रामीण कवितेचा इतिहास :** कैलास सार्वेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे २९८.
**रेशीमगाठी :** कांचन काशिनाथ घाणेकर, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे १६८.
**मराठी ग्रामीण साहित्य परिसर आणि प्रवाह :** प्रा.गो.म.कुलकर्णी, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे ७२.
**महात्मा :** डॉ.रवींद्र ठाकुर, दिलीपराज प्रकाशन, पुणे. पृष्ठे ४७६.



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# पु. ल. देशपांडे स्मृती विशेषांक

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका दिवाळी २०००

**नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात प्रकाशित होत आहे.**

**या अंकात**

- डॉ.आनंद यादव
- प्रा. द. मा. मिरासदार
- डॉ. गं. ना. जोगळेकर
- डॉ. वि. भा. देशपांडे
- प्रा. स. ह. देशपांडे
- सौ. मंगला गोडबोले
- श्री. राम गबाले
- प्राचार्य राम शेवाळकर
- प्रा. श्रीराम पुजारी
- श्री. श्रीकांत मोघे

**यांचे विशेष लेख**

**मुखपृष्ठावर पु.ल.देशपांडे यांचे संग्राह्य छायाचित्र**

**पृष्ठे अंदाजे २००, मूल्य रु.१००/-**

म. सा. प. च्या सभासदांना हा अंक नेहमीप्रमाणे पाठवूच. सभासद नसलेल्या ग्राहकांनी अंकाची प्रत आगाऊ नोंदवावी. प्रती मर्यादित.

प्रमुख कार्यवाह

**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड, पुणे ४११ ०३०.


अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

Maharashtra Sahitya Patrika Quarterly July, August, September 2000
Registered with the Registrar of Newspapers for India Under No. 6398/57

पद्मभूषण कै. वसंतदादा पाटील उत्कृष्ट नागरी सहकारी बँकेच्या
बक्षीस योजनेमध्ये सलग दुसऱ्या वर्षी सर्वोत्कृष्ट पुरस्कार विजेती बँक

तत्पर, विनम्र, स्नेहपूर्ण व आदरयुक्त वागणुकीसह बँकिंगची
सेवा उपलब्ध करून देणारी बँक म्हणजेच




**पुणे पीपल्स को-ऑपरेटिव्ह बँक लि.**

६०६, सदाशिव पेठ, कुंटे चौक, पुणे - ४११ ०३०
फोन नं.: ४४५२३५३, ४४५५९३२, ४४५०६८५, ४४८३६८४

जमाराशी कक्ष - सेफ डिपॉझिट व्हॉल्टसह
रामदूत, १०६९/७० सदाशिव पेठ, शनिपाराजवळ, पुणे. ३०. फोन - ४४७२२३३.

शाखा

| | | |
|---|---|---|
| १) पेरुगेट शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस | ४४७८१७२ |
| २) मॉडेल कॉलनी शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस | ५६५४१७५ / ५६६०१३६ |
| ३) मार्केट यार्ड शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस | ४२६०८८४ / ४२६७२७६ |
| ४) कसबा पेठ शाखा | | ४४५४४२१ |
| ५) दशभुजा गणपती सहकारनगर शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस | ४२२४७८५ / ४२२४३०३ |
| ६) आझादवाडी-कोथरुड शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस<br>संपूर्ण संगणकीकृत | ५४६५३४३ |
| ७) चिंचवड शाखा | संपूर्ण संगणकीकृत | ७४५१८५८ |
| ८) बिबवेवाडी / कात्रज शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस | ४२१७१९८ |
| ९) औंध शाखा | संपूर्ण संगणकीकृत | ५८८६४४६ |
| १०) सोमवार पेठ शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस<br>संपूर्ण संगणकीकृत | ६१२५९८३ / ६०५३२५७ |
| ११) तळेगाव दाभाडे शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस<br>संपूर्ण संगणकीकृत | (०२११४) २८०८० |
| १२) ठाणे शाखा | सेफ डिपॉझिट व्हॉल्टस<br>संपूर्ण संगणकीकृत | (०२२) ५४१५५५८,<br>(०२२) ५४१५५५९ |

* अनिवासी भारतीयांची खाती स्वीकारण्यास रिझर्व बँकेची परवानगी.
* रुपये १ लाखापर्यंतच्या ठेवींना विमा संरक्षण
* कर्वेनगर, अहमदनगर येथे शाखा उघडण्यास रिझर्व बँकेची परवानगी.
* डिमेट सुविधा उपलब्ध

| श्री. शां. बा. रायसोनी | सौ. अ. श्री. केळकर | श्री. प्र. प. पेशवे |
|---|---|---|
| अध्यक्ष | उपाध्यक्ष | व्यवस्थापक |



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद